श्रीमद्योगीश्वर

# याज्ञवल्क्य-चरित्र

व

## शुक्लयजुर्वेद वैदिक-वाङ्मय परिचय



लेखक

काव्यतीर्थ मीमांसक पं. श्रीधर अण्णाशास्त्री वारे.

अक्षय्य तृतीया शके १८५७

नासिक.

[ आवृत्ति पहिली प्रती १००० ]

प्रकाशक
श्रीधर अण्णाशास्त्री वारे
२०२२ सोमवार पेठ,
नासिक.



मुद्रक
दामोदर महादेव चंद्रात्रे
विज्ञान प्रेस
२२१९ मधली होळी
नासिक.



श्री. दत्तात्रय विनायक टोककर
उज्जयिनी.

पं. श्रीधरशास्त्री वारे
नाशिक.

# अल्प निवेदन

निजचरितमहिम्ना सर्वदा लोकसंघान् स्वगुणगणगरिम्णा स्वस्वकार्यं प्रशास्तुम् ॥
सततमवतरंति स्वर्गतस्ते महान्तः भृशमनुसरणीयोऽतस्तदादिष्टपंथाः ॥ १ ॥

भारतीय विद्वज्जनांस माहीत आहेच कीं, वरील श्लोकांत दर्शविल्याप्रमाणें आपल्या लोकोत्तर व उदार चारित्र्यानें तसेंच बहुमोल गुणगणगौरवानें चतुर्वर्णीय प्रजेला आपआपल्या कर्तव्यधर्मकर्माकडे सतत प्रवृत्त करण्याकरितां महान् महान् देव, मुनि, सिद्ध वगैरे लोक स्वर्गांतून इहलोकांत अवतीर्ण होत असतात. म्हणूनच त्यांनीं उपदेशिलेला मार्ग अनुकरणीय असाच असतो.

अशांपैकींच श्रीभगवान् योगीश्वर याज्ञवल्क्य महर्षि होत. हे महासमर्थ व आदित्यप्राप्त वेदसंप्रदायाचे आद्य प्रवर्तक होते. त्यांचें समग्र चरित्र माहित असणें अत्यावश्यक असून तें महाराष्ट्र भाषेंत उपलब्ध नाहीं. आजपर्यंत श्री याज्ञवल्क्यांचीं जीं लहान मोठीं चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत. तीं प्रायः त्रुटितच आहेत. ती उणीव अंशतः तरी भरून निघावी या हेतूनें आम्ही अत्यंत परिश्रमानें संस्कृतांतील भिन्नभिन्नविषयक वाङ्मयाचें समालोचन करून त्यांतील चरित्रांश मधुमक्षिकेप्रमाणें ग्रथित करून प्रस्तुतचें याज्ञवल्क्य-चरित्र शक्य तितक्या संपूर्ण माहितीनें तयार केलें आहे.

या चरित्राचा पूर्वार्धांत समावेश करून उत्तरार्धांत शुक्लयजुःशाखीय वैदिक वाङ्मयापैकीं सुमारें ३२५ ग्रंथांचा परिचय - थोडक्यांत पण आवश्यक असा करून दिला आहे. तो वाचकांस फार उपयुक्त होईल अशी आशा आहे.

तसेंच या पुस्तकाचे शेवटीं परिशिष्टरूपानें श्रीयाज्ञवल्क्य—पूजाविधि, आरति, द्वादशनाम अष्टोत्तरशतनाम, सहस्रनाम, वगैरेंचाही संग्रह केला आहे. चरित्रांतही मधून मधून महत्वाच्या प्रसंगांचीं चित्रें व, शाखापट, वंशवृक्ष, गुरुशिष्यपरंपरापट वगैरे दिलीं आहे

त्या पुस्तकाच्या लेखनाच्या कामीं उपयोगांत आणलेल्या ग्रंथांची यादीही जोडली आहे.

कळविण्यास आनंद वाटतो कीं ग्रंथाला सुरवात केल्यापसून अखेर ग्रंथ प्रकाशित होईपर्यंत अनेक विघ्नें उपस्थित झालीं तरी त्यांचें निवारण होऊन पुस्तक आज वाचकांचे हातीं देण्याचें सुदैव लाभलें. ही खरोखर परमेश्वराचीच कृपा होय.

वाचकवृंद सदरील पुस्तकाचा संग्रह करून एकवार समग्र वाचन जर करील तरी सुद्धां माझे सर्व परिश्रम सफल झाले असें मी समजेन. ही माझी आशा जगद्गुरु याज्ञवल्क्य पूर्ण करतील यांत मला मुळींच संदेह वाटत नाहीं असो.

विनंति केल्याप्रमाणें ह्या पुस्तकाचे समग्र मननपूर्वक वाचन करून श्री. रावसाहेब गोविंद सदाशिव आपटे गणकचूडामणी माजी प्रिन्सिपाल माधव कॉलेज सुपरिंटेन्डेंट वेधशाळा उज्जैन, यांनीं याज्ञवल्क्याच्या कालनिर्णायक प्रकरणावर आपला अभिप्राय व्यक्त केला. तसेंच श्री. रा. रा. केशव नारायण डांगे एम्. ए. बी. टी उज्जैन यांनींही समग्र पुस्तकावर आपला अभिप्राय व्यक्त केला. त्याबद्दल या उभयतांचे जितके आभार मानावे तितके थोडेच आहेत.

प्रस्तुतचे चरित्राचे कामीं पंढरपूर येथील बृहन्महाराष्ट्रीय माध्यंदिन संस्थासंमेलन मध्यवर्ति मंडळाच्या चालकांनीं ठराव पास करून प्रोत्साहित केलें त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

तसेंच श्री. रा. रा. धर्मकार्यधुरंधर गोविंद आबाजी शौचे, पेन्शनर ॲ. डे. ए. इ. नासिक, श्री. पुरुषोत्तम रामचंद्र बुरकुले, बी. ए. एल् एल्. बी व श्री. रा. रा. दत्तात्रय बळवंत गंढाळे पंढरपूर प्रभृति मंडळींनीं ज्या उपयुक्त सूचना व सहाय्य केलें त्याबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहे. विशेषतः आमचे प्रियमित्र श्री. रा. रा. दत्तात्रय विनायक टोककर उज्जैन यांनीं लेखनादि कार्यांत आपला अमूल्य वेळ खर्च करून वारंवार उज्जैनहून नासिकला येऊन फारच मोठें सहाय्य केलें ह्या बद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

श्री रा. रा. पुरुषोत्तम दामोदर चंद्रात्रे एम्. ए. यांनीं आपल्या अनेक व्यासंगांना बाजूस सारून सदर पुस्तकास आपल्या प्रस्तावनेनें अलंकृत केलें याबद्दल ते धन्यवादास पात्र आहेत.

ह्या पुस्तकाचे मुद्रणाचे कामीं व बाह्याभ्यंतर पुस्तक सुंदर करण्याचे कामीं विज्ञान प्रेसचे मालक श्री. रा. दामोदर महादेव चंद्रात्रे यांनीं जे साहाय्य केलें तें अवर्णनीय आहे यांत संदेह नाहीं.

शेवटीं पुस्तकांत, नजरचुकीनें मुळांतच अगर मुद्रण करतांना कांहीं दोष राहिले असल्यास विद्वान् वाचकांनीं आम्हांस कळविण्याची कृपा करावी, म्हणजे द्वितीयावृत्तीचे वेळीं ते दोष दूर करण्याचा प्रयत्न करतां येईल. एवढी प्रार्थना करून हें अल्प निवेदन पुरें करितों.

शके १८५८
श्रीक्षेत्र नासिक

श्रीधर अण्णाशास्त्री वारे

# विद्वानांचे अभिप्राय

रावसाहेब गोविंद सदाशिव आपटे B.A. गणकचूडामणि
माजी प्रिन्सिपॉल माधव कॉलेज,
सुपरिन्टेन्डन्ट वेधशाळा, उज्जैन.

श्री. रा. रा. पं. श्रीधर अण्णाशास्त्री वारे काव्यतीर्थ, मीमांसक, विद्याभरण यांनीं लिहिलेलें 'याज्ञवल्क्यचरित्र' पुस्तक, विशेषतः त्यांतील 'याज्ञवल्क्य कालनिर्णय प्रकरण', मननपूर्वक वाचलें; त्या संबंधीं माझे विचार मी खालीं नमूद करीत आहे.

पं. वारे शास्त्री यांनीं याज्ञवल्क्याचें कालनिर्णय प्रकरण अत्यंत संशोधन करून चिकित्सापूर्वक लिहिलें आहे. एवढेंच साधन याज्ञवल्क्याच्या कालनिर्णयासंबंधीं प्रस्तुत उपलब्ध आहे, असें मला वाटतें. कल्पपरिगणन पद्धति सुंदर मांडली आहे. परंतु कल्पकाल, सिद्धांतशिरोमणि आर्यभट्टाच्या वेळेपासून मानण्यांत येतो. वेदांग ज्योतिषांत याचा उल्लेख कोठें नाहीं. पौराण कालांतच याचा उल्लेख आढळतो. साधारणतः ३०० ए. डी. वर्षांपूर्वींची कल्पकालगणन पद्धति मानण्यांत येते. यावरून कल्पकाल पद्धति फार जुनी नसून अलीकडीलच आहे. तेव्हां तीस महत्त्व देतां येत नाहीं.

सारांश :— कालनिर्णय करते वेळीं श्री. वारे शास्त्री यांनीं निरनिराळीं मतें निर्दिष्ट करून आपला काल ६००० वर्षांपूर्वींचा ठरविला आहे. तो सध्यां तरी मान्य करण्यासारखा आहे. कारण, यापेक्षा जास्त निश्चय करितां येण्यासारखें प्रमाण मिळत नाहीं.

एकंदरींत ही चर्चा विद्वानांना विचारप्रोत्साहक होईल अशा प्रकारची आहे.

ता. ११।४।१९३५
उज्जयिनी, सेंट्रल इंडिया.

गोविंद सदाशिव आपटे

श्री. केशव नारायण डांगे एम्. ए. बी. टी.

प्रोफेसर मंदोसर कॉलेज,

पं. काव्यतीर्थ, मीमांसक, विद्याभरण, श्रीधर अण्णाशास्त्री वारे नासिक यांस,

आजकाल लहानसहान व्यक्ति सुद्धां चरित्राचे विषय बनतात. पुष्कळ लोक आपआपल्या कुलांचा इतिहास लिहिण्यांत गर्क झाले आहेत. परंतु अशा अनेक कुलांचे 'मूळ आरंभक' व्यास, मनु, वसिष्ठ, याज्ञवल्क्य, जनक, प्रभृती जे गोत्रप्रवर्तक व शाखाप्रवर्तक ऋषि होऊन गेले, त्यांचीं चरित्रें लिहिण्याचा प्रयत्न कोणीच करीत नाहीं. विशेषतः ज्यांनीं वैदिक संप्रदायांत एके काळीं फार मोठी व चिरकाल टिकणारी महत्वाची क्रांती घडवून आणली त्या आदित्य संप्रदायगत वेदचतुष्टय प्रवर्तक याज्ञवल्क्याच्या चरित्राची उणीव भासत होती. ती आपण भरून काढली, हा आपला उपक्रम स्तुत्य आहे.

प्रस्तुतचें चरित्र वाचीत असतां वाचकाची एक विशिष्ट मनोवृत्ति आणि दृष्टिकोण असावा लागतो. क्षणांत प्रसन्नता तर क्षणांत गंभीरता, क्षणांत विचाराची तंद्रा, तर क्षणांत अद्भुतता, अशा अनेक संवेदनांतून वाचकाला पार पडावयाचें असतें. तरी पण ऋषिकालीन इतिहासाची अवनति होत असलेल्या कालांतहि आपण कृतज्ञतापूर्वक ऋषिऋण फेडित आहोंत, ही भावना लेखकाप्रमाणेंच वाचकाची झाल्याशिवाय राहणार नाहीं.

पाश्चात्यांच्या काटेकोर संशोधनांत मग्न असलेल्या लोकांचीहि दृष्टि आमच्या श्रुतिस्मृतिपुराणोक्त याज्ञवल्क्यासारख्या महापुरुषाकडे लागेल असेंच ह्या पुस्तकाचें लिखाण झालें आहे.

ऋषींच्या आश्रमांत यज्ञ चालला असतां मधल्या विश्रांतीच्या काळांत आपण वार्तालाप करीत आहोंत, असा भास हें पुस्तक वाचतांना होतो.

ह्या पुस्तकाच्या उत्तरार्धांतील वैदिक वाङ्मयाच्या माहितीचें संकलनहि ग्रंथकर्त्याच्या विद्वत्तेस साजेसेंच झालें आहे. वैदिक वाङ्मयाचें वर्णन करणारीं फारच थोडीं पुस्तकें मराठींत आहेत. त्यांत ह्या उत्तरार्धानें चांगलीच भर पडेल. समतोलपणाचें सोंग घेणाऱ्या विद्वानांचा परामर्श ग्रंथ-कर्त्यानें खरोखरच समतोल बुद्धीनें घेतला हें त्यास भूषणावहच आहे.

निरनिराळ्या प्रसंगांचीं चित्रें व विविध परिशिष्टें जोडून पुस्तकाची सजावट फारच उत्तम संपादिली आहे.

ता. १४-५-१९३५. इ.
उज्जयिनी, सेंट्रल इंडिया.

केशव नारायण डांगे.



# आधार ग्रंथ

## श्रीमद्योगीश्वर याज्ञवल्क्य चरित्र


१ प्रतिज्ञापरिशिष्ट
२ स्कंदपुराण नागरखंड
३ गुजराथी साहित्यपरिषदेचा रिपोर्ट निबंधसंग्रह
४ नासिक पांडवगुंफेवरील शिलालेख
५ कविवल्लभकृत नागरोत्पत्ति
६ वडनगर येथील राजा कुमारपाल याचा प्रशस्ति शिलालेख
७ वल्लभी ताम्रपट
८ व्होर जटाशंकर जुनागड यांच्या शांखायन नांवाच्या हस्तलिखित पोथिवरील कालोल्लेखन
९ श्रुति
१० श्रीमद्‌भगवद्गीता
११ पुरुषार्थचिंतामणि कालखंड
१२ मीमांसा जैमिनीया
१३ न्याय
१४ ब्रह्मसूत्र व शांकरभाष्य
१५ वायुपुराण
१६ वेदकालनिर्णय ( चुलेटकृत )
१७ कातीय शुल्बसूत्र व कर्कभाष्य
१८ प्रशांतराग प्रभावदत्त कुशली याचा ताम्रपट
१९ शतपथ ब्राह्मण कां. ७ । १० । १३ । १४
२० चतुर्विंशतिमत भट्टोजी दीक्षितकृत व्याख्यान
२१ म. म. दुर्गाप्रसादकृत साहित्य-दर्पण भूमिका
२२ पं. मुकुंद झाकृत निरुक्तलघुविवृति भूमिका
२३ ऐतरेयब्राह्मण व सायणभाष्य
२४ महाभारत शांतिपर्व
२५ भारतीय ज्योतिःशास्त्राचा इतिहास दीक्षितकृत
२६ महाभारताचा उपसंहार
२७ केतकरकृत नक्षत्रविज्ञान
२८ लोकमान्यांचें ओरायन
२९ दप्तरीकृत कालनिर्णय
३० श्रीमद्भागवत स्कंध ९ । १२
३१ श्रीमद्देवीभागवत
३२ बह्वृचसर्वानुक्रम व षड्गुरूचें भाष्य
३३ शौनकीय चरणव्यूह
३४ जाबाल संहिता
३५ विष्णुपुराण अंश ३ । ५
३६ बृहदारण्यक व शांकरभाष्य
३७ चिदंबर दीक्षितकृत याज्ञवल्क्य चरित्र
३८ कृष्णसूरिकृत वेदतत्त्वनिरूपण
३९ कण्वसंहिता व सायणभाष्य
४० आत्मपुराण व काकाराम पंडितांची टीका
४१ आदित्यपुराण उत्तरखंड

४२ सूर्यपुराण
४३ ज्ञानंदस्वामिकृत याज्ञवल्क्यपूजा
४४ वैयासिकचरणव्यूह व तद्भाष्य
४५ अक्कलकोटस्वामीमहाराजांचें चरित्र गुरुलीलामृत
४६ संशयतिमिरदिवाकर
४७ भागवतलाल लक्ष्मीपतिशास्त्रीकृत-याज्ञवल्क्यचरित्र
४८ भर्तृहरी नीतिशतक
४९ माध्यंदिन संहिता व उवट-महीधरभाष्य
५० अथर्ववेद
५१ ब्रह्मांडपुराण पूर्वार्ध
५२ वराहपुराण
५३ निरुक्त व दुर्गाचार्यवृत्ति
५४ आर्यविद्यासुधाकर
५५ पातंजल महाभाष्य
५६ मुक्तिकोपनिषद्
५७ वैजवाप गृह्यसूत्र
५८ वाचस्पत्य कोष
५९ कातीय प्रातिशाख्य व अनंतदेव भाष्य
६० गोपीनाथभट्टी
६१ कथासरित्सागर
६२ महाभारत सभापर्व
६३ ब्रह्मपुराणांतर्गत गोदामाहात्म्य
६४ यजुर्वेदकल्पतरु
६५ तंत्रवार्तिक
६६ कातीय हौत्रसूत्र
६७ याज्ञवल्क्यस्मृति व विश्वरूपाचार्य-कृत टीका बालक्रीडा
६८ स्थपतिगर्गपद्धति
६९ कात्यायनीय श्रौतसूत्र व पितृभूति, कर्क, अनंदेव, यांचीं भाष्यें
७० प्रातिशाख्यदीपिका
७१ सनातनधर्मप्रदीप शुद्धिप्रकाश
७२ आश्विनौयानमीमांसा
७३ याज्ञवल्क्यीया गार्गीगीता
७४ स्कंदपुराण अवंतिखंडांतर्गत रेवा-खंड
७५ आह्निकसूत्रावलि
७६ कातीय सर्वानुक्रम व अनंतदेव भाष्य
७८ गार्गीआख्यान ओवीबद्ध
७७ धर्मतत्त्वनिर्णय
७९ महार्णव
८० पराशरस्मृति
८१ हरिवंश

## शुक्लयजुर्वेद वैदिक-वाङ्मय परिचय

१ सायणीय ऋग्वेदभाष्य
२ मनुस्मृति व कुल्लूक टीका
३ स्मृति
४ सायणीय ऐतरेय भाष्य
५ आपस्तंब श्रौतसत्र
६ पाणिनिसूत्र
७ ऋक्प्रातिशाख्य व षड्गुरुकृत भाष्य

८ मुंडकोपनिषद्
९ कात्यायनप्रातिशाख्य अनंतदेवभा०
१० माध्यंदिनसंहिता उवटमहीधर भा०
११ जटापटल व्याडिकृत
१२ तैत्तिरीयसंहिता व सायण आणि मस्करी यांचीं भाष्यें
१३ कण्वसंहिता व सायणभाष्य
१४ शतपथब्राह्मण व सायणभाष्य
१५ वाचस्पत्य कोष
१६ जैमिनिसूत्र
१७ मेदिनी कोष
१८ ऐतरेयब्राह्मण
१९ शतपथब्राह्मण व सायणभाष्य
२० निरुक्त व दुर्गाचार्यवृत्ति
२१ विष्णुधर्मोत्तर उत्तरखंड
२२ महाभारत उद्योगपर्व
२३ सत्याषाढ श्रौतसूत्र
२४ कातीय प्रतिज्ञापरिशिष्ट
२५ बौधायन गृह्यसूत्र
२६ बौधायन धर्मसूत्र
२७ कौशिक गृह्यसूत्र
२८ पारस्कर गृह्यसूत्र
२९ शाबरभाष्य
३० तंत्रवार्तिक
३१ मेधातिथि मनुव्याख्या
३२ बृहदारण्यकभाष्य वार्तिक
३३ शास्त्रदीपिका मयूखमालिका व्या०
३४ श्राद्धसूत्र व भाष्य
३५ याज्ञवल्क्यस्मृति व्याख्येसह
३६ शूद्रकमलाकर
३७ विद्याधरमिश्र श्रौतसूत्रभूमिका
३८ दयानंदीय ऋग्वेदभाष्य
३९ महामोहविद्रावण
४० सनातनधर्मप्रदीप प्रमाणप्रकाश
४१ वैदिकवाङ्मयका इतिहास
४२ बृहदारण्यक व शांकरभाष्य
४३ गोपथब्राह्मण
४४ कातीय भाषिकसूत्र व भाष्य
४५ कात्यायनीय वार्तिक
४६ महाभारत शांतिपर्व
४७ अध्वरमीमांसा कुतूहलवृत्ति
४८ आश्वलायन श्रौतसूत्र
४९ पारस्कर गृह्यसूत्र भाषांतर
५० स्कंदपुराण नागरखंड
५१ मंत्रभ्रांतिहर
५२ कात्यायन श्रौतसूत्र कर्कभाष्य व पितृभूतिभाष्य
५३ ऋक्सर्वानुक्रम व षड्गुरुभाष्य
५४ कर्मप्रदीपिका
५५ इष्टकापुराण व भाष्य
५६ माध्यंदिन शाखाप्रकाश
५७ ज्ञानकोष वेदविभाग
५८ प्राचीनचरित्रकोष
५९ कण्व शतपथब्राह्मण
६० नागरसर्वस्व
६१ भारतीय साम्राज्याचा इतिहास
६२ आर्षानार्षसूत्रविवेक
६३ ब्रह्मपुराण

श्रीमत्पूज्यपादयोगीश्वरयाज्ञवल्क्यब्रह्मर्षिचरणकमल —

## समर्पणम्

स्वस्ति श्रीमद्विविधानवद्यविद्याविनोदविचारसदाचारच्चरणपरिचितवरिष्ठप्रतिष्ठाधिष्ठितगरिष्ठयशःशरच्चंद्रकरनिकरधवलीकृताखंडभूमण्डलेषु ऋग्यजुरादिवेदवेदांगादिकाधिताागमनिगमरहस्याविवेचनोदधिमंथनक्षममतिमंदरमथिताधिगततत्त्वबोधामृतेषु अखंडभूमंडलाखंडलसमानसन्मान्यराजराजजनकादिभूपालमौलिलालितललामभूतमुकुटमणिरत्नरंजितपादपद्मपीठेषु न्यायमीमांसाद्यनेकशास्त्राध्ययनाध्यापनबलोदितवेदांतविज्ञानविजृंभितयोगाभ्यासजनितब्रह्मानंदानुभवसत्तपःसिद्धिफलकरतलामलकेषु लौकोत्तरानेकाश्चर्यकारककर्मनिचयक्षमत्वचकितसकललोकमतिषु श्रौतस्मार्तसनातनीयसद्धर्मोन्नतिकारकसाद्विद्याभिवृद्धिसंपादनार्थनैकविधधार्मिकसदाचरणसमुत्तेजकाविधिविधानपथदर्शकग्रंथकृत्सु परमतपोधनस्य श्रीमद्राजसेनमहर्षेस्तनुजेषु दिगंतसत्कीर्तियोगीश्वरश्रीमद्याज्ञवल्क्य इति शोभनाख्येषु श्रीमद्रविकुलावतंसरामचंद्रचरणारविंदरजोभिपूतश्रीगोदावरीतीरपरिसरालंकृतश्रीमन्नासिकं महापवित्रक्षेत्रमधिवासिनो वारे इत्युपनामकस्य श्रौतस्मार्तकर्मानुष्ठानविधिसकलकौशल्यलब्ध "वैदिकातिलक" इतिपदवीधारिण अण्णाशास्त्रिणः पुत्रेण काव्यतीर्थमीमांसकेन श्रीधरशास्त्रिणा शतशः प्रणतितर्तिं कृत्वा प्राचीनार्वाचीनलघुगुरुनानाविधपुस्तकान्यालोड्य मधुमाक्षिकावदश्रांतपरिश्रमेण महर्षेश्चारित्रोपयोगिसारसंग्रहसमाविष्टं शुक्लयजुर्वेदवैदिकवाङ्मयपरिचयसहितं पूजाद्यनेकपरिशिष्टयुतं चेदं पुस्तकं निखिलविद्याविदाचार्यवर्यचूडामणिमरीचिपूजितपुण्यश्लोकयोगीश्वरपादकमलयुगले सप्रश्रयं समर्प्यते ।

श्रीमद्योगीश्वरचरणारविंदमकरंदभृंगायमाणः

श्रीधरशास्त्री वारे

# अनुक्रमणिका

## परिशिष्टसूचि



## चित्रसूचि

# प्रस्तावना

लब्ध्वा रहस्यानि सुदुर्लभानि यजूंषि शुक्लानि विवस्वतो यः ॥
स्वर्गापवर्गावकरोत्प्रकाशौ जयत्यसौ ब्रह्मविदेकहंसः ॥१॥

एकाद्या ग्रंथाच्या विचारयुक्त वाचनास अनुकूल अशी वाचकांची मनोभूमिका तयार करण्याचें कार्य त्या ग्रंथाच्या प्रस्तावनेस करायाचें असतें. एकादा गृहस्थ बुद्धिमान् आहे, विद्वान् आहे, सदाचरणी आहे, उपकारशील आहे, तरी पण त्याची ओळख नसल्यामुळें नवख्या माणसास त्याच्या सद्गुणांचा उपयोग करून घेण्यास प्रथम प्रथम अवघड जातें; पण कोणी एकाद्यानें परिचय करून दिल्यास तेंच कार्य सुकर होतें. तीच गोष्ट पुढें येणाऱ्या ग्रंथाच्या बाबतींत अगाऊ जोडलेल्या प्रस्तावनेची होय. अशा तऱ्हेनें वाचकाची मनोभूमिका ग्रंथाच्या सारग्रहणास अनुकूल करण्याचें कार्य ग्रंथाचा योग्य परिचय करून देऊनच साधतें; व हें कार्य पूर्णपणें लायक अशा विद्वानाकडूनच होणें इष्ट असतें. म्हणूनच कोणातरी प्रथितयश विद्वानाकडूनच आपल्या ग्रंथास प्रस्तावना लिहवून घेण्याची बहुतक ग्रंथकारांची प्रथा आहे.

तेव्हां माझे परममित्र पंडित श्रीधरशास्त्री वारे यांनीं "श्रीमद्योगीश्वर याज्ञवल्क्यचरित्र व शुक्लयजुःशाखीय वैदिक वाङ्मय परिचय" या आपल्या ग्रंथास प्रस्तावना लिहिण्याविषयीं मला म्हटल्या बरोबर एक प्रकारें मला सांकडें पडल्यासारखेंच झालें. कारण उपरिनिर्दिष्ट श्लोकांत वर्णन केलेल्या योग्यतेच्या महनीय व्यक्तीच्या चरित्राचा व बरोबर असलेल्या शुक्लयजुःशाखीय वैदिक वाङ्मयाच्या विद्वत्तापूर्ण परिचयाचा साकल्यानें विचार तर व्हावयास पाहिजे, सर्व ग्रंथाचें सार काढून तें वाचकाच्या पुढें मांडावें तर मूळ ग्रंथाच्या विचारयुक्त वाचनावर विरजण पडावयाचें व गुणदोषाविष्करण करावें तर वाचकांच्या स्वतंत्र बुद्धीस मर्यादा घातल्यासारखें व्हावयाचें; तेव्हां नेहमींच्या पद्धतिप्रमाणें एकाद्या प्रथितयश विद्वानास प्रस्तावना लिहिण्याची विनंति करण्याऐवजीं शास्त्रीबुवांनीं मजसारख्या अल्पज्ञास ज्यावेळीं शब्द टाकिला तेव्हांच त्यास नम्रपणें नकार द्यावा असें वाटूं लागलें. पण शास्त्रीबुवांशीं माझे संबंध असेच निकट आहेत कीं त्यांची आज्ञा उल्लंघन करणें मला केवळ अशक्य होय. म्हणूनच मी या कार्यास प्रवृत्त झालों आहे.

वैदिक इतिहासाच्या अनंत आकाशांत जे तेजस्वी तारे चमकून गेले, त्यांत योगीश्वर याज्ञवल्क्य पहिल्या प्रतीचे होते एवढेंच म्हटल्यानें

त्यांच्या योग्यतेचा अंश देखील यथातथ्यतेनें वर्णन केला असें होत नाहीं. अपरंपार असें वैदिक वाङ्मय ज्या ब्रह्म संप्रदाय व आदित्य संप्रदाय या दोन मोठ्या गटांत विभागलें गेलें आहे, त्यांपैकीं आदित्य संप्रदायांतील वाङ्मयाच्या नाविन्याचें जनकत्व याज्ञवल्क्य महर्षींकडे आहे, ही गोष्ट लक्षांत घेतली असतां त्यांची योग्यता किती मोठी होती या विषयीं कांहींशीं कल्पना येईल. आदित्य-प्राप्त कर्मकांडाच्या व तत्त्वज्ञानाच्या प्रसाराचें सर्व श्रेय याज्ञवल्क्य महर्षींकडेच आहे. बृहदारण्यक उपनिषदांतील "उद्यास्यन्वा अरे अहमस्मा" इत्यादि संन्यासाश्रमाच्या प्रथम उल्लेखानें दिग्दर्शित असें याज्ञवल्क्य महर्षींचें "आद्य-संन्यासित्व" शतपथांतील "नानुशिष्य हरेत्" या ठिकठिकाणीं आलेल्या उल्लेखावरून त्यांचें उच्च तऱ्हेचें आचार्यत्व इत्यादि गोष्टी लक्षांत घेतल्या असतां चारही वेदांत आदित्य संप्रदायाच्या शाखा निर्माण करण्याचें योगीश्वरांचें अलौकिक सामर्थ्य प्रतीत होतें; व त्यावरूनच त्यांनीं वैदिक वाङ्मयांत किती तरी मोठी क्रांति केली असली पाहिजे हें सहज सिद्ध होतें.

आजही आदित्य संप्रदायांतील वेदविभागांचें स्वाध्याय म्हणून परिपालन करणारा चारही वेदांचा फार मोठा ब्राह्मणवर्ग हिंदुस्थानांत सर्वत्र पसरलेला आहे. विशेषत: यजुर्वेदीयांत तर कण्वमाध्यंदिनादि शाखा बहुसंख्य आहेत. तेव्हां या संप्रदायप्रवर्तक अशा महनीय व्यक्तीचें चरित्र त्या संप्रदायांतील प्रत्येक व्यक्तीच्या नजरेसमोर असणें अत्यंत अगत्याचें आहे. या दृष्टीनें पं. श्रीधरशास्त्री यांनीं हा ग्रंथ लिहून एक मोठी उणीव भरून काढली असें म्हणावयास हरकत नाहीं.

आजपर्यंत योगीश्वर याज्ञवल्क्यांचीं कांहीं त्रोटक चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत, आणखी कांहीं प्रसिद्ध होतीलही. तेव्हां शास्त्रीबुवांनीं नुसतें हें चरित्र लिहून काढून एक मोठी उणीव दूर केली हें मला सांगावयाचें नसून, शास्त्रीबुवांचा हा ग्रंथ वैशिष्ट्यपूर्ण असा आहे, व त्या वैशिष्ट्यांनींच अशा ग्रंथाची भासणारी उणीव दूर झाली आहे, हेंच प्रस्तावनेंत दिग्दर्शित करण्याचा हेतु आहे.

या ग्रंथाचें पहिलें वैशिष्ट्य हें कीं, श्रीमद्योगीश्वर याज्ञवल्क्यांचें चरित्र लिहितांना पुढें मांडलेली माहिती विश्वसनीय आधार घेऊनच मांडली आहे. शतपथादि वैदिक वाङ्मय व स्कंदादि पुराणें इत्यादि मधून याज्ञवल्क्य

महर्षी विषयीं जी जी काय माहिती मिळेल, ती ती मुळाला न सोडतां व अतिशयोक्ति न करतां या ग्रंथांत संकलित केली आहे. दंतकथेला व निराधार आधुनिक लिखाणाला तितपतच मान दिला आहे. संकलित केलेली माहिती कोणकोणत्या स्थलीं सांपडलेली आहे याचें दिग्दर्शन करण्याकरीतां त्या त्या स्थलीं टीपा दिल्या आहेत या ग्रंथाच्या पूर्वार्धात पानोपानीं आढळणाऱ्या टीपा दिलेली माहिती किती साधार आहे हें दाखविण्यास पुरेशा आहेत. श्रीमद्योगीश्वर याज्ञवल्क्यांचें जन्मस्थल तर शास्त्रीबुवा स्वतः पाहून आले. "निवासस्थान" हें प्रकरण लिहितांना त्यांनीं या माहितीचा पूर्णपणें उपयोग केला आहे, व वडनगरच्या पौराणिक वर्णनास हल्लींही परिस्थिति कशी जुळती आहे हें उत्कृष्ट रीतीनें दाखवून दिलें आहे. अतिशयोक्तिसारख्या वाटणाऱ्या पौराणिक उताऱ्यांचा अशा रीतीनें सुंदर समन्वय केलेला पाहून प्रत्येकास समाधान वाटेल यांत शंका नाहीं.

या चरित्राचें दुसरें वैशिष्ट्य सर्वत्र दिसून येणारी संशोधनवृत्ति. इतिहासपूर्व कालांतील स्थलकालांची संगति जुळवावयाची म्हणजे संशोधनाची कास धरल्याशिवाय लेखक आपल्या जबाबदारींतून पार पडतच नाहीं. ज्या ज्या स्थलीं असा स्थलकालादिकांचा निश्चय करावयास हवा होता त्या त्या स्थलीं शास्त्रीबुवांनीं संशोधनपूर्वक तसें करण्याचा प्रयत्न केला आहे. श्रीमद्यो-गीश्वर याज्ञवल्क्यांचें निवासस्थान निश्चित करतांना शास्त्रीबुवांनीं निरनिराळ्या ग्रंथांतील उताऱ्यांचा प्रत्यक्ष परिस्थितीशीं कसा मेळ घातला हें वर सांगितलें आहेच. याज्ञवल्क्य महर्षींचा काल निश्चित करतांनाही संशोधनवृत्तीचे बरेच परिश्रम शास्त्रीबुवांनीं घेतले आहेत. पुराणांतील निरनिराळ्या उताऱ्यांची योग्य संगति लावतांना कल्पकालगणन पद्धतीही लक्षांत घेतली आहे. या मुद्यावर प्रकाश पाडणाऱ्या आधुनिक संशोधकांच्या मतांचाही परामर्श घेऊन साधक बाधक प्रमाणांनीं शकपूर्व ६००० वर्षें हा याज्ञवल्क्य महर्षींचा काल ठरविला आहे. याज्ञवल्क्य महर्षींची जन्मतिथि निश्चित करण्याचे प्रयत्नही याच वृत्तीचे द्योतक होत. पुऱ्याशा पुराव्याच्या अभावीं ही तिथि निश्चित होत नाहीं हा लेखकाचा दोष नव्हे. उलट अपुऱ्या प्रमाणांवर भरंवसा ठेवून निश्चित सांगण्यापेक्षां ही अनिश्चितताच जास्त भूषणावह आहे.

अशा रीतीनें उपलब्ध माहिती साधार संकलित करणें, संशोधनानें एखाद्या मुद्यावर जास्त प्रकाश पडतो कीं काय हें पाहणें इत्यादिकांवर या ग्रंथाचा भर असल्यानें भाषावडंबराकडे साहजिकच कमी प्रवृत्ति आहे. असल्या ग्रंथाचें सर्वस्व भाषालालित्य हें नव्हे. सत्यकथनापेक्षां भाषालालित्यास जास्त महत्व केव्हांही देतां येत नाहीं. या दृष्टीनें लांबलचक वर्णनें, काल्पनिक शब्द-चित्रें, इत्यादि प्रकारांचा अभाव असला तरी या ग्रंथास कांहींही वैगुण्य नाहीं. संकलित ज्ञान साध्या पण प्रौढ भाषेनें वाचकांना पोंचविण्याचें कार्य या ग्रंथानें चांगलें साधलें आहे.

आदित्यसंप्रदायप्रवर्तक श्रीमद्योगीश्वर याज्ञवल्क्यांचें जीवनचरित्र त्या संप्रदायांतील व्यक्तींच्या पुढें ठेवणें हा या ग्रंथाचा मुख्य हेतु तर स्पष्टच दिसत आहे. पण हें कार्य साधण्यांत इतरही पुष्कळ ज्ञान वाचकांच्या पदरांत पडणार आहे. या ग्रंथाचा उत्तरार्ध म्हणजे शुक्लयजुःशाखीय वैदिक वाङ्मय परिचय हें तर याचें महत्वाचें अंग आहे. पण त्या शिवाय याज्ञवल्क्याच्या जीवनचरित्रास अगदीं निगडित असणारीं "शाखाप्रणयन" इत्यादि माहितीनें भरलेलीं प्रकरणें पूर्वार्धांत आहेत.

पूर्वार्धाचें शेवटचें प्रकरण याज्ञवल्क्यचरित्राचा "उपसंहार" हेंही या दृष्टीनें वाचनीय आहे. या प्रकरणांत योगीश्वर–याज्ञवल्क्य–चारित्राचा निष्कर्ष काढून त्या चरित्रावर येणाऱ्या कांहीं आक्षेपांचा विचार केला आहे व कांहीं शंकास्थलांचा साधकबाधक प्रमाणांनीं निर्णय केला आहे. याच प्रकरणांत या अनुषंगानें भिन्नशाखीय भिन्नवेदीय विवाहावर चर्चा आली आहे. या बाबतींत पं. श्रीधरशास्त्री यांनीं जे विचार प्रकट केले आहेत ते सुधारक व परंपरारक्षक अशा दोन्हीही पक्षांच्या लोकांस विचारांत घेण्यासारखे आहेत. याच प्रकरणांत ज्या शाखेचें वैदिक वाङ्मय आज उपलब्ध नसेल त्याचें तें वाङमय उपलब्ध करण्यास एक उपाय सुचविला आहे. या अनुपलब्ध वाङ्मयाचा शोध प्राचीन ग्रंथसंपत्ति अवचित सांपडून लागणें कठीण दिसतें. स्वतः सुचविलेल्या पद्धतीनें शास्त्रीबुवांनीं ग्रंथांतील उतारे निवडून बरेंचसें कार्य करून ठेविल्याचें दिसतें. अनुपलब्ध शाखांचे संहितादि ग्रंथ अशा रीतीनें जगापुढें आल्यास फारच मोठें कार्य होणार आहे.

पूर्वार्धांतील "वेदसंप्रदाय" हें प्रकरण तर या ग्रंथांतील इतर माहितीचें मूळ आहे. ब्रह्म संप्रदाय व आदित्य संप्रदाय या दोन वैदिक परंपरा वाचकांच्या प्रामुख्यानें नजरेस आणण्याचें कार्य या ग्रंथानें साधिलें आहे. या दोन्हीही संप्रदायांचें सविस्तर विवरण या प्रकरणांत आलें आहे. शाखावंशपट या स्वरूपांत साररूपानें या प्रकरणांतील सर्व माहिती पूर्वार्धाच्या शेवटीं जोडिली आहे. श्रीमद्योगीश्वर याज्ञवल्क्यांचें अतिविस्तृत अवतारकार्य अशा रीतीनें शाखापटरूपांत वाचकांच्या समोर ठेविलें आहे.

ब्रह्मसंप्रदाय व आदित्यसंप्रदाय ह्या दोन भिन्न वैदिक परंपरा आहेत, तेव्हां ह्या दोन संप्रदायांतील शाखांचें परस्पर आर्त्विज्य सारखें येत नाहीं. भिन्नशाखीय व भिन्नवेदीय विवाहांत शास्त्रीयदृष्ट्या हीच अडचण आहे. या मुद्यावरच या बाबतींत वर उल्लेखिलेली पूर्वार्धाच्या उपसंहार प्रकरणांतील चर्चा आधारलेली आहे. उत्तरार्धाच्या शेवटच्या "सामाजिक प्रश्न" या प्रकरणांत पुनः एकदां ही संप्रदायभिन्नता स्पष्ट करण्याचा प्रसंग आला आहे. तेथें डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांच्या ज्ञानकोशांतील एक विधान ह्याच सिद्धांताच्या आधारानें खंडित केलें आहे.

भिन्नशाखीय भिन्नवेदीय विवाहाच्या चर्चेच्या अनुषंगानें मातुल-कन्या-परिणय व विवाहांत मातुलगोत्र-विचार यावर शास्त्रीबुवांनीं आपले विचार प्रदर्शित केले आहेत. मातुलकन्यापरिणय ही गोष्ट वस्तुतः अशास्त्रीय आहे. ज्या शाखांत मातुलकन्या-परिणय करणें गौण समजलें जात नाहीं त्यांस तसें करण्यास शास्त्रापेक्षां परंपरेचाच पाठिंबा अधिक आहे.

या दृष्टीनें विचार करतां 'मातुलकन्या-परिणयाच्या पद्धतीचा त्याग केला असतां एकाच संप्रदायांतील भिन्नशाखीय भिन्नवेदीय विवाह शास्त्रीय होतील' इत्यादि शास्त्रीबुवांनीं मांडलेलीं मतें शास्त्रमार्गानुगामी लोकांना विचारार्ह आहेत यांत शंका नाहीं.

उत्तरार्धांत असलेल्या आणखी कांहीं महत्वाच्या व विचारार्ह गोष्टींमध्यें 'ब्राह्मणग्रंथांचें वेदत्व' व 'शाखापरत्वानें स्मृतिप्रामाण्य' ह्यांचें प्रतिपादन ध्यानांत धरण्याजोगें आहे.

"ब्राह्मणग्रंथ" या प्रकरणांत "ब्राह्मणग्रंथाचें वेदत्व" हा विषय सांगोपांग चर्चिला आहे. वैदिक परंपरेंतील सर्व आचार्य, भाष्यकार व

टीकाकार निःसंदिग्ध रीतीनें हे ग्रंथ श्रुति म्हणून प्रमाण मानीत आले आहेत. परंतु आर्यसमाजाचे पुरस्कर्ते त्यांस श्रुतित्व देऊन प्रमाण मानीत नाहींत. या सिद्धांतास अनुसरून प्रो. भगवद्दत्त इत्यादिकांनीं ब्राह्मणग्रंथांच्या वेदत्वास विरोधी असे जे मुद्दे मांडले आहेत त्यांचा या प्रकरणांत परामर्श घेतला आहे. या बाबतींत शास्त्रीबुवांनीं दिलेलीं उत्तरें पटतील अशींच आहेत.

" स्मृति " या प्रकरणाच्या उपोद्घातांत 'शाखापरत्वानें स्मृतिप्रामाण्य' हा सिद्धांत सोदाहरण सिद्ध करून दाखविला आहे. याच प्रकरणांत कात्यायन स्मृतीच्या परिचय प्रसंगानें लुप्त स्मार्त वाङ्मयाची संगति कशी लावावी या संबंधी मार्गाची आंखणी करून दाखविली आहे. अर्थातच तेथें कात्यायन स्मृति हीच उदाहरणार्थ घेतली आहे. हल्लीं उपलब्ध असलेली कात्यायनस्मृति ही खरी कात्यायनस्मृति नव्हेच. तर ती कात्यायनाची सामवेदीय सूत्रावरील कर्मप्रदीपिका आहे. तेव्हां कात्यायनस्मृति ही स्मृति या स्वरूपांत पाहिजे असल्यास निबंध ग्रंथांतील उतारे निवडण्याशिवाय दुसरा उपाय नाहीं.

उत्तरार्धाचें शेवटचें प्रकरण "सामाजिक प्रश्न" हें अत्यंत महत्वाचें—विशेषतः शुक्ल यजुःशाखीयांना अत्यंत महत्वाचें आहे. या प्रकरणांत आदित्य संप्रदाय, त्यांतल्या त्यांत शुक्लयजुःशाखा यांचा जाणून बुजून वा चुकून अधिक्षेप करणाऱ्या विधानांचा परामर्श घेतला आहे. त्यांपैकीं "शुक्लयजुर्वेदीय ब्राह्मणांचा विवाहदृष्ट्या प्रवेश जुन्या ब्राह्मणांत झाला नाहीं" या ज्ञानकोशांतील विधानासंबंधीं उल्लेख वर भिन्नशाखीय व भिन्नवेदीय विवाह या संबंधांत आला आहेच. ज्ञानकोशांतील आणखी ज्या आक्षेपांचा परामर्श शास्त्रीबुवांनीं घेतला आहे, त्यांपैकीं स्वाहा, स्वधा इत्यादि शब्दांच्या निरर्थकत्वासंबंधींच्या व 'ष्' चा 'ख्' इत्यादि उच्चारपद्धतीवरून शुक्लयजुःशाखीयांचें कठीण उच्चारांचे बाबतींतील असामर्थ्याविषयींच्या आक्षेपांचीं शास्त्रीबुवांनीं दिलेलीं उत्तरें सर्वमान्य होण्यासारखीं आहेत. ज्ञानकोशांतील इतर विधानांवरील शास्त्रीबुवांनीं दिलेल्या उत्तरांच्या बाबतींत सर्व विद्वानांचें मतैक्य झालें नाहीं, तरी त्यांनीं दिलेलीं उत्तरें विचारार्ह आहेत हें खास. याच प्रकरणांत आहिताग्नि राजवाडे यांनीं "शूद्रा वाजसनेयिनः" या वचनाचा जो विपर्यस्त अर्थ लाविला त्याचेंही सोपपत्तिक खंडन केलें आहे.

याज्ञवल्क्यचरित्रासंबंधीं जीं वैशिष्ट्यें वर सांगितलीं तीं सर्व उत्तरार्धांतही दृष्टीस पडतात. शुक्लयजुःशाखीय वैदिक वाङ्मयापैकीं ज्या ज्या ग्रंथाचा परिचय करून दिला आहे, त्या त्या ग्रंथाच्या कर्त्याविषयीं माहिती ग्रंथाच्या आद्यंताच्या उताऱ्यांमधून दिली आहे. त्या ग्रंथाच्या महत्त्वाबरोबरच त्याचा कालानुक्रम, ग्रंथकार इत्यादि माहिती परिचयाचे दृष्टीनें आवश्यकच आहे. या भागांत जेवढ्या ग्रंथांचा परिचय दिला आहे, तेवढ्यांची नुसती तोंड ओळख करून घेऊनच वाचकांनीं कृतकृत्यता मानूं नये अशी शास्त्रीबुवांची इच्छा असली तरी एवढ्या ग्रंथसंपत्तीचा व्यासंग करणें आजकाल बहुतेकांस अशक्य झालें आहे; तेव्हां अशा वाचकांची जिज्ञासा तृप्त करून त्यांस आपल्या संप्रदायांतील ग्रंथसंपत्तीची ओळख करून देण्यास उत्तरार्ध फारच उपयुक्त आहे.

अर्थज्ञानयुक्त अशा वैदिक वाङ्मयाच्या व्यासंगाची गोष्ट जरी क्षणभर बाजूला ठेवली, तरी घनपाठी रीतीनें जे आपापल्या शाखासंहितांचें अध्ययन करीत आहेत, अशाही विद्वानांचा दिवसेंदिवस लोप होत चालला आहे. प्राचीन विद्येला बदलल्या काळाबरोबर मान राहिला नाहीं हें जरी अशा विद्वानांच्या विरलतेला मुख्य कारण असलें, तरी अशा पद्धतीनें अध्ययन करणारांमधील एक वैगुण्यही या दुर्दशेला कारण आहे. ब्राह्मणपाठी रीतीनें अध्ययन करणाऱ्या ब्राह्मणांनीं श्रौतस्मार्त याज्ञिकीचीं धार्मिक कृत्यें करविण्याचें पतकरून समाजाची एक गरज भागविली व त्यांत त्यांच्या चरितार्थाचीही सोय झाली. परंतु घनपाठी रीतीनें अध्ययन करणाऱ्यांनीं अशा तऱ्हेचें लोकांना नेहमीं उपयोगी पडेल असें एकादें कार्य उचलल्याचें दिसत नाहीं. उत्तरार्धांत परिचय करून दिलेल्या ग्रंथांपैकीं संहितासंबद्ध ग्रंथांतून वेदाच्या पारायणादिकांसंबंधीं विधिविधानें फलश्रुतीसह दिलेलीं आहेत, त्यांचा अंगीकार करून हीं कार्यं कर्में जनतेकरितां करीत गेल्यास वैदिक वाङ्मयाच्या संरक्षणाबरोबरच यांच्या चरितार्थाचीही सोय होईल व जनतेस अवैदिक उपासनापद्धतीपासून वैदिक मार्गाकडे वळविल्याचें श्रेय मिळेल. या दृष्टीनेंही उत्तरार्धाचा मार्गदर्शक म्हणून उपयोग होण्यासारखा आहे.

या ग्रंथाचीं परिशिष्टेंही पूर्वार्ध उत्तरार्धाप्रमाणेंच वैशिष्ट्यपूर्ण आहेत. परिशिष्टांपैकीं पाहिलीं चार शाखांचे वंशवृक्ष इत्यादिकांकरितां खर्चीं घातलीं असून पुढील पांचांत श्रीमद्योगीश्वर याज्ञवल्क्य या अंशावताराचें पूजाविधान

समग्र दिलें आहे. या पूजाविधानांत पूजाविधि व आरति, स्तोत्र, द्वादशनाम, अष्टोत्तरशतनाम आणि सहस्रनाम यांचा समावेश होतो. ठिकठिकाणीं दरवर्षी होणाऱ्या श्रीमद्योगीश्वर याज्ञवल्क्यांच्या महोत्सवांत योगीश्वरांच्या पूजाकल्पाची जी उणीव भासत होती, ती या परिशिष्टांनीं दूर होईल. शेवटचें परिशिष्ट हें उत्तरार्धाचा सारांश आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. यांत उत्तरार्धांत परिचय करून दिलेल्या ग्रंथांची सूचि दिली आहे.

अशी या ग्रंथाची एकंदर रूपरेखा आहे. शाखाप्रवर्तक ऋषींच्या चरित्राबरोबर तत्प्रवर्तित वाङ्मयौघाच्याही संकलनानें पूर्वार्ध आणि उत्तरार्ध यांचा मनोरम संगम साधिला आहे.

अशा या ग्रंथाचा जिज्ञासू वाचक आदर करतील यांत मला तर संदेह वाटत नाहीं. ग्रंथाविषयीं अधिक परिचय करून देण्यांत वाचकांना गुंतवून मूळ ग्रंथापासून दूर ठेवणें योग्य नाहीं. श्रीमद्योगीश्वर चरणांच्या कृपाप्रसादानें त्यांच्या तेजस्वी ब्राह्मण्याची स्फूर्ति तदनुयायांमध्यें होऊन ती संघटित तेजस्विता शुक्लयजुःशाखीय विद्वद्मूर्धन्य मंडनमिश्र यांनीं म्हटल्या-प्रमाणें स्वर्गापवर्ग प्रकाशित करण्यास समर्थ होवो अशी प्रार्थना करून पुरें करतों.

पुरुषोत्तम दामोदर चंद्रात्रे



भगवान् श्री सूर्यनारायण



श्रीमंत सरकार बाळासाहेब पंतप्रतिनिधी संस्थान औंध
यांचे उदार आश्रयाखालीं तयार झालेली मूर्ति
नासिक पंचवटी.

वाचकवृंद सदरील पुस्तकाचा संग्रह करून एकवार समग्र वाचन जर करील तरी सुद्धां माझे सर्व परिश्रम सफल झाले असें मी समजेन. ही माझी आशा जगद्गुरु याज्ञवल्क्य पूर्ण करतील यांत मला मुळींच संदेह वाटत नाहीं असो.

विनंति केल्याप्रमाणें ह्या पुस्तकाचे समग्र मननपूर्वक वाचन करून श्री. रावसाहेब गोविंद सदाशिव आपटे गणकचूडामणी माजी प्रिन्सिपाल माधव कॉलेज सुपरिटेन्डेंट वेधशाळा उज्जैन, यांनीं याज्ञवल्क्याच्या कालनिर्णायक प्रकरणावर आपला अभिप्राय व्यक्त केला. तसेंच श्री. रा. रा. केशव नारायण डांगे एम्. ए. बी. टी उज्जैन यांनीही समग्र पुस्तकावर आपला अभिप्राय व्यक्त केला. त्याबद्दल या उभयतांचे जितके आभार मानावे तितके थोडेंच आहेत.

प्रस्तुतचे चरित्राचे कामीं पंढरपूर येथील बृहन्महाराष्ट्रीय माध्यंदिन संस्थासंमेलन मध्यवर्ति मंडळाच्या चालकांनीं ठराव पास करून प्रोत्साहित केलें त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

तसेंच श्री. रा. रा. धर्मकार्यधुरंधर गोविंद आबाजी शौचे, पेन्शनर ॲ. डे. ए. इ. नासिक, श्री.पुरुषोत्तम रामचंद्र बुरकुले, बी. ए. एल् एल्.बी व श्री. रा. रा.दत्तात्रय बळवंत गंबाळे पंढरपूर प्रभृति मंडळींनीं ज्या उपयुक्त सूचना व सहाय्य केलें त्याबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहे. विशेषतः आमचे प्रियमित्र श्री. रा. रा. दत्तात्रय विनायक टोककर उज्जैन यांनीं लेखनादि कार्यांत आपला अमूल्य वेळ खर्च करून वारंवार उज्जैनहून नासिकला येऊन फारच मोठें सहाय्य केलें ह्या बद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

श्री रा. रा. पुरुषोत्तम दामोदर चंद्रात्रे एम्. ए. यांनीं आपल्या अनेक व्यासंगांना बाजूस सारून सदर पुस्तकास आपल्या प्रस्तावनेनें अलंकृत केलें याबद्दल ते धन्यवादास पात्र आहेत.

ह्या पुस्तकाचे मुद्रणाचे कामीं व बाह्याभ्यंतर पुस्तक सुंदर करण्याचे कामीं विज्ञान प्रेसचे मालक श्री. रा. दामोदर महादेव चंद्रात्रे यांनीं जे साहाय्य केलें तें अवर्णनीय आहे यांत संदेह नाहीं.

शेवटीं पुस्तकांत,नजरचुकीनें मुळांतच अगर मुद्रण करतांना कांहीं दोष राहिले असल्यास विद्वान् वाचकांनीं आम्हांस कळविण्याची कृपा करावी, म्हणजे द्वितीयावृत्तीचे वेळीं ते दोष दूर करण्याचा प्रयत्न करतां येईल. एवढी प्रार्थना करून हें अल्प निवेदन पुरें करितों.

शके १८५८
श्रीक्षेत्र नासिक

श्रीधर अण्णाशास्त्री वारे

# विद्वानांचे अभिप्राय

रावसाहेब गोविंद सदाशिव आपटे B. A. गणकचूडामणि
माजी प्रिन्सिपॉल माधव कॉलेज,
सुपरिन्टेन्डन्ट वेधशाळा, उज्जैन.

श्री. रा. रा. पं. श्रीधर अण्णाशास्त्री वारे काव्यतीर्थ, मीमांसक, विद्याभरण यांनीं लिहिलेलें 'याज्ञवल्क्यचरित्र' पुस्तक, विशेषतः त्यांतील 'याज्ञवल्क्य कालनिर्णय प्रकरण', मननपूर्वक वाचलें; त्या संबंधीं माझे विचार मी खालीं नमूद करीत आहे.

पं. वारे शास्त्री यांनीं याज्ञवल्क्याचें कालनिर्णय प्रकरण अत्यंत संशोधन करून चिकित्सापूर्वक लिहिलें आहे. एवढेंच साधन याज्ञवल्क्याच्या कालनिर्णयासंबंधीं प्रस्तुत उपलब्ध आहे, असें मला वाटतें. कल्पपरिगणन पद्धति सुंदर मांडली आहे. परंतु कल्पकाल, सिद्धांतशिरोमणि आर्यभट्टाच्या वेळेपासून मानण्यांत येतो. वेदांग ज्योतिषांत याचा उल्लेख कोठें नाहीं. पौराण कालांतच याचा उल्लेख आढळतो. साधारणतः ३०० ए. डी. वर्षांपूर्वींची कल्पकालगणन पद्धति मानण्यांत येते. यावरून कल्पकाल पद्धति फार जुनी नसून अलीकडीलच आहे. तेव्हां तीस महत्त्व देतां येत नाहीं.

सारांश :– कालनिर्णय करते वेळीं श्री. वारे शास्त्री यांनीं निरनिराळीं मतें निर्दिष्ट करून आपला काल ६००० वर्षांपूर्वींचा ठरविला आहे. तो सध्यां तरी मान्य करण्यासारखा आहे. कारण, यापेक्षा जास्त निश्चय करितां येण्यासारखें प्रमाण मिळत नाहीं.

एकंदरींत ही चर्चा विद्वानांना विचारप्रोत्साहक होईल अशा प्रकारची आहे.

ता. ११।४।१९३५
उज्जयिनी, सेंट्रल इंडिया. } गोविंद सदाशिव आपटे

श्री. केशव नारायण डांगे एम्. ए. बी. टी.

प्रोफेसर मंदोसर कॉलेज,

पं. काव्यतीर्थ, मीमांसक, विद्याभरण, श्रीधर अण्णाशास्त्री वारे नासिक यांस,

आजकाल लहानसहान व्यक्ति सुद्धां चरित्राचे विषय बनतात. पुष्कळ लोक आपआपल्या कुलांचा इतिहास लिहिण्यांत गर्क झाले आहेत. परंतु अशा अनेक कुलांचे 'मूळ आरंभक' व्यास, मनु, वसिष्ठ, याज्ञवल्क्य, जनक, प्रभृती जे गोत्रप्रवर्तक व शाखाप्रवर्तक ऋषि होऊन गेले, त्यांचीं चरित्रें लिहिण्याचा प्रयत्न कोणीच करीत नाहीं. विशेषतः ज्यांनीं वैदिक संप्रदायांत एके काळीं फार मोठी व चिरकाल टिकणारी महत्त्वाची क्रांती घडवून आणली त्या आदित्य संप्रदायगत वेदचतुष्टय प्रवर्तक याज्ञवल्क्याच्या चरित्राची उणीव भासत होती. ती आपण भरून काढली, हा आपला उपक्रम स्तुत्य आहे.

प्रस्तुतचें चरित्र वाचीत असतां वाचकाची एक विशिष्ट मनोवृत्ति आणि दृष्टिकोण असावा लागतो. क्षणांत प्रसन्नता तर क्षणांत गंभीरता, क्षणांत विचाराची तंद्रा, तर क्षणांत अद्भुतता, अशा अनेक संवेदनांतून वाचकाला पार पडावयाचें असतें. तरी पण ऋषिकालीन इतिहासाची अवनति होत असलेल्या कालांतहि आपण कृतज्ञतापूर्वक ऋषिऋण फेडित आहोंत, ही भावना लेखकाप्रमाणेंच वाचकाची झाल्याशिवाय राहणार नाहीं.

पाश्चात्यांच्या काटेकोर संशोधनांत मग्न असलेल्या लोकांचीहि दृष्टि आमच्या श्रुतिस्मृतिपुराणोक्त याज्ञवल्क्यासारख्या महापुरुषाकडे लागेल असेंच ह्या पुस्तकाचें लिखाण झालें आहे.

ऋषींच्या आश्रमांत यज्ञ चालला असतां मधल्या विश्रांतीच्या काळांत आपण वार्तालाप करीत आहोंत, असा भास हें पुस्तक वाचतांना होतो.

ह्या पुस्तकाच्या उत्तरार्धांतील वैदिक वाङ्मयाच्या माहितीचें संकलनहि ग्रंथकर्त्याच्या विद्वत्तेस साजेसेंच झालें आहे. वैदिक वाङ्मयाचें वर्णन करणारीं फारच थोडीं पुस्तकें मराठींत आहेत. त्यांत ह्या उत्तरार्धानें चांगलीच भर पडेल. समतोलपणाचें सोंग घेणाऱ्या विद्वानांचा परामर्श ग्रंथकर्त्यानें खरोखरच समतोल बुद्धीनें घेतला हें त्यास भूषणावहच आहे.

निरनिराळ्या प्रसंगांचीं चित्रें व विविध परिशिष्टें जोडून पुस्तकाची सजावट फारच उत्तम संपादिली आहे.

ता. १४-५-१९३५. इ.
उज्जयिनी, सेंट्रल इंडिया.

केशव नारायण डांगे.



# आधार ग्रंथ

## श्रीमद्योगीश्वर याज्ञवल्क्य चरित्र


१ प्रतिज्ञापरिशिष्ट
२ स्कंदपुराण नागरखंड
३ गुजराथी साहित्यपरिषदेचा रिपोर्ट निबंधसंग्रह
४ नासिक पांडवगुंफेवरील शिलालेख
५ कविवल्लभकृत नागरोत्पत्ति
६ वडनगर येथील राजा कुमारपाळ याचा प्रशस्ति शिलालेख
७ वल्लभी ताम्रपट
८ व्होर जटाशंकर जनागड यांच्या शांखायन नांवाच्या हस्तलिखित पोथिवरील कालोल्लेखन
९ श्रुति
१० श्रीमद्भगवद्गीता
११ पुरुषार्थचिंतामणि कालखंड
१२ मीमांसा जैमिनीया
१३ न्याय
१४ ब्रह्मसूत्र व शांकरभाष्य
१५ वायुपुराण
१६ वेदकालनिर्णय ( चुलेटकृत )
१७ कातीय शुल्बसूत्र व कर्कभाष्य
१८ प्रशांतराग प्रभावदत्त कुशली याचा ताम्रपट
१९ शतपथ ब्राह्मण कां. ७ । १० । १३ । १४
२० चतुर्विंशतिमत भट्टोजी दीक्षितकृत व्याख्यान
२१ म. म. दुर्गाप्रसादकृत साहित्य-दर्पण भूमिका
२२ पं. मुकुंद झाकृत निरुक्तलघुविवृ-ति भूमिका
२३ ऐतरेयब्राह्मण व सायणभाष्य
२४ महाभारत शांतिपर्व
२५ भारतीय ज्योतिःशास्त्राचा इतिहास दीक्षितकृत
२६ महाभारताचा उपसंहार
२७ केतकरकृत नक्षत्रविज्ञान
२८ लोकमान्यांचे ओरायन
२९ दप्तरीकृत कालनिर्णय
३० श्रीमद्भागवत स्कंध ९ । १२
३१ श्रीमद्देवीभागवत
३२ बह्वृचसर्वानुक्रम व षड्गुरूचें भाष्य
३३ शौनकीय चरणव्यूह
३४ जाबाल संहिता
३५ विष्णुपुराण अंश ३ । ५
३६ बृहदारण्यक व शांकरभाष्य
३७ चिदंबर दीक्षितकृत याज्ञवल्क्य चरित्र
३८ कृष्णसूरिकृत वेदतत्त्वनिरूपण
३९ कण्वसंहिता व सायणभाष्य
४० आत्मपुराण व काकाराम पंडितां-ची टीका
४१ आदित्यपुराण उत्तरखंड

४२ सूर्यपुराण
४३ ज्ञानंदस्वामिकृत याज्ञवल्क्यपूजा
४४ वैयासिकचरणव्यूह व तद्भाष्य
४५ अक्कलकोटस्वामीमहाराजांचें चरित्र गुरुलीलामृत
४६ संशयतिमिरदिवाकर
४७ भागवतलाल लक्ष्मीपतिशास्त्रीकृत-याज्ञवल्क्यचरित्र
४८ भर्तृहरी नीतिशतक
४९ माध्यंदिन संहिता व उवट-महीधरभाष्य
५० अथर्ववेद
५१ ब्रह्मांडपुराण पूर्वार्ध
५२ वराहपुराण
५३ निरुक्त व दुर्गाचार्यवृत्ति
५४ आर्यविद्यासुधाकर
५५ पातंजल महाभाष्य
५६ मुक्तिकोपनिषद्
५७ बैजवाप गृह्यसूत्र
५८ वाचस्पत्य कोष
५९ कातीय प्रातिशाख्य व अनंतदेव भाष्य
६० गोपीनाथभट्टी
६१ कथासरित्सागर
६२ महाभारत सभापर्व
६३ ब्रह्मपुराणांतर्गत गोदामाहात्म्य
६४ यजुर्वेदकल्पतरु
६५ तंत्रवार्तिक
६६ कातीय हौत्रसूत्र
६७ याज्ञवल्क्यस्मृति व विश्वरूपाचार्य-कृत टीका बालक्रीडा
६८ स्थपतिगर्गपद्धति
६९ कात्यायनीय श्रौतसूत्र व पितृभूति, कर्क, अनंदेव, यांचीं भाष्यें
७० प्रातिशाख्यदीपिका
७१ सनातनधर्मप्रदीप शुद्धिप्रकाश
७२ आब्धिनौयानमीमांसा
७३ याज्ञवल्क्यीया गार्गीगीता
७४ स्कंदपुराण अवंतिखडांतर्गत रेवा-खंड
७५ आह्निकसूत्रावलि
७६ कातीय सर्वानुक्रम व अनंतदेव भाष्य
७८ गार्गीआख्यान ओवीबद्ध
७७ धर्मतत्त्वनिर्णय
७९ महार्णव
८० पराशरस्मृति
८१ हरिवंश

## शुक्लयजुर्वेद वैदिक-वाङ्मय परिचय

१ सायणीय ऋग्वेदभाष्य
२ मनुस्मृति व कुल्लूक टीका
३ स्मृति
४ सायणीय ऐतरेय भाष्य
५ आपस्तंब श्रौतसूत्र
६ पाणिनिसूत्र
७ ऋक्प्रातिशाख्य व षड्गुरुकृत भाष्य

८ मुंडकोपनिषद्
९ कात्यायनप्रातिशाख्य अनंतदेवभा०
१० माध्यंदिनसंहिता उवटमहीधर भा०
११ जटापटल व्याडिकृत
१२ तैत्तिरीयसंहिता व सायण आणि मस्करी यांचीं भाष्यें
१३ कण्वसंहिता व सायणभाष्य
१४ शतपथब्राह्मण व सायणभाष्य
१५ वाचस्पत्य कोष
१६ जैमिनिसूत्र
१७ मेदिनी कोष
१८ ऐतरेयब्राह्मण
१९ शतपथब्राह्मण व सायणभाष्य
२० निरुक्त व दुर्गाचार्यवृत्ति
२१ विष्णुधर्मोत्तर उत्तरखंड
२२ महाभारत उद्योगपर्व
२३ सत्याषाढ श्रौतसूत्र
२४ कातीय प्रतिज्ञापरिशिष्ट
२५ बौधायन गृह्यसूत्र
२६ बौधायन धर्मसूत्र
२७ कौशिक गृह्यसूत्र
२८ पारस्कर गृह्यसूत्र
२९ शाबरभाष्य
३० तंत्रवार्तिक
३१ मेधातिथि मनुव्याख्या
३२ बृहदारण्यकभाष्य वार्तिक
३३ शास्त्रदीपिका मयूखमालिका व्या०
३४ श्राद्धसूत्र व भाष्य
३५ याज्ञवल्क्यस्मृति व्याख्येसह
३६ शूद्रकमलाकर
३७ विद्याधरमिश्र श्रौतसूत्रभूमिका
३८ दयानंदीय ऋग्वेदभाष्य
३९ महामोहविद्रावण
४० सनातनधर्मप्रदीप प्रमाणप्रकाश
४१ वैदिकवाङ्मयका इतिहास
४२ बृहदारण्यक व शांकरभाष्य
४३ गोपथब्राह्मण
४४ कातीय भाषिकसूत्र व भाष्य
४५ कात्यायनीय वार्तिक
४६ महाभारत शांतिपर्व
४७ अध्वरमीमांसा कुतूहलवृत्ति
४८ आश्वलायन श्रौतसूत्र
४९ पारस्कर गृह्यसूत्र भाषांतर
५० स्कंदपुराण नागरखंड
५१ मंत्रभ्रांतिहर
५२ कात्यायन श्रौतसूत्र कर्कभाष्य व पितृभूतिभाष्य
५३ ऋक्सर्वानुक्रम व षड्गुरुभाष्य
५४ कर्मप्रदीपिका
५५ इष्टकापुराण व भाष्य
५६ माध्यंदिन शाखाप्रकाश
५७ ज्ञानकोष वेदविभाग
५८ प्राचीनचरित्रकोष
५९ कण्व शतपथब्राह्मण
६० नागरसर्वस्व
६१ भारतीय साम्राज्याचा इतिहास
६२ आर्षानार्षसूत्रविवेक
६३ ब्रह्मपुराण

श्रीमत्पूज्यपादयोगीश्वरयाज्ञवल्क्यब्रह्मर्षिचरणकमल —

## समर्पणम्

स्वस्ति श्रीमद्विविधानवद्यविद्याविनोदविचारसदाचारचरणपरिचितवरिष्ठप्रतिष्ठाधिष्ठितगरिष्ठयशःशरच्चंद्रकरनिकरधवलीकृताखंडभूमण्डलेषु ऋग्यजुरादिवेदवेदांगादिकाश्रितागमनिगमरहस्याविवेचनोदधिमंथनक्षममतिमंदरमथिताधिगततत्त्वबोधामृतेषु अखंडभूमंडलाखंडलसमानसन्मान्यराजराजजनकादिभूपालमौलिलालितललामभूतमुकुटमणिरत्नरंजितपादपद्मपीठेषु न्यायमीमांसाद्यनेकशास्त्राध्ययनाध्यापनबलोदितवेदांतविज्ञानविजृंभितयोगाभ्यासजनितब्रह्मानंदानुभवसत्तपःसिद्धिफलकरतलामलकेषु लौकोत्तरानेकाश्चर्यकारककर्मनिचयक्षमत्वचकितसकललोकमतिषु श्रौतस्मार्तसनातनीयसद्धर्मोन्नतिकारकसाद्विद्याभिवृद्धिसंपादनार्थनैकविधधार्मिकसदाचरणसमुत्तेजकाविधिविधानपथदर्शकग्रंथकृत्सु परमतपोधनस्य श्रीमद्वाजसेनमहर्षेस्तनुजेषु दिगंतसत्कीर्तियोगीश्वरश्रीमद्याज्ञवल्क्य इति शोभनाख्येषु श्रीमद्रविकुलावतंसरामचंद्रचरणारविंदरजोभिपूतश्रीगोदावरीतीरपरिसरालंकृतश्रीमन्नासिकं महापवित्रक्षेत्रमधिवासिनो वारे इत्युपनामकस्य श्रौतस्मार्तकर्मानुष्ठानविधिसकलकौशल्यलब्ध "वैदिकतिलक" इतिपदवीधारिण अण्णाशास्त्रिणः पुत्रेण काव्यतीर्थमीमांसकेन श्रीधरशास्त्रिणा शतशः प्रणतितति कृत्वा प्राचीनार्वाचीनलघुगुरुनानाविधपुस्तकान्यालोड्य मधुमाक्षिकावदश्रांतपरिश्रमेण महर्षेश्चरित्रोपयोगिसारसंग्रहसमाविष्टं शुक्लयजुर्वेदवैदिकवाङ्मयपरिचयसहितं पूजाद्यनेकपरिशिष्टयुतं चेदं पुस्तकं निखिलविद्याविदाचार्यवर्यचूडामणिमरीचिपूजितपुण्यश्लोकयोगीश्वरपादकमलयुगले सप्रश्रयं समर्प्यते ।

श्रीमद्योगीश्वरचरणारविंदमकरंदभृंगायमाणः

श्रीधरशास्त्री वारे

# अनुक्रमणिका

त्यांच्या योग्यतेचा अंश देखील यथातथ्यतेनें वर्णन केला असें होत नाहीं. अपरंपार असें वैदिक वाङ्मय ज्या ब्रह्म संप्रदाय व आदित्य संप्रदाय या दोन मोठ्या गटांत विभागलें गेलें आहे, त्यांपैकीं आदित्य संप्रदायांतील वाङ्मयाच्या नाविन्याचें जनकत्व याज्ञवल्क्य महर्षींकडे आहे, ही गोष्ट लक्षांत घेतली असतां त्यांची योग्यता किती मोठी होती या विषयीं कांहींशीं कल्पना येईल. आदित्य-प्राप्त कर्मकांडाच्या व तत्त्वज्ञानाच्या प्रसाराचें सर्व श्रेय याज्ञवल्क्य महर्षींकडेच आहे. बृहदारण्यक उपनिषदांतील "उद्यास्यन्वा अरे अहमस्मा" इत्यादि संन्यासाश्रमाच्या प्रथम उल्लेखानें दिग्दर्शित असें याज्ञवल्क्य महर्षींचें "आद्य-संन्यासित्व" शतपथांतील "नानुशिष्य हरेत्" या ठिकठिकाणीं आलेल्या उल्लेखावरून त्यांचें उच्च तऱ्हेचें आचार्यत्व इत्यादि गोष्टी लक्षांत घेतल्या असतां चारही वेदांत आदित्य संप्रदायाच्या शाखा निर्माण करण्याचें योगीश्वरांचें अलौकिक सामर्थ्य प्रतीत होतें; व त्यावरूनच त्यांनीं वैदिक वाङ्मयांत किती तरी मोठी क्रांति केली असली पाहिजे हें सहज सिद्ध होतें.

आजही आदित्य संप्रदायांतील वेदविभागांचें स्वाध्याय म्हणून परिपालन करणारा चारही वेदांचा फार मोठा ब्राह्मणवर्ग हिंदुस्थानांत सर्वत्र पसरलेला आहे. विशेषत: यजुर्वेदीयांत तर कण्वमाध्यंदिनादि शाखा बहुसंख्य आहेत. तेव्हां या संप्रदायप्रवर्तक अशा महनीय व्यक्तीचें चरित्र त्या संप्रदायांतील प्रत्येक व्यक्तीच्या नजरेसमोर असणें अत्यंत अगत्याचें आहे. या दृष्टीनें पं. श्रीधरशास्त्री यांनीं हा ग्रंथ लिहून एक मोठी उणीव भरून काढली असें म्हणावयास हरकत नाहीं.

आजपर्यंत योगीश्वर याज्ञवल्क्यांचीं कांहीं त्रोटक चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत, आणखी कांहीं प्रसिद्ध होतीलही. तेव्हां शास्त्रीबुवांनीं नुसतें हें चरित्र लिहून काढून एक मोठी उणीव दूर केली हें मला सांगावयाचें नसून, शास्त्रीबुवांचा हा ग्रंथ वैशिष्ट्यपूर्ण असा आहे, व त्या वैशिष्ट्यांनींच अशा ग्रंथाची भासणारी उणीव दूर झाली आहे, हेंच प्रस्तावनेंत दिग्दर्शित करण्याचा हेतु आहे.

या ग्रंथाचें पहिलें वैशिष्ट्य हें कीं, श्रीमद्योगीश्वर याज्ञवल्क्यांचें चरित्र लिहितांना पुढें मांडलेली माहिती विश्वसनीय आधार घेऊनच मांडली आहे. शतपथादि वैदिक वाङ्मय व स्कंदादि पुराणें इत्यादि मधून याज्ञवल्क्य

महर्षी विषयीं जी जी काय माहिती मिळेल, ती ती मुळाला न सोडतां व अतिशयोक्ति न करतां या ग्रंथांत संकलित केली आहे. दंतकथेला व निराधार आधुनिक लिखाणाला तितपतच मान दिला आहे. संकलित केलेली माहिती कोणकोणत्या स्थलीं सांपडलेली आहे याचें दिग्दर्शन करण्याकरीतां त्या त्या स्थलीं टीपा दिल्या आहेत. या ग्रंथाच्या पूर्वार्धांत पानोपानीं आढळणाऱ्या टीपा दिलेली माहिती किती साधार आहे हें दाखविण्यास पुरेशा आहेत. श्रीमद्योगीश्वर याज्ञवल्क्यांचें जन्मस्थल तर शास्त्रीबुवा स्वतः पाहून आले. "निवासस्थान" हें प्रकरण लिहितांना त्यांनीं या माहितीचा पूर्णपणें उपयोग केला आहे, व वडनगरच्या पौराणिक वर्णनास हल्लींही परिस्थिति कशी जुळती आहे हें उत्कृष्ट रीतीनें दाखवून दिलें आहे. अतिशयोक्तिसारख्या वाटणाऱ्या पौराणिक उताऱ्याचा अशा रीतीनें सुंदर समन्वय केलेला पाहून प्रत्येकास समाधान वाटेल यात शंका नाहीं.

या चरित्राचें दुसरें वैशिष्ट्य सर्वत्र दिसून येणारी संशोधनवृत्ति. इतिहासपूर्व कालांतील स्थलकालांची संगति जुळवावयाची म्हणजे संशोधनाची कास धरल्याशिवाय लेखक आपल्या जबाबदारींतून पार पडतच नाहीं. ज्या ज्या स्थलीं असा स्थलकालादिकांचा निश्चय करावयास हवा होता त्या त्या स्थलीं शास्त्रीबुवांनीं संशोधनपूर्वक तसें करण्याचा प्रयत्न केला आहे. श्रीमद्योगीश्वर याज्ञवल्क्यांचें निवासस्थान निश्चित करतांना शास्त्रीबुवांनीं निरनिराळ्या ग्रंथांतील उताऱ्यांचा प्रत्यक्ष परिस्थितीशीं कसा मेळ घातला हें वर सांगितलें आहेच. याज्ञवल्क्य महर्षींचा काल निश्चित करतांनाही संशोधनवृत्तीचे बरेच परिश्रम शास्त्रीबुवांनीं घेतले आहेत. पुराणांतील निरनिराळ्या उताऱ्यांची योग्य संगति लावतांना कल्पकालगणन पद्धतीही लक्षांत घेतली आहे. या मुद्यावर प्रकाश पाडणाऱ्या आधुनिक संशोधकांच्या मतांचाही परामर्श घेऊन साधक बाधक प्रमाणांनीं शकपूर्व ६००० वर्षें हा याज्ञवल्क्य महर्षींचा काल ठरविला आहे. याज्ञवल्क्य महर्षींची जन्मतिथि निश्चित करण्याचे प्रयत्नही याच वृत्तीचे द्योतक होत. पुऱ्याशा पुराव्याच्या अभावीं ही तिथि निश्चित होत नाहीं हा लेखकाचा दोष नव्हे. उलट अपुऱ्या प्रमाणांवर भरंवसा ठेवून निश्चित सांगण्यापेक्षां ही अनिश्चितताच जास्त भूषणावह आहे.

अशा रीतीनें उपलब्ध माहिती साधार संकलित करणें, संशोधनानें एकाद्या मुद्यावर जास्त प्रकाश पडतो कीं काय हें पाहणें इत्यादिकांवर या ग्रंथाचा भर असल्यानें भाषावडंबराकडे साहजिकच कमी प्रवृत्ति आहे. असल्या ग्रंथाचें सर्वस्व भाषालालित्य हें नव्हे. सत्यकथनापेक्षां भाषालालित्यास जास्त महत्व केव्हांही देतां येत नाहीं. या दृष्टीनें लांबलचक वर्णनें, काल्पानिक शब्द-चित्रें, इत्यादि प्रकारांचा अभाव असला तरा या ग्रंथास कांहीही वैगुण्य नाहीं. संकलित ज्ञान साध्या पण प्रौढ भाषेनें वाचकांना पोंचविण्याचें कार्य या ग्रंथानें चांगलें साधलें आहे.

आदित्यसंप्रदायप्रवर्तक श्रीमद्योगीश्वर याज्ञवल्क्यांचें जीवनचरित्र त्या संप्रदायांतील व्यक्तींच्या पुढें ठेवणें हा या ग्रंथाचा मुख्य हेतु तर स्पष्टच दिसत आहे. पण हें कार्य साधण्यांत इतरही पुष्कळ ज्ञान वाचकांच्या पदरांत पडणार आहे. या ग्रंथाचा उत्तरार्ध म्हणजे शुक्लयजुःशाखीय वैदिक वाङ्मय परिचय हें तर याचें महत्वाचें अंग आहे. पण त्या शिवाय याज्ञवल्क्याच्या जीवनचरित्रास अगदीं निगडित असणारीं "शाखाप्रणयन" इत्यादि माहितीनें भरलेलीं प्रकरणें पूर्वार्धांत आहेत.

पूर्वार्धाचें शेवटचें प्रकरण याज्ञवल्क्यचरित्राचा " उपसंहार " हेंही या दृष्टीनें वाचनीय आहे. या प्रकरणांत योगीश्वर–याज्ञवल्क्य–चारित्राचा निष्कर्ष काढून त्या चरित्रावर येणाऱ्या कांहीं आक्षेपांचा विचार केला आहे व कांहीं शंकास्थलांचा साधकबाधक प्रमाणांनीं निर्णय केला आहे. याच प्रकरणांत या अनुषंगानें भिन्नशाखीय भिन्नवेदीय विवाहावर चर्चा आली आहे. या बाबतींत पं. श्रीधरशास्त्री यांनीं जे विचार प्रकट केले आहेत ते सुधारक व परंपरारक्षक अशा दोन्हीही पक्षांच्या लोकांस विचारांत घेण्यासारखे आहेत. याच प्रकरणांत ज्या शाखेचें वैदिक वाङ्मय आज उपलब्ध नसेल त्याचें तें वाङ्मय उपलब्ध करण्यास एक उपाय सुचविला आहे. या अनुपलब्ध वाङ्मयाचा शोध प्राचीन ग्रंथसंपत्ति अवचित सांपडून लागणें कठीण दिसतें. स्वतः सुचविलेल्या पद्धतीनें शास्त्रीबुवांनीं ग्रंथांतील उतारे निवडून बरेंचसें कार्य करून ठेविल्याचें दिसतें. अनुपलब्ध शाखांचे संहितादि ग्रंथ अशा रीतीनें जगापुढें आल्यास फारच मोठें कार्य होणार आहे.

पूर्वार्धांतील "वेदसंप्रदाय" हें प्रकरण तर या ग्रंथांतील इतर माहितीचें मूल आहे. ब्रह्म संप्रदाय व आदित्य संप्रदाय या दोन वैदिक परंपरा वाचकांच्या प्रामुख्यानें नजरेस आणण्याचें कार्य या ग्रंथानें साधिलें आहे. या दोन्हीही संप्रदायांचें सविस्तर विवरण या प्रकरणांत आलें आहे. शाखावंशपट या स्वरूपांत साररूपानें या प्रकरणांतील सर्व माहिती पूर्वार्धाच्या शेवटीं जोडिली आहे. श्रीमद्योगीश्वर याज्ञवल्क्यांचें अतिविस्तृत अवतारकार्य अशा रीतीनें शाखापटरूपांत वाचकांच्या समोर ठेविलें आहे.

ब्रह्मसंप्रदाय व आदित्यसंप्रदाय ह्या दोन भिन्न वैदिक परंपरा आहेत, तेव्हां ह्या दोन संप्रदायांतील शाखांचें परस्पर आर्त्विज्य सारखें येत नाहीं. भिन्नशाखीय व भिन्नवेदीय विवाहांत शास्त्रीयदृष्ट्या हीच अडचण आहे. या मुद्यावरच या बाबतींत वर उल्लेखिलेली पूर्वार्धाच्या उपसंहार प्रकरणांतील चर्चा आधारलेली आहे. उत्तरार्धाच्या शेवटच्या "सामाजिक प्रश्न" या प्रकरणांत पुनः एकदां ही संप्रदायभिन्नता स्पष्ट करण्याचा प्रसंग आला आहे. तेथें डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांच्या ज्ञानकोशांतील एक विधान ह्याच सिद्धांताच्या आधारानें खंडित केलें आहे.

भिन्नशाखीय भिन्नवेदीय विवाहाच्या चर्चेच्या अनुषंगानें मातुल-कन्या-परिणय व विवाहांत मातुलगोत्र-विचार यावर शास्त्रीबुवांनीं आपले विचार प्रदर्शित केले आहेत. मातुलकन्यापरिणय ही गोष्ट वस्तुतः अशास्त्रीय आहे. ज्या शाखांत मातुलकन्या-परिणय करणें गौण समजलें जात नाहीं त्यांस तसें करण्यास शास्त्रापेक्षां परंपरेचाच पाठिंबा अधिक आहे.

या दृष्टीनें विचार करतां 'मातुलकन्या-परिणयाच्या पद्धतीचा त्याग केला असतां एकाच संप्रदायांतील भिन्नशाखीय भिन्नवेदीय विवाह शास्त्रीय होतील' इत्यादि शास्त्रीबुवांनीं मांडलेलीं मतें शास्त्रमार्गानुगामी लोकांना विचारार्ह आहेत यांत शंका नाहीं.

उत्तरार्धांत असलेल्या आणखी कांहीं महत्वाच्या व विचारार्ह गोष्टींमध्यें 'ब्राह्मणग्रंथांचें वेदत्व' व 'शाखापरत्वानें स्मृतिप्रामाण्य' ह्यांचें प्रतिपादन ध्यानांत धरण्याजोगें आहे.

"ब्राह्मणग्रंथ" या प्रकरणांत "ब्राह्मणग्रंथाचें वेदत्व" हा विषय सांगोपांग चर्चिला आहे. वैदिक परंपरेंतील सर्व आचार्य, भाष्यकार व

टीकाकार निःसंदिग्ध रीतीनें हे ग्रंथ श्रुति म्हणून प्रमाण मानीत आले आहेत. परंतु आर्यसमाजाचे पुरस्कर्ते त्यांस श्रुतित्व देऊन प्रमाण मानीत नाहींत. या सिद्धांतास अनुसरून प्रो. भगवद्दत्त इत्यादिकांनीं ब्राह्मणग्रंथांच्या वेदत्वास विरोधी असे जे मुद्दे मांडले आहेत त्यांचा या प्रकरणांत परामर्श घेतला आहे. या बाबतींत शास्त्रीबुवांनीं दिलेलीं उत्तरें पटतील अशींच आहेत.

" स्मृति " या प्रकरणाच्या उपोद्घातांत 'शाखापरत्वानें स्मृतिप्रामाण्य' हा सिद्धांत सोदाहरण सिद्ध करून दाखविला आहे. याच प्रकरणांत कात्यायन स्मृतीच्या परिचय प्रसंगानें लुप्त स्मार्त वाङ्मयाची संगति कशी लावावी या संबंधी मार्गाची आंखणी करून दाखविली आहे. अर्थातच तेथें कात्यायन स्मृति हीच उदाहरणार्थ घेतली आहे. हल्लीं उपलब्ध असलेली कात्यायनस्मृति ही खरी कात्यायनस्मृति नव्हेच. तर ती कात्यायनाची सामवेदीय सूत्रावरील कर्मप्रदीपिका आहे. तेव्हां कात्यायनस्मृति ही स्मृति या स्वरूपांत पाहिजे असल्यास निबंध ग्रंथांतील उतारे निवडण्याशिवाय दुसरा उपाय नाहीं.

उत्तरार्धाचें शेवटचें प्रकरण "सामाजिक प्रश्न" हें अत्यंत महत्वाचें—विशेषतः शुक्ल यजुःशाखीयांना अत्यंत महत्वाचें आहे. या प्रकरणांत आदित्य संप्रदाय, त्यांतल्या त्यांत शुक्लयजुःशाखा यांचा जाणून बुजून वा चुकून अधिक्षेप करणाऱ्या विधानांचा परामर्श घेतला आहे. त्यांपैकीं "शुक्लयजुर्वेदीय ब्राह्मणांचा विवाहदृष्ट्या प्रवेश जुन्या ब्राह्मणांत झाला नाहीं" या ज्ञानकोशां-तील विधानासंबंधीं उल्लेख वर भिन्नशाखीय व भिन्नवेदीय विवाह या संबंधांत आला आहेच. ज्ञानकोशांतील आणखी ज्या आक्षेपांचा परामर्श शास्त्रीबुवांनीं घेतला आहे, त्यांपैकीं स्वाहा, स्वधा इत्यादि शब्दांच्या निरर्थकत्वा-संबंधींच्या व 'ष्' वा 'ख्' इत्यादि उच्चारपद्धतीवरून शुक्लयजुःशाखीयांचें कठीण उच्चारांचे बाबतींतील असामर्थ्याविषयींच्या आक्षेपांचीं शास्त्रीबुवांनीं दिलेलीं उत्तरें सर्वमान्य होण्यासारखीं आहेत. ज्ञानकोशांतील इतर विधानांवरील शास्त्रीबुवांनीं दिलेल्या उत्तरांच्या बाबतींत सर्व विद्वानांचें मतैक्य झालें नाहीं, तरी त्यांनीं दिलेलीं उत्तरें विचारार्ह आहेत हें खास. याच प्रकरणांत आहिताग्नि राजवाडे यांनीं "शूद्रा वाजसनेयिनः" या वचनाचा जो विपर्यस्त अर्थ लाविला त्याचेंही सोपपत्तिक खंडन केलें आहे.

याज्ञवल्क्यचरित्रासंबंधीं जीं वैशिष्ट्यें वर सांगितलीं तीं सर्व उत्तरार्धांतही दृष्टीस पडतात. शुक्लयजुःशाखीय वैदिक वाङ्मयापैकीं ज्या ज्या ग्रंथाचा परिचय करून दिला आहे, त्या त्या ग्रंथाच्या कर्त्याविषयीं माहिती ग्रंथाच्या आद्यंताच्या उताऱ्यांमधून दिली आहे. त्या ग्रंथाच्या महत्त्वाबरोबरच त्याचा कालानुक्रम, ग्रंथकार इत्यादि माहिती परिचयाचे दृष्टीनें आवश्यकच आहे. या भागांत जेवढ्या ग्रंथांचा परिचय दिला आहे, तेवढ्यांची नुसती तोंड ओळख करून घेऊनच वाचकांनीं कृतकृत्यता मानूं नये अशी शास्त्रीबुवांची इच्छा असली तरी एवढ्या ग्रंथसंपत्तीचा व्यासंग करणें आजकाल बहुतेकांस अशक्य झालें आहे; तेव्हां अशा वाचकांची जिज्ञासा तृप्त करून त्यांस आपल्या संप्रदायांतलि ग्रंथसंपत्तीची ओळख करून देण्यास उत्तरार्ध फारच उपयुक्त आहे.

अर्थज्ञानयुक्त अशा वैदिक वाङ्मयाच्या व्यासंगाची गोष्ट जरी क्षणभर बाजूला ठेवली, तरी घनपाठी रीतीनें जे आपापल्या शाखासंहितांचें अध्ययन करीत आहेत, अशाही विद्वानांचा दिवसेंदिवस लोप होत चालला आहे. प्राचीन विद्येला बदलल्या काळाबरोबर मान राहिला नाहीं हें जरी अशा विद्वानांच्या विरलतेला मुख्य कारण असलें, तरी अशा पद्धतीनें अध्ययन करणारांमधील एक वैगुण्यही या दुर्दशेला कारण आहे. ब्राह्मणपाठी रीतीनें अध्ययन करणाऱ्या ब्राह्मणांनीं श्रौतस्मार्त याज्ञिकीचीं धार्मिक कृत्यें करविण्याचें पतकरून समाजाची एक गरज भागविली व त्यांत त्यांच्या चरितार्थाचीही सोय झाली. परंतु घनपाठी रीतीनें अध्ययन करणाऱ्यांनीं अशा तऱ्हेचें लोकांना नेहमीं उपयोगी पडेल असें एकादें कार्य उचलल्याचें दिसत नाहीं. उत्तरार्धांत परिचय करून दिलेल्या ग्रंथांपैकीं संहितासंबद्ध ग्रंथांतून वेदाच्या पारायणादिकांसंबंधीं विधिविधानें फलश्रुतीसह दिलेलीं आहेत, त्यांचा अंगीकार करून हीं कार्यं कर्मे जनतेकरितां करीत गेल्यास वैदिक वाङ्मयाच्या संरक्षणाबरोबरच यांच्या चरितार्थाचीही सोय होईल व जनतेस अवैदिक उपासनापद्धतीपासून वैदिक मार्गाकडे वळविल्याचें श्रेय मिळेल. या दृष्टीनेंही उत्तरार्धाचा मार्गदर्शक म्हणून उपयोग होण्यासारखा आहे.

या ग्रंथाचीं परिशिष्टेंही पूर्वार्ध उत्तरार्धाप्रमाणेंच वैशिष्ट्यपूर्ण आहेत. परिशिष्टांपैकीं पाहिलीं चार शाखांचे वंशवृक्ष इत्यादिकांकरितां खर्चीं घातलीं असून पुढील पांचांत श्रीमद्योगीश्वर याज्ञवल्क्य या अंशावताराचें पूजाविधान

समग्र दिलें आहे. या पूजाविधानांत पूजाविधि व आरति, स्तोत्र, द्वादशनाम, अष्टोत्तरशतनाम आणि सहस्रनाम यांचा समावेश होतो. ठिकठिकाणीं दरवर्षी होणाऱ्या श्रीमद्योगीश्वर याज्ञवल्क्यांच्या महोत्सवांत योगीश्वरांच्या पूजाकल्पाची जी उणीव भासत होती, ती या परिशिष्टांनीं दूर होईल. शेवटचें परिशिष्ट हें उत्तरार्धाचा सारांश आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. यांत उत्तरार्धांत परिचय करून दिलेल्या ग्रंथांची सूचि दिली आहे.

अशी या ग्रंथाची एकंदर रूपरेखा आहे. शाखाप्रवर्तक ऋषींच्या चरित्राबरोबर तत्प्रवर्तित वाङ्मयौघाच्याही संकलनानें पूर्वार्ध आणि उत्तरार्ध यांचा मनोरम संगम साधिला आहे.

अशा या ग्रंथाचा जिज्ञासू वाचक आदर करतील यांत मला तर संदेह वाटत नाहीं. ग्रंथाविषयीं अधिक परिचय करून देण्यांत वाचकांना गुंतवून मूळ ग्रंथापासून दूर ठेवणें योग्य नाहीं. श्रीमद्योगीश्वर चरणांच्या कृपाप्रसादानें त्यांच्या तेजस्वी ब्राह्मण्याची स्फूर्ति तदनुयायांमध्यें होऊन ती संघटित तेजस्विता शुक्लयजुःशाखीय विद्वद्मूर्धन्य मंडनमिश्र यांनीं म्हटल्या-प्रमाणें स्वर्गापवर्ग प्रकाशित करण्यास समर्थ होवो अशी प्रार्थना करून पुरें करतों.

पुरुषोत्तम दामोदर चंद्रात्रे



## भगवान् श्री सूर्यनारायण



श्रीमंत सरकार बाळासाहेब पंतप्रतिनिधी संस्थान औंध
यांचे उदार आश्रयाखालीं तयार झालेली मूर्ति
नासिक पंचवटी.

# श्री योगीश्वर याज्ञवल्क्य चरित्र

## उपोद्घात

### मंगलाचरण

कार्यारंभिं नमूं मुदें गणपती श्रीमंगला – मूर्ति ती
सद्भावें कुलदेवता–स्मरण, जें इष्टार्थ साधी अती ॥
विद्येश स्तवनें प्रसन्नचि सदा श्रीशारदा मंदिरीं
तीतें वंदुनि ' याज्ञवल्क्यचरिता ' घेई रचाया करीं ॥ १ ॥
विश्वाच्या तिमिरा विनाशुनि प्रभा दावी जसा भास्कर
तेवीं मोक्षद–वेद–ज्ञानसुपथा दावी जना " धी " वर ॥
'अद्वैत प्रभु विश्विं सर्व भरला' - तत्त्वा कथीं एकला
ऐशा वंदुनि याज्ञवल्क्य-चरणां वर्णीं चरित्राऽधिला ॥ २ ॥
अज्ञानांबुधि शोषुनी जगिं झरे ज्ञानामृताचा झरा
विद्या-ज्ञान-तपादि-सद्गुणगणा भासे खरा आसरा ॥
वर्णाचारसुधर्म तत्त्वशिकवी, शिष्यां कथीं जो स्मृती
त्यातें वंदुनि याज्ञवल्क्य चरितां आरंभितों संप्रती ॥ ३ ॥
जुनें चांगलें वृद्ध सर्वज्ञ जाणा । नवें नावडे नव्य मूर्खत्व माना ॥
जुनें तेंचे सोनें करीती बहाणा । दिशाभूल ही न्याय्य नाहीं सुजाणा ॥४॥
जुनी म्हणुनि टाकुनी नविन वस्तु घेणें जरी
अधीक गुणशालिनी सुखद होय, घेती तरी ॥
जुनाच गुलकंद तो सुखद मानि धन्वंतरी
गुलाब-सुमनें नवीं मधुर शर्करा ना बरी ॥ ५ ॥
जुन्यांत दोषांश न त्याज्य माना । नवें गुणांची नच खाण माना ॥
जुन्या नव्यांच्या गुणमिश्रणांत । नितांत कल्याण दिसे जगांत ॥ ६ ॥
अतींद्रिय मुनी मुदें भजति पूजिती कीं जया
तपादि-गुण-संचयें म्हणति ज्ञान-योगी जया ॥
तपोनिधि पदा चढे सकल श्रेष्ठता पावला
अशा जगतिं वंद्य त्या मुनिवरा नमीं पावलां ॥ ७ ॥

माझ्या अंतःकरणांत आज बरींच वर्षें अतिशय महत्त्वाचा व गूढ असा एक प्रश्न उद्भवत असे कीं ज्यामुळें चित्त अस्थिर होऊन उत्तर देण्याकरितां अत्यंत उतावीळ होई; पण उत्तराच्या अभावीं असंतुष्टच राही. मी स्वतःस शुक्ल यजुर्वेदीय माध्यंदिनशाखीय म्हणवितों, परंतु यजुर्वेद म्हणजे काय? त्यास शुक्ल हें विशेषण कां दिलें? हा वेद कोणी प्रवृत्त केला? याचें प्रयोजन काय? ह्या वेदाच्या शाखा किती? त्यांत माध्यंदिन शाखा कितवी? तसेंच ह्या वेदप्रवर्तकाचें जीवनचरित्र कोणतें? इत्यादि अनेक उपप्रश्नांनीं नटलेला असा हा प्रश्न आहे. तरी पण फारच सुकर आहे. कारण ज्याप्रमाणें मनुष्यास स्वतःच्या कुलाची व कुलांतील पूर्वजांच्या चरित्र, गोत्र, प्रवर, कुलाचार इत्यादिकांची स्वाभाविकच परंपरेनें माहिती असते, त्याप्रमाणेंच हा वेद, शाखा, वेदप्रवर्तक ऋषिचें चरित्र, वाङ्मय इत्यादि विषयींची माहिती परंपरेनें असावयास पाहिजे, व तशी ती सुमारें दोन अडीच शतकाचे पूर्वीं होतीही. अलिकडे ह्या दोन अडीच शतकावधींतील कालांत ही माहिती उत्तरोत्तर लुप्तप्राय होत होत आज पूर्ण नष्ट होण्याची वेळ येऊन ठेपली आहे. इतकेंच नव्हें तर स्वतःचें गोत्र, प्रवर, कुलाचार वगैरेही आम्ही विसरत चाललों. यांतही कांहीं विशेष नाहीं; पण अत्यंत दैवदुर्विलासाची गोष्ट म्हणजे पाश्चात्य संस्कृतीच्या बेगडी सौंदर्याच्या मोहाला बळी पडून पुण्यश्लोक व लोकोत्तर चारित्र्यानें युक्त अशा स्वपूर्वज योगीश्वर याज्ञवल्क्य प्रभृतींचीं फार काय अगदीं अलीकडील स्वतःच्या आजापणजांचीं ही नांवें विसरलों; व त्यांचे बदली परकीयांच्या वंशावळीच्या वंशावळी पाठ करीत आहोंत. जणूं काय हेच आमचे खरे पूर्वज होत. पण अशा परिस्थितींतही आज एक आनंदाची जागा दिसते, ती ही कीं चालू वातावरणांत स्वसंस्कृतीच्या अभिमानाचा वारा अनुकूल रीतीनें वाहूं लागला आहे. त्याच्या स्पर्शानें आमची पराङ्मुख वृत्ति अंतर्मुख होण्याचीं साधनें जसजशीं उत्पन्न होतात, तसतशी ती अधिकाधिक अंतर्मुख होत आहे. परमेश्वर दिवसानुदिवस आमची ही अंतर्मुख वृत्ति अधिक सुदृढ व कार्यक्षम करो, अशी त्याचे चरणारविंदीं प्रार्थना आहे.

सदरचा प्रश्न आपणास कोणीं विचारला तर त्याचें उत्तर आपणाला देतां येईल काय, असा मनाशीं विचार केला असतां मन नकार दर्शवून विचारमूढ होत असे. या प्रमाणें अनेक वर्षें विचारमूढतेच्या गाढ अंधकारांत

चाचपडतां चाचपडतां एक दिवस असा प्रसंग झाला कीं संग्रहीं असलेलीं पुस्तकें व्यवस्थित ठेवीत असतांना जवळ असून सुद्धां ज्याकडे आजपर्यंत लक्ष गेलें नाहीं असा प्रकाश–किरण, म्हणजे महर्षि कात्यायनाच्या अठरा परिशिष्टांपैकीं दुसरें प्रतिज्ञा परिशिष्ट, हा ग्रंथ दृष्टीस पडला. त्या ग्रंथा मध्यें काय आहे ह्या जिज्ञासेनें तो ग्रंथ वाचून काढला. त्यांत माझ्या प्रश्नांच्या समाधानाची शक्यता आढळून आली. सदरच्या ग्रंथांत यजुर्वेदाचे शुक्ल कृष्ण भेद व त्या दोन्ही भेदांतील १०१ शाखा, तसेंच शुक्ल यजुर्वेदांतील संहितांची व ब्राह्मणाची संख्या, कण्व माध्यंदिन समाम्नाय, शाखेचें वैदिक वाङ्मय, त्याचा परिचय, याज्ञवल्क्य, विश्वामित्र वंशातील असल्याबद्दलचा उल्लेख वगैरे याज्ञवल्क्य चरित्रासंबंधीं बऱ्याच गोष्टींचें विवरण आलें आहे. मग त्या अनुरोधानें श्रुति, स्मृति, षड्दर्शन, पुराण, सूत्र, भाष्य, इतिहास, काव्य, निबंध इत्यादि भिन्न भिन्न वाङ्मय क्षेत्रांत संचार करून प्रश्नाच्या समाधानां इतकी अर्थात् याज्ञवल्क्य चे जीवनचरित्रास व शुक्ल यजुर्वेदाचे इतिहासास पुरेशी साधन–संपत्ति मिळविली; इतकेंच नव्हे तर ठिकठिकाणीं वर्णन केलेल्या कांहीं स्थळांपैकीं आवश्यक व महत्त्वाच्या ‘ वडनगर ’ सारख्या स्थळीं समक्ष जाऊन वर्णन केलेल्या परिस्थितीचा व आज तेथें विद्यमान असलेल्या परिस्थितींचा मेळ बसतो कीं काय, ह्याची चौकशी करून कांहीं माहिती प्रत्यक्ष मिळविली.

अशा रीतीनें संपादन केलेली साधन सामग्री एकत्र करून तिचा साधकबाधक विचार चिकित्सक दृष्टीनें करून योगीश्वर याज्ञवल्क्याच्या जीवन-चरित्राची व शुक्ल यजुर्वेद इतिहासाची एक सांखळीसारखी सुसंबद्ध मांडणी तयार केली, ती दिग्दर्शन रूपानें प्रथम संस्कृत भाषेंत लिहून काढली परंतु तिचा सर्व साधारण जनतेस फारसा उपयोग होईल असें न वाटल्यावरून श्री योगीश्वर याज्ञवल्क्य चरित्र व शुक्ल यजुर्वेद इतिहास महाराष्ट्र भाषेंत लिहून वाचक वर्गासाठीं प्रसिद्ध करण्याचें ठरविलें आहे. अभीष्ट कार्यांत परमेश्वराजवळ यशःसिद्धीची प्रार्थना करणें या स्थळीं उचित असल्यानें ती प्रार्थना करून हें प्रकरण येथेंच संपवूं.

प्रकरण १ लें

# निवासस्थान

परमपावन पुण्यशाली भरतखंडांत कर्मभूमि$ म्हणून प्रसिद्ध असलेल्या ह्या हिंदुस्थान देशांत मारवाड व गुजराथ यांच्या सरहद्दीवर असलेल्या अर्बुद पर्वताच्या ( अबू पहाडाच्या ) नैऋत्य† दिशेला मही नदीच्या कांठीं कित्येक शतकांपूर्वीं आनर्त या नांवाचा सर्व संपत्तीनें संपन्न असा देश होता. त्याचा प्राचीन वाङ्‌मयांतून कोठें कोठें लाट❀ देश ह्या नांवानें उल्लेख आढळतो. तो हल्लीं गुजराथ प्रांताचा उत्तरभाग असल्यानें उत्तर गुजराथ अगर महीकांठा‡ ह्या नांवानें ओळखला जात आहे. तेथील अरण्य हाटकेश्वर क्षेत्र ह्या नांवानें प्रसिद्ध असून, त्याची सीमा कच्छाचे रणापर्यंत आहे. ह्या अरण्यांत हाटकेश्वर* नांवाचें ब्रह्मदेवानें स्थापन केलेलें शिवलिंग असून त्याच्या आसमंतात् भागांतील प्रदेश ही तपोवन भूमि¶ होती. अशा ह्या पुण्यस्थळीं आनर्त देशाचा राजा ' चमत्कार ' ह्या-

---

$ तत्रापि भारतं श्रेष्ठं जंबूद्वीपे महामुने । यतोऽहि कर्मभूरेषा ततोऽन्या भोगभूमयः ।। विष्णुपुराणे

† एतस्मात्पर्वतात्क्षेत्रं हाटकेश्वरसंज्ञितं । अस्ति नैर्ऋत्यदिग्भागे देशे चानर्तसंज्ञके ।। स्कं. पु. ना. खं. अ. ४ । ५२

❀ गुजराथी साहित्य परिषदेचा रिपोर्ट— निबंधसंग्रह श्रीमान् शंकर पी. मेहता यांचा निबंध.

‡ मही नदीच्या उत्तर तीरावरील प्रदेश महीकांठा या नांवानें ओळखला जातो.

* ततो हाटकमादाय तदाकारं पितामहः । कृत्वा लिंगं स्वयं तत्र स्थापयामास हर्षितः ।। मया ह्याद्यं त्विदं लिंगं हाटकेन विनिर्मितं । ख्यातिं यास्यति सर्वत्र पाताले हाटकेश्वरम् ।। स्कं. पु. ना. खं. अ. २ । ६३ – ६५

¶ स्कं. पु. ना. खं. अ. ९ । २५ – ४० पर्यंत.

मृगयेच्या * निमित्तानें प्राप्त झाला. तेथें एका वृक्षाखालीं निर्भय व विश्वस्त अशा अवस्थेंत आपल्या वत्साला स्तनपान करवीत असलेली एक हरिणी त्या राजानें दुरून पाहिली; व लगेच तिच्यावर एक तीक्ष्ण बाण सोडून तिची शिकार केली. प्राण सोडतांना त्या हरिणीनें राजाला शाप दिला कीं, " ज्या अर्थी तूं मला माझा कांहीं अपराध नसतांना, इतकेंच नव्हे तर वत्साला स्तनपान करवीत असतांना यमसदनाला पाठवीत आहेस, व मृगेयच्या नियमाविरुद्ध अक्षम्य अकार्य करीत आहेस त्या अर्थी तूं कुष्ठव्याधीनें युक्त हो. " नंतर राजानें त्या हरिणीच्या शापामुळें स्वतःचा देह श्वेतकुष्ठमय झालेला पाहिला; व खिन्न व दीन वदन होऊन, त्या कुष्ठ व्याधीपासून मुक्त होण्यासाठीं उपायचिंतन करीत करीत हाटकेश्वर क्षेत्रांत जेथें विश्वामित्राच्या $ आश्रमाजवळ तीर्थयात्रेच्या निमित्तानें ब्राह्मणश्रेष्ठांचा समुदाय एकत्र झालेला होता, त्या स्थळीं त्यानें प्रयाण केलें; व त्यांस तो म्हणाला कीं, " हे द्विजश्रेष्ठ हो ! मी सूर्यवंशांत उत्पन्न झालेला चमत्कार नांवाचा राजा असून या + आनर्त देशाचा अधिपति आहे. माझें हें शरीर कुष्ठमय झाल्यामुळें फार फार खेद होत आहे. तरी त्यापासून मुक्त होण्यासाठीं दैविक, मानुष, मणि, मंत्र, औषधी वगैरे कांहीं उपाय असल्यास कृपा करून सांगा, आणि तुम्हांस जर माहित नसेल तर मी हें शरीर विष भक्षण करून किंवा अग्नि प्रवेश करून अथवा जलांत बुडवून नष्ट करीन. " हें राजाचें भाषण ऐकून ते ऋषिश्रेष्ठ दयार्द्र अंतःकरणानें त्यास म्हणाले कीं, " हे राजा ! येथून जवळच एक शंखतीर्थ नांवाचें तीर्थ असून त्यांत स्नान केलें असतां सर्व रोग दूर होतात असा त्या तीर्थाचा महिमा आहे. तेव्हां त्या तीर्थांत तूं स्नान कर, म्हणजे या कुष्ठव्याधीपासून मुक्त होशील. " नंतर राजानें ऋषींच्या सांगण्यावरून त्या-

---

* स्कं. पु. ना. खं. अ. १०

$ ततः कालेन संप्राप्य कुरुक्षेत्रं सपार्थिवः । यत्नेनान्वेषयामास विश्वामित्राश्रमं ततः ॥ विश्वामित्रोऽपि तद्दृष्ट्वा तीर्थमाहात्म्यमुत्तमं । कुरुक्षेत्रं परित्यज्य तत्रावासमथाकरोत् ॥ इति स्कं. पु. ना. खं. अ. ४ । ८

\+ स्कं. पु. ना. खं. अ. ११ वा

## प्रकरण १ लें

# निवासस्थान

परमपावन पुण्यशाली भरतखंडांत कर्मभूमि$ म्हणून प्रसिद्ध असलेल्या ह्या हिंदुस्थान देशांत मारवाड व गुजराथ यांच्या सरहद्दीवर असलेल्या अर्बुद पर्वताच्या ( अबू पहाडाच्या ) नैऋत्य† दिशेला मही नदीच्या कांठीं कित्येक शतकांपूर्वी आनर्त या नांवाचा सर्व संपत्तीनें संपन्न असा देश होता. त्याचा प्राचीन वाङ्मयांतून कोठें कोठें लाट※ देश ह्या नांवानें उल्लेख आढळतो. तो हल्लीं गुजराथ प्रांताचा उत्तरभाग असल्यानें उत्तर गुजराथ अगर महीकांठा‡ ह्या नांवानें ओळखला जात आहे. तेथील अरण्य हाटकेश्वर क्षेत्र ह्या नांवानें प्रसिद्ध असून, त्याची सीमा कच्छाचे रणापर्यंत आहे. ह्या अरण्यांत हाटकेश्वर* नांवाचें ब्रह्मदेवानें स्थापन केलेलें शिवलिंग असून त्याच्या आसमंतात् भागांतील प्रदेश ही तपोवन भूमि¶ होती. अशा ह्या पुण्यस्थळीं आनर्त देशाचा राजा ' चमत्कार ' हा

---

$ तत्रापि भारतं श्रेष्ठं जंबूद्वीपे महामुने । यतोऽहि कर्मभूरेषा ततोऽन्या भोगभूमयः ॥ विष्णुपुराणे

† एतस्मात्पर्वतात्क्षेत्रं हाटकेश्वरसंज्ञितं । अस्ति नैर्ऋत्यदिग्भागे देशे चानर्तसंज्ञके ॥ स्कं. पु. ना. खं. अ. ४ । ५२

※ गुजराथी साहित्य परिषदेचा रिपोर्ट— निबंधसंग्रह श्रीमान् शंकर पी. मेहता यांचा निबंध.

‡ मही नदीच्या उत्तर तीरावरील प्रदेश महीकांठा या नांवानें ओळखला जातो.

* ततो हाटकमादाय तदाकारं पितामहः । कृत्वा लिंगं स्वयं तत्र स्थापयामास हर्षितः ॥ मया ह्यद्य त्विदं लिंगं हाटकेन विनिर्मितं । ख्यातिं यास्यति सर्वत्र पाताले हाटकेश्वरम् ॥ स्कं. पु. ना. खं. अ. २ । ६३ – ६५

¶ स्कं. पु. ना. खं. अ. ९ । २५ – ४० पर्यंत.

मृगयेच्या * निमित्तानें प्राप्त झाला. तेथें एका वृक्षाखालीं निर्भय व विश्वस्त अशा अवस्थेंत आपल्या वत्साला स्तनपान करवीत असलेली एक हरिणी त्या राजानें दुरून पाहिली; व लगेच तिच्यावर एक तीक्ष्ण बाण सोडून तिची शिकार केली. प्राण सोडतांना त्या हरिणीनें राजाला शाप दिला कीं, " ज्या अर्थी तूं मला माझा कांहीं अपराध नसतांना, इतकेंच नव्हे तर वत्साला स्तनपान करवीत असतांना यमसदनाला पाठवीत आहेस, व मृगेयच्या नियमाविरुद्ध अक्षम्य अकार्य करीत आहेस त्या अर्थी तूं कुष्ठव्याधीनें युक्त हो. " नंतर राजानें त्या हरिणीच्या शापामुळें स्वतःचा देह श्वेतकुष्ठमय झालेला पाहिला; व खिन्न व दीन वदन होऊन, त्या कुष्ठ व्याधीपासून मुक्त होण्यासाठीं उपायचिंतन करीत करीत हाटकेश्वर क्षेत्रांत जेथें विश्वामित्राच्या $ आश्रमाजवळ तीर्थयात्रेच्या निमित्तानें ब्राह्मणश्रेष्ठांचा समुदाय एकत्र झालेला होता, त्या स्थळीं त्यानें प्रयाण केलें; व त्यांस तो म्हणाला कीं, " हे द्विजश्रेष्ठ हो ! मी सूर्यवंशांत उत्पन्न झालेला चमत्कार नांवाचा राजा असून या + आनर्त देशाचा अधिपति आहे. माझें हें शरीर कुष्ठमय झाल्यामुळें फार फार खेद होत आहे. तरी त्यापासून मुक्त होण्यासाठीं दैविक, मानुष, मणि, मंत्र, औषधी वगैरे कांहीं उपाय असल्यास कृपा करून सांगा, आणि तुम्हांस जर माहित नसेल तर मी हें शरीर विष भक्षण करून किंवा अग्नि प्रवेश करून अथवा जलांत बुडवून नष्ट करीन. " हें राजाचें भाषण ऐकून ते ऋषिश्रेष्ठ दयार्द्र अंतःकरणानें त्यास म्हणाले कीं, " हे राजा ! येथून जवळच एक शंखतीर्थ नांवाचें तीर्थ असून त्यांत स्नान केलें असतां सर्व रोग दूर होतात असा त्या तीर्थाचा महिमा आहे. तेव्हां त्या तीर्थांत तूं स्नान कर, म्हणजे या कुष्ठव्याधीपासून मुक्त होशील. " नंतर राजानें ऋषींच्या सांगण्यावरून त्या-

---

* स्कं. पु. ना. खं. अ. १०

$ ततः कालेन संप्राप्य कुरुक्षेत्रं सपार्थिवः । यत्नेनान्वेषयामास विश्वामित्राश्रमं ततः ॥ विश्वामित्रोऽपि तद्दृष्ट्वा तीर्थमाहात्म्यमुत्तमं । कुरुक्षेत्रं परित्यज्य तत्रावासमथाकरोत् ॥ इति स्कं. पु. ना. खं. अ. ४ । ८

\+ स्कं. पु. ना. खं. अ. ११ वा

शंखतीर्थांत स्नान केलें, व तो श्वेतकुष्ठापासून मुक्त झाला, आणि त्यास पूर्वीचें शरीर मिळालें. ऋषींच्या या उपकाराची फेड करावी म्हणून राजा त्यांना म्हणाला कीं, " हे ऋषिवर्यहो ! जरी मी तुमच्या अनुग्रहामुळें कुष्ठव्याधीपासून मुक्त झालों आहे, तरी पण पुष्कळ दिवसपर्यंत हा व्याधी माझें शरीरावर राहिल्यामुळें लोकांमध्यें मी निंदेला पात्र झालों आहे. तेव्हां पुन्हां मी हें राज्य करूं इच्छित नाहीं. हें राज्य, हा देश, हत्ती, घोडे इत्यादि राजैश्वर्य हें सर्व आपण सांभाळावें, म्हणजे मी त्याच पुण्यभूमींत उरलेलें आयुष्य तपश्चर्याकरून घालवीन. " हें राजाचें भाषण ऐकून ब्राह्मण म्हणाले कीं, " राजा ! आम्ही राज्य घेऊन काय करावें ? आम्हांस राज्याचें संरक्षण करणें शक्य नाहीं. एकदां परशुरामानें एकवीस वेळां निःक्षात्रिय पृथ्वी करून आम्हांस दिली. परंतु क्षत्रियांनीं पुन्हां आम्हां ब्राह्मणांचा पराभव करून हरण केली. तेव्हां तुझें राज्य तूंच कर. आम्हांस नको. जर तुला आम्हांस कांहीं दान करावयाचें असेल तर या पुण्य क्षेत्रांत एक नगर तयार करून दे. त्या नगरांत आम्ही स्वाध्यायतत्पर होऊन गृहस्थाश्रमधर्मानें सुखानें राहूं. अशा प्रकारची ब्राह्मणांची मागणी राजानें कबूल करून त्या ठिकाणीं एक सुंदर नगर तयार केलें. त्या नगराचे भोंवतालीं अभेद्य तटबंदी व अनुल्लंघनीय खंदक निर्माण केले.

त्या नगराची लांबी व रुंदी ५ कोसांची होती, आणि मध्यभागीं वसतिस्थान १ कोसाचें होतें. नगराचें मध्यभागीं २ । ३ मैदानेंही ठेविलीं होतीं. तसेंच त्यानें उत्तम उत्तम घरें निर्माण करून तीं सर्वप्रकारें आंतून बाहेरून सुशोभित करून, गृहस्थाश्रमाला उचित व आवश्यक उपकरणांनीं सजविलीं. नंतर तीं घरें कुलीन, दांत, शांत व विशेषतः वेदवेत्ते अशा सत्पात्र ब्राह्मणांना दान दिलीं. अशा रीतीनें चमत्कार राजानें तें नगर ब्राह्मणांना अग्रहार ( इनाम ) देऊन राज्य पुत्राचे स्वाधीन केलें. नंतर राजानें त्याच क्षेत्रांत * अचलेश्वर महादेवाची प्रतिष्ठा करून त्याचे सान्निध तपश्चर्या केली व शेवटीं स्वर्गवासी झाला. राजा चमत्काराचें ' उग्रवदात ' असें दुसरें

---

* स्कं. पु. ना. खं. अ. १२ व १३

नांव असून, त्याच्या भार्येचें नांव दक्षमित्रा किंवा दमयंती असें होतें. नासिक जिल्ह्यांत त्रिरश्मि पर्वतावर ( पांडव गुंफा ) नहपानाचा जांवई उषवदात याचा शिलालेख आहे. या शिलालेखांतील उषवदात व हा उषवदात एकच किंवा दोन होते हें निश्चित समजणें कठीण आहे. विद्वानांनीं याचा अवश्य विचार करावा. असो. प्रस्तुतचें नगर चमत्कार राजानें वसविलें म्हणून तें चमत्कारपुर $ ह्या नांवानें प्रसिद्धीस आलें. हें चमत्कारपुर रक्तशृंग पर्वताचे मुख्य शिखरावर × वसविलेलें आहे. या नगराला निरनिराळ्या काळांत चमत्कारपुर, आनंदपुर, किंवा आनंदधाम, स्कंदपुर, माननगर, मदनपुर, आनर्तपुर, बर्धमानपुर, वृद्धनगर, वडनगर इत्यादि अनेक नांवांनीं प्रसिद्धी मिळाली आहे; पैकीं चमत्कारपुरासंबंधींचा उल्लेख नागर खंड अ. १०–१३ मधून वर दाखविलाच आहे. ‡ आनंदपुर ह्या नांवाचा उल्लेख ना. खं. अ. ४० मध्यें आला असून यालाच कविवल्लभकृत नागरोत्पत्ति नांवाच्या पुस्तकांत आनंदधाम असें म्हटलें आहे. आनंदपुर या नांवाचा आणखी उल्लेख चालुक्यवंशीय राजा कुमारपाल याच्या ‖ प्रशस्तिलेखांत आला आहे. स्कंदपुर–मानपुर–मदनपुर या नांवांचा उल्लेख कविवल्लभकृत नागरोत्पत्ति नांवाच्या पुस्तकांत आढळतो. आनर्तपुर या नांवाचा उल्लेख वलभी ताम्रपटांतून आढळून येतो. आनर्त देशाचा राजा सुहय यानें चमत्कारपुरांत आन-

---

$ यतः प्रभृति विप्रेभ्यो दत्तं तेन महात्मना । चमत्कारेण तत्स्थानं नाम्ना ख्यातिं ततो गतम् ॥ स्कं. पु. ना. खं. अ. १७ । १८

× चमत्कारपुरं तस्य मुख्यशृंगे व्यवस्थितम् ॥

स्कं. पु. ना. खं अ. १५ । ८

‡ आनंदितेन भवता प्रार्थितोऽहं यतो मुने ॥ आनंदेश्वरसंज्ञस्तु ख्यातिं यास्यामि भूतले ॥ एतत्पुरं च मे नाम्ना आनंदाख्यं भविष्यति ॥ स्कं. पु. ना. खं. अ. ४०

‖ हा प्रशस्तिलेख वडनगरच्या सहा द्वारांपैकीं हाटकेश्वराचे मंदिराकडे जाणाऱ्या दरवाजाच्या भिंतीवर एका बिहारीलाल नांवाच्या नागर ब्राह्मणानें संस्कृत भाषेंत पद्यमय असा शिलेवर कोरलेला आहे.

तेश्वर महादेवाची स्थापना केल्याचा कथाभाग ना. खं. अ. ६४ मध्यें आलेला आहे. प्राय: यावरून आनर्तपुर हें नांव पडलें असावें. वर्धमानपुर या नांवाचा उल्लेख ना. खं. अ. १२९ मध्यें आलेला आहे. वृद्धनगर ( वडनगर ) या नांवाचा उल्लेख जुनागड येथील नागर ब्राह्मण व्होर जटाशंकर हरिजीवन याच्या इ. स. १४५१ विक्रम सं. १५०७ या सालीं लिहिलेल्या शांखायन नांवाच्या पुस्तकाच्या हस्तलिखित प्रतींत अंतिम पृष्ठावरील " सं. १५०७ मां ❀ वृद्धनगर ( वडनगर ) मां आं. पुस्तक लखां युं छे. " या मजकुरावरून स्पष्ट होत आहे. या वडनगरची चतुःसीमा पूर्वेस—गंगा, पश्चिमेस—विष्णुपद [ गया ], दक्षिणेस व उत्तरेस—गोकर्णेश्वर महादेव अशी असल्याचें वर्णन ना. खं. अ. ५ मध्यें दिलें आहे. सदरची चतुःसीमा सांप्रतच्या भौगोलिक परिस्थितीच्या दृष्टीनें विचार केला असतां चिकित्सक वाचकवर्गास असत्य व अतिशयोक्तीची भासेल परंतु आम्ही प्रत्यक्ष पाहिलेली परिस्थिति पुढें देत आहोंत तिचा विचार केला असतां तसें वाटण्याचें कारण नाहीं.

वडनगरच्या पूर्वेस गौरीकुंड नांवाचें एक तळें आहे. त्याचे जवळपास आणखीही पुष्कळ तीर्थें आहेत. त्या गौरीकुंडांत भागीरथीचा एक झरा चालू आहे. अद्यापि तो झरा व्यवस्थित बांधलेल्या स्थितींत दिसतो. सदरचा झरा पूर्वेस २ फर्लांगावर असलेल्या एका शिवलिंगावरून येत असल्यानें पूर्व बाजूस ¶ गंगा आहे, ही सीमा बरोबर म्हणण्यास हरकत नाहीं. वडनगरच्या पश्चिमेस कुंडासारखा एक ' गयाकोठो ' नांवाचा एक तलाव आहे. त्याचे जवळ ' विष्णुपादुका ' नांवाचें महत्वाचें कुंड असून तेथें एका भागांत ( कुंडांत ) महादेवाचें लिंग व पादुका आहेत. त्या पादुकांस विष्णुपद असें म्हणतात. त्यामुळें पश्चिमेस विष्णुपद [ गया ] आहे हें म्हणणें बरोबर आहे. वडनगरच्या दक्षिणेस महाकालेश्वर, जालेश्वर, गोकलेश्वर, गोकर्णेश्वर, इत्यादि ५—७ महादेवाचीं अनादिप्रसिद्ध स्थानें आहेत. पैकीं गोकर्णेश्वर

---

❀ वृद्धनगर याचाच अपभ्रंश वडनगर असा झाला आहे.

¶ येथून ६०० मैलाच्या अंतरावर पूर्वेस कानपूर शहरीं भागीरथीचा प्रवाह आहे.

हा दक्षिण बाजूच्या सीमेंत वर्णन केलेलाच गोकर्णेश्वर असावा. वडनगरच्या उत्तरेस विश्वामित्र कुंड व त्याचे जवळ पुराणतम गोकर्णेश्वर महादेवाचें सुप्रसिद्ध स्थान आहे. तोच उत्तर सीमेवरील गोकर्णेश्वर होय.

वडनगर हें गांव सांप्रत पुढील परिस्थितींत असल्याचें दिसून येतें. हें गांव एका उंच पर्वताचे पायथ्याशीं टेकडीवर वसलेलें आहे. ह्या गांवाच्या जवळ पर्वताच्या पुष्कळ रांगा असून त्या उदेपुरापर्यंत गेल्या आहेत. येथून अबूचा पहाड ४०–५० मैलाच्या अंतरावर आहे. तसेंच वडनगर येथें अत्यंत प्राचीन पुराण–प्रसिद्ध स्वयंभू श्रीहाटकेश्वराचें स्थान गांवाचे बाहेर पश्चिम दिशेला आहे. मंदिर भव्य, सुदृढ व प्राचीन शिल्पकलेचा एक आदर्शभूत नमुना असें असून त्याचा मुख्य दरवाजा पूर्वाभिमुख आहे. तसेंच आंतील शिवलिंग बरेंच खोल असून शाळुंका उत्तरप्रणाली आहे. वडनगर हें गांव हल्लींच्या स्थितींत गुजराथ प्रांतांत अहमदाबादपासून उत्तरेस रेल्वे मार्गानें ६४ मैलावर आहे. हें स्टेशनच आहे. हें गायकवाड सरकारचे सत्तेखालीं मेसाणा जिल्ह्यांत खेराळु तालुक्यांत आहे. येथून उत्तरेस २४ मैलावर सिद्धपुर क्षेत्र व १०–१२ मैलावर उंझा ( उमापुर ) व दक्षिणेस ६ मैलांवर विसनगर हीं गांवें आहेत.

प्रस्तुतच्या चरित्राचा नायक सुप्रसिद्ध शुक्लयजुर्वेद–प्रवर्तक महर्षि जो योगिश्वर याज्ञवल्क्य त्याचें † आश्रमस्थान वडनगरच होय, असें ना. खं. अ. १२९ मध्यें म्हटलें आहे. यावरून महर्षि याज्ञवल्क्य हा मूळचा वडनगरचा निवासी असून आपलें शिष्यत्व पत्करलेल्या जनककुलोत्पन्न राजा रत्नमिश्र यास अध्यात्मविद्येचा उपदेश करून त्याचे प्रार्थनेवरून विहार प्रांतात * मिथिला नगरींत जाऊन वास्तव्य करूं लागला असें दिसतें.



---

† तथाऽन्योऽपि च तत्रास्ति याज्ञवल्क्यसमुद्भवः । आश्रमो लोकविख्यातो मूर्खाणामपि सिद्धिदः ॥ स्कं. पु. ना. खं.

* ब्राह्मणैर्याज्ञवल्क्यस्तु विज्ञातो येन केन तु । विदेहेन ततः प्राप्तः श्रवणार्थं नराधिपः ॥ वेदांतानां च सर्वेषां रत्नाख्येन महीभुजा ॥ स्कं. पु. ना. खं.

शेवटीं होणारा प्रलय हा मनुप्रलय, आणि कल्पाचे शेवटीं होणारा प्रलय तो कल्पप्रलय किंवा महाप्रलय होय. या महाप्रलयाहून इतर तीन प्रलय हे सामान्य प्रलय होत. कल्पाचे आरंभीं उत्पन्न होणाऱ्या सृष्टीची तात्त्विक आणि मूलभूत रचना कल्पांतापर्यंत अखंड परंपरेनें सूत्राप्रमाणें ग्रथित केलेली असतेच. सामान्य प्रलयांत जो प्रलय होतो तो बाह्य रचनेच्या स्थूल भागाचा होतो; म्हणूनच नैयायिक खंडप्रलय व महाप्रलय असे दोनच प्रलय मानतात. खंडप्रलय या शब्दांतील खंड हा शब्द सामान्य प्रलयांतील आम्ही दर्शविलेल्या सृष्टीच्या परिस्थितीचाच निदर्शक आहे. असो. सर्व सृष्टींत प्रथम हिरण्यगर्भानें वेदसृष्टि निर्माण केली असें श्री वेदव्यासानें— " शब्द इति चेन्नातः प्रभवात्प्रत्यक्षानुमानाभ्याम् ॥ " या शारीरक सूत्रांत म्हटलें आहे. तेव्हां सृष्टित्वसामान्यानें वेदपरंपराही अविच्छिन्नपणें सूत्राप्रमाणें ग्रथित मानिली पाहिजे. जशी प्रतिकल्पांत वेदसृष्टि आहे तशीच कल्पांतर्गत प्रतिचतुर्युगांत वेदव्यास, याज्ञवल्क्य व वेदविभाग ह्याही गोष्टी आहेतच. जरी प्रत्येक होणारा कल्प हा पूर्व कल्पाप्रमाणें असतो हें जसें सांगितलें, तसें होणारें प्रत्येक चतुर्युग पूर्व चतुर्युगाप्रमाणें असतें असें सांगितलें नाहीं. तथापि वायुमहापुराणांत प्रत्येक चतुर्युगांत निरनिराळे व्यास असल्याचें वर्णन आलें आहे. त्यावरून ही गोष्ट सहज सिद्ध होत आहे कीं, याज्ञवल्क्यही अनेक झाले असावेत. तेव्हां ज्या ज्या वेळीं आपल्याला याज्ञवल्क्याचा काळ ठरविण्याची वेळ येईल, त्या त्या वेळीं नुसता कल्पकाल किंवा तदंतर्गत एखाद्या चतुर्युगाचा काल न घेतां त्याहीपेक्षां सूक्ष्म कालविभागाचा अंगीकार केला पाहिजे. वेदव्यासानें केलेल्या वेदविभागाच्या प्रसंगानें जी ठिकठिकाणीं पुराण ग्रंथांतून याज्ञवल्क्याचीं चरित्रें आलीं आहेत, तीं सर्व द्वापाराचे शेवटीं व कलीचे प्रारंभीं झालेलीं अशीं दिलीं आहेत; तर वाराह कल्पांतही द्वापाराचा शेवट व कलीचा प्रारंभ हाच याज्ञवल्क्य चरित्राचा काल धरला पाहिजे. त्यांत सुद्धां हजार चतुर्युगापैकीं " प्रथमत्यागे मानाभावात् ॥ " या न्यायानें प्रथम चतुर्युगांतील द्वापाराचा शेवट व कलीचा प्रारंभ हाच काल धरला पाहिजे. अर्थातच वर दिलेल्या कल्पाच्या कालगणनेंतून श्वेतवाराह कल्पांतील प्रथम चतुर्युगाच्या कृत, त्रेता, द्वापार, या तीन युगांचीं वर्षें ३८८८०००, व वर्तमान २८ व्या चतुर्युगापासून भावी ९७२ चतुर्युगांची वर्षे— ४१९९०४००००, व वर्तमान अठ्ठाविसाव्या

चतुर्युगांतील कलियुगाचीं भोग्य वर्षे ४२६९६५ मिळून = ४२०३३५४९६५, इतकीं वर्षें कल्पाच्या एकंदर कालमानांतून वजा केलीं असतां ११६६४५०३५ इतक्या वर्षांपूर्वीचा याज्ञवल्क्याचा जन्मकाल कल्पकाल परिगणन पद्धतीनें सूक्ष्म दृष्ट्या ठरूं शकतो. ही एक स्वतंत्र कालगणनेची निराळी पद्धत असून वर विवेचन केलेल्या कल्पपद्धतीच्या दृष्टीनें विचारार्ह वाटल्यावरून येथें दिली आहे.

पं. दीनानाथ शास्त्री चुलेट यांनीं आपल्या ' वेदकालनिर्णय ' पुस्तकांत ' समे शंकुं निखाय ' या कात्यायन शुल्बसूत्रावरील— " दक्षिणायने तु चित्रां यावदादित्य उपसर्पति । उदगयने स्वातिमेति । विषुवतीये त्वहनि चित्रास्वात्योर्मध्य एवोदयः । " इत्यादि कर्काचार्यांच्या भाष्यावरून वसंत संपाताच्या गणितानें कर्काचार्यांचा काल आजपासून १५००० हजार वर्षांपूर्वीचा ठरविला आहे. परंतु हा काल आम्हांस बरोबर वाटत नाहीं. कारण " प्रशांतराग– प्रभावदत्त कुशली " याचा ताम्रपट शालिवाहन शक २०४मधील आहे; व ताम्रपटांतील उल्लिखित कर्काध्यापक व कात्यायन-सूत्र भाष्यकार कर्कोपाध्याय या दोन व्यक्ति निराळ्या नसून एकच होत. कारण श्रौतसूत्रावरील कर्कभाष्यांत कर्कोपाध्याय हे स्वतः पितृभूति, संप्रदाय यशोगोपि इत्यादि भाष्यकारांचा उल्लेख करीत आहेत, व हे सर्व भाष्यकार शालिवाहन शकारंभींचे आहेत; व त्यामुळें ताम्रपटाचा काल व भाष्यकार कर्कांचा काल एकच येतो. शिवाय प्राचीन वैदिक व संस्कृत वाङ्मयांत कर्क या नांवाची एकच सुप्रसिद्ध व्यक्ति आहे. दुसरा कोठेंही ह्या नांवाच्या व्यक्तीचा उल्लेख नाहीं. असो. पं. दीनानाथशास्त्री चुलेट यांच्या मताप्रमाणें आजपासून १५००० वर्षांपूर्वीचा कर्कांचा काल असल्यामुळें अर्थातच त्या पूर्वींच्या कालांत श्रौतसूत्रें निर्माण झालीं असलीं पाहिजेत. तीं त्याही पूर्वींचीं म्हणजे शकपूर्व २३६७५ इतक्या वर्षांपूर्वीं झालीं आहेत असें त्यांचें म्हणणें आहे; आणि ती श्रौतसूत्रें ज्या ब्राह्मणग्रंथावरून निर्माण झालीं ते ब्राह्मणग्रंथ त्या पूर्वींचे होत हें अर्थप्राप्तच आहे. त्यांचा काल शकपूर्व ५४००० वर्षें असा त्यांनीं ठरविला आहे. शेवटीं मंत्रभागाचा अर्थात् संहितांचा काल वैवस्वत मनूचा आरंभ अर्थात् शकपूर्व ३३४१५४, हा ठरविला आहे. तेव्हां त्यांच्या मतानें याज्ञवल्क्याचा कालही हाच ठरतो.

श्री योगीश्वर याज्ञवल्क्याचा वास्तविक काल ठरविणें झाल्यास, आमच्या मतें शतपथ ब्राह्मणावरूनच ठरविणें योग्य आहे. तेव्हां त्या दृष्टीनें आतां विचार करूं.

शतपथ ब्राह्मण कांड १३ प्र. ३ – ५ – ११ अ. ५ – ४ – ७ यामध्यें " दैवापः शौनकः जनमेजयं पारिक्षितं याजयाञ्चकार " असा उल्लेख आलेला आहे. या शतपथांत जनमेजयाच्या आलेल्या उल्लेखावरूनही याज्ञवल्क्याचा जन्मकाल कांहीं लोक ठरवूं पहातात. जरी प्रत्यक्षपणें याज्ञवल्क्याचा जन्मकाल निश्चितपणें या उल्लेखावरून ठरविण्यांत आलेला दिसून येत नाहीं तथापि शतपथांत ज्या अर्थी जनमेजयाचा उल्लेख सांपडतो व तो ' याजयांचकार ' असा भूतकालनिदर्शक सांपडतो. त्या अर्थी शतपथ ब्राह्मण जनमेजय राजाच्या नंतर थोड्याच कालांत अथवा त्याचे वेळीं याज्ञवल्क्यानें रचला असला पाहिजे, असें अनुमान निघतें. त्यांस सबळ पुरावा असाही मिळूं शकतो कीं, ' चतुर्विंशति मतस्मृतीची ' व्याख्या लिहितांना भट्टोजी दीक्षित यांनीं असें म्हटलें आहे कीं, जनमेजय राजाच्या अश्वमेध यज्ञाचे शेवटीं चोवीस ऋषींनीं एकत्रित बसून कलिवर्ज्य प्रकरणासह चतुर्विंशतिमतस्मृति निर्माण केली. त्या चोवीस ऋषींत श्री याज्ञवल्क्य हेही होते. यावरून याज्ञवल्क्य व जनमेजय समकालीन होत हें सिद्ध आहे.

म्हणजे जनमेजयाचा काल निश्चित झाला असतां याज्ञवल्क्याचा काल सहजच निश्चित होईल. जनमेजयाचा काल द्वापाराचें शेवटीं व कलीचे प्रारंभीं पहिली शताब्दि हा होय, असें जयपूर संस्कृत कॉलेजचे अध्यक्ष म. म. श्री. दुर्गाप्रसाद द्विवेदी यांनीं साहित्यदर्पणाच्या × आपल्या भूमिकेंत निश्चित ठरविलें आहे; त्या दृष्टीनें विचार करतां सुमारें ५००० वर्षांपूर्वीचा याज्ञवल्क्याचा काल ठरतो. परंतु जनमेजयाच्या कालासंबंधीं भिन्न भिन्न मतें दिसतात. पं. धर्माधिकारी मुकुंद झा, यांनीं * निरुक्तलघुविवृति पंचपादिन्यकेच्या आपल्या उपोद्घातांत अश्विनादि नक्षत्रक्रमानें सप्तऋषींच्या चारा-

× प्रत निर्णयसागर मुंबई सन १९२२

* प्रत निर्णयसागर मुंबई सन १९२२

वरून युगारंभ प्रवृत्ति गृहीत धरून परिक्षित जनमेजयाचा काल कालीच्या दहाव्या शताब्दीचा आरंभ काल हा ठरविला आहे. ह्याचा विशेष विस्तार वाचकवर्गानें तेथेंच अवश्य पहावा.

परंतु येथें एक गोष्ट अवश्य लक्षांत ठेविली पाहिजे कीं, पारिक्षित जनमेजय दोन असून एक पारिक्षित जनमेजय सुप्रसिद्ध कुरुकुलोत्पन्न युधिष्ठिर याचा पणतू जनमेजय हा होय; व दुसरा पारिक्षित जनमेजय युधिष्ठिराच्या पूर्वीं सुमारें ४२ पिढ्या होऊन गेला आहे. या पारिक्षित राजालाच पूरु असें नांव आढळतें. शतपथांत उल्लिखित पारिक्षित जनमेजय आणि पूरु ऊर्फ परिक्षिति याचा पुत्र जनमेजय हा एकच होय हें पुढील उताऱ्यावरून समजून येईल.

"एतेन हैन्द्रोतो दैवापः शौनकः जनमेजयं पारिक्षितं याजयांचकार············तदेतद्गाथयाभिगीतम्······ 'आसन्दीवति धान्यादꣳ रुक्मिणꣳ हरितस्रजम् । अबध्नादश्वꣳ सारंगं देवेभ्यो जनमेजयः ॥ इति शतपथ १३–५–४

एतेन ह वा ऐन्द्रेण महाभिषेकेण तुरः कावषेयो जनमेजयं पारिक्षितमभिषिषेच तदेषा यज्ञगाथाभिगीयते—आसंदीति धान्यादं रुक्मिणं हरितस्रजम् । अश्वं बबंध सारंगं देवेभ्यो जनमजेयः ॥

इति ऐतरेयः ॥ ८।२१

भीष्म उवाच

अत्र ते वर्तयिष्यामि पुराणमृषिसंस्तुतम् । इन्द्रोऽतः शौनको विप्रो यदाह जनमेजयम् ॥ आसीद्राजा महावीर्यः पारिक्षिज्जनमेजयः । एवमुक्त्वा तु राजानमिन्द्रोऽतो जनमेजयम् । याजयामास विधिवद् वाजिमेधेन शौनकः ॥

महाभारत अ. १४९

या शतपथ ब्राह्मण, ऐतरेय ब्राह्मण व महाभारत यांतील तिन्ही सारख्या कथानकावरून हें सहजच स्पष्टपणें दिसून येईल. तेव्हां पं. मुकुंद झा यांनीं ठरविलेल्या युधिष्ठिर प्रपौत्र जनमेजयाच्या काळांशीं शतपथ ब्राह्मणांत उल्लिखित जनमेजयाचा कांहींही अर्थाअर्थी संबंध नाहीं. नुसत्या नामसादृश्यावरून अनुमानें न काढणें हेंच बरें.

श्री. रा. रा. ज्यो. पं. शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं आपल्या भारतीय ज्योतिषशास्त्र या नांवाच्या पुस्तकांत “ कृत्तिकास्वादधीत । एता ह वै प्राच्यै दिशो न च्यवन्ते सर्वाणि ह वा अन्यानि नक्षत्राणि प्राच्यै दिशः च्यवन्ते ॥ ” कांड २ प्र. १–२–७ अ. १ – २ –२ इत्यादि शतपथांतील अंतर्गत प्रमाणावरून शतपथ ब्राह्मणाचा काल स्थूलमानानें शकपूर्व ३००० व सूक्ष्म मानानें २९९० हा ठरविला आहे, व हाच काल श्री. रा. भारताचार्य चिंतामणराव वैद्य यांनीं आपल्या महाभारताच्या उपसंहारांत उद्धृत केला आहे. त्याचप्रमाणें ज्योतिषाचार्य व्यंकटेश बापूजी केतकर यांनीं ‘ नक्षत्र विज्ञान ’ पुस्तकांत शतपथ ब्राह्मणाचा काल आजपासून ४९०० वर्षांपूर्वी ठरविला आहे.

श्री. रा. रा. स्वनामधन्य लोकमान्य बा. गं. टिळक यांनींही ओरायन ऊर्फ वेदकालनिर्णय या ग्रंथांत वेदकाल ज्योतिषशास्त्राच्या आधारें आजपासून ६००० वर्षें पूर्वींचाच ठरविला आहे. त्याचप्रमाणें रा. पावगी, रा. दफ्तरी प्रभृति अनेक विद्वानांनीं आपआपल्यापरि वेदकाल ठरविला, तोही हाच आहे.

हें शतपथासंबंधींचें वरील बिवेचन वर्तमान अठ्ठाविसाव्या महायुगांतील शतपथासंबंधानेंच असल्यानें व आपल्याला वर दर्शविल्याप्रमाणें अठ्ठाविसाव्या चतुर्युगांतील द्वापाराचे शेवटीं व कलीचे प्रारंभीं झालेल्या श्री याज्ञवल्क्याचा काल ठरविणें असल्यामुळें जो शतपथाचा काल तोच चतुर्युगदृष्ट्या प्रकृत याज्ञवल्क्याचा काल धरणें ग्राह्य होय. सारांश श्री याज्ञवल्क्याचा आजपासून ६००० वर्षांपूर्वी द्वापाराचा शेवट व कलीचा प्रारंभ हाच काल निश्चित होतो असें आम्हांस वाटतें.



## प्रकरण ३ रें

# पूर्ववंश

पूर्व प्रकरणांत याज्ञवल्क्याचा काल निश्चित केल्यानंतर आम्हीं आतां त्याच्या जन्मकथेकडे वळणार आहोंत. जन्मकथेकडे वळण्यापूर्वीं त्याचे वंशाचा पूर्वेतिहास पहावा असा आमचा उद्देश आहे. प्रथम आदि- पुरुष श्री अनंतकोटिब्रह्मांडनायक श्री नारायणापासून क्रमानें महर्षि विश्वा- मित्रापर्यंतों केवळ नांवानेंच याज्ञवल्क्याच्या पूर्वजांचा उल्लेख करणार असून, तेथून मात्र समग्र चरित्र देण्याचें ठरविलें आहे. त्याप्रमाणें नारायणापासून विश्वामित्रापर्यंतचे ❀ पुरुष १ श्री नारायण २ ब्रह्मा ३ अत्रि ४ सोम ५ बुध ६ पुरूरवा ७ विजय ८ भीम ९ कांचन १० होत्रक ११ जन्हु १२ पुरु १३ बलाक १४ अजाक १५ कुश ( इषीरथ ) १६ कुशिक ( कुशाम्बु ) १७ गाधि [ इन्द्रावतार ] १८ विश्वामित्र येणेंप्रमाणें आहेत. या सर्वांचीं चरित्रें भारत भागवत इत्यादि ग्रंथांतून प्रसिद्ध आहेत. विस्तार भयास्तव येथें देत नाहीं.

महर्षि विश्वामित्राचें ब्रह्मऋषित्व प्राप्तिसंबंधींचें चरित्र सर्वांस विश्रुतच आहे. इतकेंच नव्हे तर तो अनेक वैदिक सूक्तांचा द्रष्टाही झाला आहे. ऋग्वेदांतील तृतीय मंडलाचा द्रष्टा ऋषि विश्वामित्र असल्याचें बव्हृच × सर्वानुक्रमणिका द्वितीय अष्टक अध्याय १६ यांत म्हटलें आहे. तसेंच ब्राह्मण्य अधिष्ठानभूत असा सवितृदेवताक गायत्री मंत्राचा द्रष्टा ऋषि विश्वा- मित्र असल्याचें सर्वांना विदितच आहे.

कोणे एके वेळीं हरिश्चंद्रानें पुत्रप्राप्तिकरितां वरुण देवतेस उद्देशून नवस केला कीं, मला पुत्र झाल्यास त्यास अर्पण करून मी तुझें यजन करीन नवसाप्रमाणें वरुणाच्या प्रसादानें त्यास पुत्र झाला, तेव्हां त्यास वरुण

---

❀ श्रीमद्भागवत स्कंध ९

× गाधिजो विश्वामित्रः स तृतीयमंडलमपश्यदिति ॥

म्हणाला तूं आतां संकल्पाप्रमाणें मुलगा अर्पण करून यजन कर. त्या वेळीं राजा हरिश्चंद्रानें म्हटलें कीं, या मुलास १० दिवस झाल्यानंतर मी याग करीन. याप्रमाणें वरुणानें अनेक वेळां मागणी केली; ती हरिश्चंद्रानें या मुलास दांत आल्यानंतर, दांत पडल्यानंतर, पुन्हा दांत आल्यानंतर, धनुर्बाण कवच वागवूं लागल्यानंतर, इत्यादि सबबी सांगून अनेक वेळां नाकारिली, शेवटीं उपनयन केल्यानंतर वरुणानें पुन्हां मागणी केली असतां मात्र हरिश्चंद्रानें आपल्या मुलास बोलावून म्हटलें कीं, "बा! रोहिता, तुझ्या प्राप्तिकरितां मी वरुणाला नवस केला असून तो तुला परत वरुणाला अर्पण करण्यासंबंधींचा आहे." या प्रमाणें आपल्या पित्याचें वचन ऐकून रोहितानें नकारार्थी उत्तर दिलें व धनुष्यबाण कवच घेऊन तो अरण्यांत चालता झाला. एक वर्षानंतर अरण्यांत आपला पिता हरिश्चंद्र जलोदर रोगानें ग्रस्त झाल्याचें वृत्त त्याला समजलें. नंतर रोहितानें आपल्या पित्याला जलोदर रोगापासून मुक्त करण्याकरितां आपल्या बदली दुसरा एखादा नरपशु देऊन याग करावा असें ठरविलें, व त्या प्रमाणें अंगिराकुलोत्पन्न अजीगर्त याचा मध्यम पुत्र शुनःशेप यास, त्याचे पित्यास १०० गाई मोबदला देऊन, यज्ञबलिकरितां विकत घेतलें, व हा आपला बेत वरुणास कळविला. वरुणानेंही त्यास तसें करण्यास अनुमति दिली. नंतर राजा हरिश्चंद्रानें शुनःशेप पशुयुक्त राजसूय यज्ञाला प्रारंभ केला. त्या यज्ञाचें अध्वर्युत्व जमदग्नीकडे असून विश्वामित्र हा 'होता' होता. यज्ञाचे सवनीय दिवशीं [ शेवटच्या दिवशीं ] ठरल्याप्रमाणें शुनःशेप यास सर्व पशुसंस्कार केले, परंतु त्याचें हनन करण्यास कोणीही प्रवृत्त होईना. ते वेळीं क्षुधित असलेला अजीगर्त म्हणाला कीं, मला पुन्हा १०० गाई दिल्यास मी त्याचें हनन करीन. अशा रीतीनें मारण्यास प्रवृत्त झालेल्या पित्यास पाहून 'क्षणमात्र थांब, मी देवतांचें स्मरण करितों,' असें शुनःशेप म्हणाला. नंतर त्यानें क्रमानें अग्नि, सविता, भग, वरुण, इन्द्र, पुन्हां अग्नि, विश्वेदेव इत्यादि देवतांची 'हिरण्यस्य रथस्य' इत्यादि चार मंत्रांनीं प्रार्थना केली. त्यायोगानें देव संतुष्ट झाले व त्यास त्यांनीं जीवदान दिलें. अशा रीतीनें देवांनीं जीवदान दिलें म्हणून तो पुढें देवरात या नांवानीं प्रसिद्धि पावला. इकडे हरिश्चंद्रराजाही 'यत्र ग्रावा' या सूक्ताचा जप करून वरुणप्रसादानें रोगमुक्त झाला. नंतर तेथें असलेल्या सर्व ऋषींच्या समक्ष ( अजीगर्तानें ) घरीं चलण्याविषयीं देवरातास विनविलें.

ती विनंति नाकारून स्वयंदत्त पुत्रविधीनें देवरातानें विश्वामित्राचें पुत्रत्व स्वीकारलें. ऋषिमंडळींनेंही त्यास संमति दिली. नंतर राहिलेला यज्ञ जमदग्नीचें आध्वर्यव काढून घेऊन देवरातास देवविलें, व त्याचे हस्ते ' अंजस्तुवा ' विधीनें म्हणजे पशुइष्टिरहित आज्यादिद्रव्यकहोम विधीनें पूर्ण करविला. नंतर विश्वामित्रानें आपल्या सर्व पुत्रांस बोलावून सांगितलें कीं, हा देवरात आजपासून माझा पुत्र झाला असल्यानें तुम्ही सर्वांनीं याच्याशीं ज्येष्ठ बंधुत्वाच्या नात्यानें वागावें. अशा रीतीनें शुनःशेफ अर्थात् देवरात हा विश्वामित्राचा कृत्रिम किंवा स्वयंदत्त पुत्र झाला. || त्याचा पुत्र कृति हा होय. कृतीचा पुत्र शुनःपुत्र आणि त्याचा मुलगा चारायण हा होय. चारायण ऋषि हा मूलभूत यजुर्वेदांत द्वादश चरकापैकीं जी सातवी चारायणी या नांवाची शाखा तिचा हा प्रवर्तक ऋषि असल्याचें चरणव्यूहांत ¶ वर्णिलें आहे. याच चारायणाला देवरात, ब्रह्मरात, यज्ञवल्क, वाजसनी, अशी निरनिराळीं नांवें निरनिराळ्या ठिकाणीं दिलेलीं आढळतात. पैकीं देवरात $ हें नांव जाबाल $ संहिता, विष्णुपुराण, * श्रीमद् भागवत ‡ यांतून आढळतें. यज्ञवल्क हें नांव ' एवमाहस्मोक्त्वा किल याज्ञवल्क्यो ' यज्ञस्य वल्कः वक्ता = यज्ञवल्कः तस्य अपत्यं पुमान् याज्ञवल्क्यः † । दैवरातिरित्यर्थः । ' या श्री शंकराचार्यांचे बृहदारण्यक × भाष्यावरून स्पष्ट होतें. वाजसनी हें नांव देवराताला नित्य

---

|| हें सर्व कथा ऐतरेय ब्राह्मणांत परिप्लव भाग सांगतांना शौनःशेफ आख्यान म्हणून प्रसिद्ध आहे.

¶ खंड २ रें.

$ अ. १ श्लो. १ – १०

* अंश ३ अ. ५

‡ स्कंध १२ अ. ६ । ६५

† यज्ञानां यज्ञकांडानां वेदानां वल्कः वक्ता वचनशीलः यज्ञवल्कः पृषोदरादित्वाद्वल्कशब्दः साधुः । ब्रह्मरातो महाकर्मठः । तस्य गोत्रापत्यं पुमान्याज्ञवल्क्यः । कृष्णसूरिकृत वेदतत्त्वनिरूपण

× अ. १ ब्रा. ४ कं. ३

अन्नदान करण्यामुळें प्राप्त झालें; असें सुप्रसिद्ध चिदंबरभक्त सांब दीक्षित काशीकर यांनीं केलेल्या श्री याज्ञवल्क्य * चरित्रांत म्हटलें आहे.

तसेंच वाजसनि हें नांव श्री सायणाचार्यांच्या कण्वसंहितेच्या पुढील उपक्रमभाष्यावरून दिसून येतें.

**वाज इत्यन्नस्य नामधेयं अन्नं वै वाज इति श्रुतेः ॥ वाजस्य सनिर्दानं यस्य महर्षेरास्ति ॥ सोऽयं वाजसनिस्तस्य पुत्रो वाजसनेय इति तस्य याज्ञवल्क्यस्य नामधेयं ॥**

तसेंच वाजसनि हें नांव सूर्याला असल्याचें × 'आत्मपुराणाचे टीकाकार पं. काकाराम शर्मा यांच्या

**कीदृशं याज्ञवल्क्यं वाजसनेयसंज्ञकं तद्व्युत्पत्तिस्तु वाजैः केसरैः सनिर्दानं यजुषां यस्य स वाजसनिः अश्वरूपधरः सूर्यः * पुराणे वर्णितः ।**

या टीकेवरून दिसून येतें. मूलभूत चारायण हें नांव स्कं. पु. ना. खं. अ. २७८ यांत आलेलें आहे. या चारायणाचाच मुलगा याज्ञवल्क्य होय.

सारांश— अंगिरांगणोत्पन्न अजीगर्ताचा पुत्र शुनःशेफ हा वर सांगितल्याप्रमाणें विश्वामित्राचा स्वयंदत्त पुत्र झाला. इतकेंच नव्हे तर स्वजनक कुलाचा त्याग केल्याचें व विश्वामित्र कुल स्वीकाराचें निदर्शक असें 'देवरात' हें नामांतरहि त्यानें धारण केलें. याच्याच पुत्रपौत्रपरंपरेमध्यें या पासून पांचवा पुरुष याज्ञवल्क्य झाला असल्यानें तो विश्वामित्र गोत्रोत्पन्न म्हणजे विश्वामित्राच्या वंशांतील होय. हें याज्ञवल्क्यपुत्र महर्षि कात्यायनाचार्यांनें अपल्या प्रतिज्ञा परिशिष्ट नांवाच्या सूत्र ग्रंथांत 'सोऽहं कौशिक [ विश्वामित्र ] पक्षः शिष्यः ' या स्वाभिमानपूर्ण उक्तीनें स्पष्ट दाखविलें आहे.

---

* अ. १ श्लो. १०

× मधुकांड अ. ४ श्लो. ७७२

* वाजिनस्ते समाख्याताः सूर्यस्त्वश्वोऽभवद्यतः । शाखाभेदास्तु तेषां दश पंच च वाजिनाम् ॥ सूर्य पुराणे.

आदित्य परंपरा वेद चतुष्टय प्रवर्तक श्रीमद् योगीश्वर

# याज्ञवल्क्य वंशवृक्ष

अयं प्रसादात्
श्रुतिवर्ष्म भानोः
श्रीयाज्ञवल्क्यस्य
महान्पवित्रः ॥
वृद्धिं समागच्छतु
वंशपादपः
शाखाप्रशाखाततिभि-
र्विराजताम् ॥

१ श्री नारायण
२ ब्रह्मा
३ अत्रि
४ सोम
५ बुध
६ पुरूरवा
७ विजय
८ भीम
९ कांचन
१० होत्रक
११ जन्हु
१२ पूरु
१३ बलाक
१४ अजाक
१५ कुश ( इषीरथ )
१६कुशांबु (कुशिक)
१७ गाधि इंद्रावतार
१८ विश्वामित्र
×१९ शुनःशेप
२० कति
२१ शुनःपुत्र
‖ २२चारायण[देवरात]
* २३ याज्ञवल्क्य
†२४ कात्यायन (पारस्कर)
२५ वररुचि

× [१९]या शुनःशेपालाच देवरात असें दुसरें नांव आहे. हा देवरात व याज्ञवल्क्यपिता देवरात हा निराळा. या दोन व्यक्तींत पणजा व पणतू असें नातें आहे.

‖ [२२]या चारायणालाच देवरात, ब्रह्मरात, यज्ञवल्क, वाजसनि, असें निरनिराळ्या ग्रंथांतून भिन्नभिन्न नांवांनीं संबोधिलें आहे.

* [२३] यालाच दैवराति, ब्राह्मराति, वाजसनेयी, योगीश्वर, इत्यादि नांवें असून प्रकृत चरित्राचा प्रधान पुरुष हाच होय.

† [२४] यानें परशाखेचे पुष्कळ ग्रंथ केल्यावरून यास पारस्कर हें दुसरें नांव मिळालें. हा याज्ञवल्क्याची कनिष्ठ भार्या कात्यायनी इचा पुत्र होय.

## प्रकरण ४ थें

# अवतारकथा

देवरात यानें पुत्रप्राप्तीच्या इच्छेनें दीर्घकालपावेतों अत्यंत तीव्र व धर्मवर्धक तपाचरण केलें. त्या तपश्चर्येच्या योगानें कृपानिधि वेदमय असे सूर्यनारायण सुप्रसन्न होऊन त्याचे पुढें प्रगट झाले. सूर्यनारायणाला पाहिल्याबरोबर त्यानें आनंदित अंत:करणानें साष्टांग नमस्कार केला व परम श्रद्धेनें अनेक वैदिक स्तोत्रांनीं त्याचें स्तवन केलें. नंतर प्रसन्न झालेल्या सूर्य-नारायणानें 'वर माग!' म्हणून आज्ञा केली असतां तूंच माझा पुत्र हो असा वर त्यानें मागितला. सूर्यनारायणही हा इच्छित वर देऊन अंतर्धान पावले.

नंतर कोणे एके काळीं सर्व देवांस असें वाटलें कीं आपण मृत्युलोकीं जाऊन कर्मभूमि म्हणून सुप्रसिद्ध असलेल्या भारत देशांत ऋषिमंडळीसह सर्वकल्याणप्रद असा यज्ञ करावा, म्हणून सर्व देवांनीं व ऋषींनीं एकत्र जमून देवयजन भूमींत यज्ञ केला. त्या यज्ञाचें यजमानत्व देवांनीं ब्रम्हदेवाकडे दिलें होतें. यज्ञमुहूर्तही ठरला.

सर्व सामग्री सिद्ध होऊन प्रारंभाचा समय प्राप्त झाला. तथापि यजमानपत्नी सावित्री हिचें आगमन न झाल्यानें यज्ञमुहूर्त टळूं लागला. सबब दुसऱ्या पत्नीचा स्वीकार करून यज्ञास प्रारंभ करावा, असें ब्रह्मदेवानें ठरविलें व तत्काळ इंद्राला आज्ञा केली कीं, समोरच्या रस्त्यानें चाललेली गोपकन्या कुमारी गायत्री हिला घेऊन ये. त्याप्रमाणें इंद्रानें तिला आणलें. ती गोपकन्या सर्व दिव्य लक्षणांनीं युक्त असल्याचें ब्रह्मदेवास आढळून आलें. ब्राह्मण व गाई यांचें फारच साम्य आहे, कारण एके ठिकाणीं मंत्र व एके ठिकाणीं हविर्द्रव्य असतें, + असा विचार करून त्या गोपकन्येस गाईचे मुखांत प्रवेश करवून पाश्चिम द्वारानें बाहेर काढलें. अशा रीतीनें त्या गायत्रीला ब्राह्मणी करून

---

+ ब्राह्मणानां गवां चैव कुलमेकं द्विधा स्थितं ।
एकत्र मंत्रास्तिष्ठन्ति हविरेकत्र संस्थितम् ॥ स्कं. पु. ना. खं. अ. २७८

नंतर विधिपूर्वक तिचा पत्नी म्हणून स्वीकार केला; व तिला बरोबर घेऊन यज्ञास प्रारंभ केला. इतक्यांत देवांच्या स्त्रियांसहवर्तमान सावित्री तेथें आली व तिनें यज्ञशाळेंत यज्ञीय मेखलेनें मंडित अशा गायत्रीला पाहिलें. तेव्हां ब्रह्मदेवास सावित्री म्हणाली, " हे पिता-मह! एक पत्नी असतांना दुसऱ्या पत्नीचा स्वीकार करणें हें मानुष कृत्य आचरण केलेंस त्याअर्थी आजपासून तूं माझा पति नव्हेस, तर तूं 'पितामहच' आहेस. याचें प्रायश्चित्त म्हणून तूं भूलोकांत मानुष जन्माला प्राप्त होशील. " असा शाप देऊन, सावित्री त्या यज्ञमंडपांतून निघून, एका गिरिशिखरावर तपश्चर्या करण्याकरितां गेली.

तात्पर्य बरेच कालानंतर सावित्रीनें दिलेल्या शापामुळें व देवरातास सूर्यानें दिलेलें 'मी तुझा पुत्र होईन!' हें अभिवचन खरें करण्याकरितां ब्रह्मदेव देवराताचे घरीं त्याचा पुत्र याज्ञवल्क्य म्हणून अवतीर्ण झाले.

याप्रमाणें ब्रह्मदेवाला अवतीर्ण होण्याचें कारण पडलें असें स्कंद-पुराण नागरखंड अ. २७८ मध्यें वर्णिलें आहे. याच नागरखंडाच्या १२९ व्या अध्यायांत शंकरानें शाप दिल्याचें वर्णन आहे. ह्या दोन गोष्टी परस्पर विरोधी अशा दिसतात. परंतु शंकरापेक्षां सावित्रीनेंच शाप देणें हें अधिक युक्तियुक्त दिसतें व सावित्रीनें दिलेल्या शापास शंकरानें सावित्रीचें म्हणणें न्याय्य व उचित असल्यानें त्याचें समर्थन करण्याचे हेतूनें अनुमति दिली असावी असें आम्हांस वाटतें; व श्री व्यासानेंही याच अभिप्रायानें १२९ व्या अध्यायांत 'तदा वैवाहिके काले शऽप्तो यः शंभुनास्वयं' असें म्हटलें असावें, असा अर्थ केला असतां तो योग्यही दिसेल व विरोधही राह-णार नाहीं.

तसाच दुसरा एक विरोध दिसतो त्याचाही येथें विचार करूं.

जाबाल संहितेंतील वर दिलेल्या देवराताच्या तपश्चर्या–वर्णनावरून याज्ञवल्क्य सूर्याचा अवतार असल्याचें दिसतें व त्याच्या पुढें दिलेल्या स्कंद पुराणांतील कथानकावरून याज्ञवल्क्य हा ब्रह्मदेवाचा अवतार आहे असें दिसतें. सकृद्दर्शनीं याही दोन्हीं गोष्टी परस्पर विरोधी दिसतात. परंतु दिसतो तसा विरोध नाहीं. मग व्यासानें एकाच व्यक्ति संबंधानें असें भिन्न भिन्न वर्णन कां केलें असा प्रश्न उद्भवणें साहजिक आहे. परंतु तसें वर्णन करण्यांत कांहीं

विशिष्ट तात्पर्य असलें पाहिजे. आमच्या मतें तें तात्पर्य पुढीलप्रमाणें आहे.

याज्ञवल्क्याच्या अवतारास दोन कारणें असल्याचें वर नमूद केलें आहेच. अवतार जो होतो तो सर्वांशानें होत नसून अंशात्मक होत असतो, हा अवतारमीमांसेचा सिद्धांत आहे. त्या दृष्टीनें विचार करितां सूर्य ही देवता त्रिगुणात्मक अर्थात् ब्रह्म–विष्णु–शिवात्मक अशी आहे. याज्ञवल्क्य हा सूर्याचा अवतार आहे ही गोष्ट खरी पण तो अवतार अंशात्मक आहे. अर्थात् ज्या अंशापासून याज्ञवल्क्य अवतार झाला तो रजोगुणात्मक ब्राह्म अंशच होय. या दृष्टीनें याज्ञवल्क्य हा ब्रह्मदेवाचा अवतार आहे, हेंही म्हणणें तितकेंच खरें आहे. 'एका क्रिया द्व्यर्थकरी प्रसिद्धा' या न्यायानें एक्या याज्ञवल्क्याच्या अवतारानें सावित्रीचें शापप्रदान व सूर्यानें देवरातास दिलेलें पुत्रप्राप्तीचें वरप्रदान या दोन्हीं गोष्टी साधिल्या. या दोन्ही गोष्टी प्रसिद्ध होण्याकरितांच व्यासानें दोन ठिकाणीं दोन तऱ्हेनें वर्णन केलें आहे, असें आमचें मत आहे.

याज्ञवल्क्याच्या अवतारासंबंधीं विशेष लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट ही आहे कीं, याज्ञवल्क्याचा अवतार जरी मानुष स्वरूपाचा आहे तथापि तो सर्वसामान्य मनुष्याप्रमाणें नसून उत्पत्तीचे बाबतींत मनुष्याहून विलक्षण आहे. देवरात ऋषीनें इतर ऋषिमंडळीसह कोणे एके काळीं ब्रह्मतेजाला समृद्ध करणारा असा बृहस्पतिसव नांवाचा याग केला. याग करते-वेळीं देवराताला सूर्यानें दिलेल्या वराचें स्मरण झालें व लगेच त्या यज्ञवेदींत गार्हपत्य अग्नीपासून निघालेलें दिव्यस्वरूपधारी असें एक बालक त्याचे अवलोकनांत आलें. नंतर देवरातानें त्या बालकास उचलून घेतलें व आलिंगन देऊन अंकावर बसविलें. त्यावेळीं ब्रह्मादि देवांनीं व ऋषिंनीं त्या अग्नितुल्य बालकाची प्रशंसा करून त्यास शुभाशीर्वाद दिले व देवराताकडून जातकर्मादि संस्कारही करविले. नंतर ब्रह्मदेवानें त्या बालकाचे ठिकाणीं योगशास्त्राला उचित अशीं सर्व लक्षणें पाहून त्याचें योगीश्वर व यज्ञवल्काचा मुलगा म्हणून याज्ञवल्क्य अशीं नांवें × ठेवविलीं.

---

× ही कथा जाबाल संहिता अ. १ मध्यें दिली आहे.

मद्रास प्रांतांत आंध्र लिपींतून छापून प्रसिद्ध असलेल्या याज्ञवल्क्याच्या चरित्रावरून व त्याला अनुसरून काशी येथील श्री. प. प. ब्रह्मानंद सरस्वती स्वामी यांनीं केलेल्या श्री याज्ञवल्क्य–पूजा–विधानाच्या अर्घ्यमंत्रांतील ' सुनंदागर्भसंजात ' या विशेषणाचाही येथें विचार केला पाहिजे. सुनंदा ही देवराताची पत्नी असून याज्ञवल्क्याची मातोश्री असली पाहिजे, असें अनुमान या विशेषणावरून निघतें. पण ' गर्भसंजात ' हें विशेषण वर सांगितल्याप्रमाणें याज्ञवल्क्याचा अवतार अयोनिज असल्यामुळें औपचारिक ठरतें. असो. या प्रमाणें याज्ञवल्क्याची जन्मकथा वाचकवर्गास आम्हीं सादर केली आहे.

आतां याज्ञवल्क्याचा अवतार कोणत्या महिन्यांत कोणत्या तिथीस कोणच्या वेळीं झाला हें निश्चित सांगावयास पाहिजे, परंतु तें सांगणें कठीण आहे. कारण त्याचें वर्णन कोठेंच आढळत नाहीं. आज महाराष्ट्रांतून जे कांहीं ठिकठिकाणीं उत्सव होतात, त्यांचे चालकांकडेही आम्हीं चवकशी केली परंतु त्या बाबतींत विशेष असें कांहींच मिळालें नाहीं. त्यांपैकीं ज्या कांहींनीं कारणें दिलीं तीं या कामीं अनुपयुक्त अशींच आहेत. तत्रापि त्या पैकीं चार कारणें येथें नमूद करावींशीं वाटतात.

पहिलें कारण म्हणजे श्रीक्षेत्र पंढरपुर येथें श्रा. शु॥ १५ स जो याज्ञवल्क्याचा उत्सव केला जातो तो काय धोरणानें असावा याचा तपास करितां पुढील प्रमाणें कळलें. वैयासिक चरणव्यूह भाष्यांत ' एतत्सखिलं सशुक्रियं मध्याह्ने शुक्लवर्णेन सूर्येण दत्तं तत् शुक्लयजुः परिसंख्यातमित्यर्थः । वेदोपक्रमणे चतुर्दशीयुक्तपौर्णिमाग्रहणात् शुक्लयजुरिति वा ' असा उल्लेख आला आहे.

यावरून श्रावण शुद्ध चतुर्दशी युक्त पौर्णिमा या दिवशीं मध्याह्न कालीं याज्ञवल्क्याला श्री सूर्य नारायणापासून वेद प्राप्त झाले असें दिसतें. जोंपर्यंत याज्ञवल्क्याची जन्मतिथि निश्चित उपलब्ध नाहीं, तोंपर्यंत याज्ञवल्क्याचा वेदप्राप्तिदिन हाच उत्सवास घेणें रास्त आहे, असें समजून श्रावण शु. १५ ही तिथि उत्सवास गृहीत धरली आहे.

दुसरें कारण पुण्याचे वे. रा. रा. श्रीगोंदेकर गुरुजी यांनीं सांगितलें तें असें कीं, बडोदे येथील रा. वामोरकर यांनीं श्री अक्कलकोट स्वामी महारा-

जांचें गुरुलीलामृत नांवाचें एक प्राकृत ओवबिद्ध चरित्र लिहिलें असून त्याचा पांचवा अध्याय जयंती अध्याय आहे. त्यांत अनेक जयंत्या सांगतांना याज्ञवल्क्याच्या जयंती तिथीचें वर्णन करणारी ओवी पुढील प्रमाणें आली आहे.

फाल्गुन शुद्ध पंचमी तिथी ।
कोणी वदती याज्ञवल्क्य जयंती ॥
फाल्गुन शुद्ध सप्तमी दिनीं म्हणती — ।
कपिलावर हा जाहला ॥ ३१० ॥

श्री गुरुलीलामृत [ गुरुशिष्यसंवादे ] पंचमोध्यायः

करितां फाल्गुन शुद्ध ५ तिथि ही उत्सवास गृहीत धरली आहे.

संशय -तिमिर–दिवाकर या ग्रंथांत याज्ञवल्क्याचा जन्मदिन ‘ ज्येष्ठ शुद्ध दशमी ’ धरला असून त्रेतायुगांत मिथिला नगरींत जन्म झाल्याचें म्हटलें आहे. परंतु हें म्हणणें वरील पुराणप्रसिद्ध अवतारकथेशीं विसंगत असल्यानें बरोबर वाटत नाहीं.

तसेंच मद्रास प्रांतांत सुमारें ७ वर्षांपूर्वी याज्ञवल्क्य नांवाचें मासिक पत्र निघत होतें. त्याचे संपादक ‘ भागवतला लक्ष्मीपति शास्त्री ’ यांनीं प्रभव संवत्सरांतील कार्तिक मासाच्या अंकांत याज्ञवल्क्याचा जन्मदिन कार्तिक शु. ❀ ९ रविवार हा दिला आहे. ह्या आपल्या म्हणण्यास त्यांनीं कांहीं विशेष असें गमक दिलें नाहीं. या सर्वांचा विचार करितां श्रावण शुद्ध १५ हीच आम्हांस अधिक ग्राह्य वाटते.



---

❀ ऊर्जे मासि सिते यमे रविदिने लग्ने धनुष्के तथा ।
नक्षत्रे शततारके च सुमहान् गर्भात्तवेदो मुनिः ॥
यो वै सर्वगुणाधिकः श्रुतिमयो जातः सुनंदात्मजः ।
सोऽयं वाजसनेयरूपनृहरिः कुर्यात्सदा मंगलम् ॥

सहस्रनाम स्तोत्राच्या प्रारंभाचा हा श्लोक आहे.

प्रकरण ५ वें

# विद्यार्थीदशा व ऋग्वेदपरित्याग

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें देवरातानें याज्ञवल्क्याचें नामकरण केल्यानंतर योग्य काळीं उपनयनापूर्वीचे सर्व संस्कार करून उपनयन संस्कारही केला. गायत्री उपदेश करून गायत्रीचा महिमाही त्यास सांगितला. याप्रमाणें याज्ञवल्क्य पित्याच्या आज्ञेवरून ब्रह्मचर्यव्रत धारण करून वेदाध्ययनामध्यें तत्पर झाला. परंतु प्रारब्धवशात् त्याचे अध्ययनांत वारंवार विघ्न उपस्थित होऊं लागलें. तथापि ' विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमानाः । प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति ॥ ' या न्यायानें त्यानें तीं सर्व विघ्नें दूर करून, आपलें इच्छित साध्य केलें.

याज्ञवल्क्य चमत्कारपुरांतच ( वडनगर ) रहात असलेल्य विदग्ध * शाकल्य नांवाच्या ऋषीकडे गेला, व त्याचें शिष्यत्व पत्करून त्यानें त्याजपाशीं संपूर्ण ऋग्वेदाचें अध्ययन केलें.

विदग्ध शाकल्य हा ऋग्वेदांतील सुप्रसिद्ध शाकल शाखेचा प्रवर्तक श्रुतऋषि असून त्याचेजवळ सहस्र शिष्य वेदाध्ययनाकरितां असत. हा नागर ब्राह्मण होता. एके वेळीं या चमत्कार क्षेत्रांत ज्या ठिकाणीं जलशायी नारायणाची मूर्ति होती, अशा स्थळीं सूर्यवंशसमुत्पन्न आनर्त देशाचा अधिपति राजा सुप्रिय हा चातुर्मास्यांत येऊन राहिला, व त्यानें चातुर्मास्य व्रत ग्रहण केलें. त्या चातुर्मास्य व्रतासंबंधीं शांतिक पौष्टिक नित्यकर्म करण्यासाठीं विदग्ध शाकल्याची त्यानें प्रार्थना केली, " जोंपर्यंत मी या क्षेत्रांत वास्तव्य करीत आहे तोंपर्यंत माझें पौरोहित्य करण्याविषयीं मजवर अनुग्रह करावा. " शाकल्यानेंही त्याचे म्हणण्यास अनुमोदन दिलें, व नित्य एक नवा शिष्य पौरोहित्य करण्याकरितां पाठवूं लागला. त्या शिष्यानें राजाचे घरीं जाऊन शांतिक पौष्टिक कर्म करून व राजास आशीर्वाद देऊन त्यानें दिलेली दक्षिणा

---

* विदग्ध म्हणजे पंडित असें समजावें.

गुरूस आणून द्यावी, व नंतर आपलें घरीं जावें. असा नित्याचा व्यवहार सुरू होता. याप्रमाणें एके दिवशीं शाकल्यानें राजाकडे याज्ञवल्क्यास पाठविण्याचे ठरवून त्याप्रमाणें त्यास पाठविलें. याज्ञवल्क्य शाकल्याचे आज्ञेवरून राजाचे घरीं गेला, व चातुर्मास्यांतील त्या दिवशींचें विधीविधान करून शेवटीं पंचांगरुद्रानें अभिमंत्रित असें अक्षतपुष्पामिश्रित जल घेऊन राजास अभिषेक करण्याकरितांप्रवृत्त झाला. छंद, ऋषि, देवता, विनियोग यांच्या सहित "द्याम्मा लेखी * " या मंत्राचा उच्चार करून राजाचे मस्तकावर जलसिंचन करणार इतक्या अवकाशांत त्याच्या वर्तनाविषयीं राजास संशय येऊन राजा विकट हास्य करून म्हणाला, " हे द्विजश्रेष्ठा ! मी नुकताच निद्रावस्थेंतून उठलेला असून, पर्युषित ( पारसा ) आहे. तरी हें मंत्रोदक व मंत्राक्षता या समोरील अश्वशालेच्या काष्ठावर टाक. " राजाचें तें हास्य पाहून संतप्त झालेल्या याज्ञवल्क्यानें परब्रह्माचें ध्यान करून त्याचे म्हणण्याप्रमाणें तें जल अश्वशालेच्या स्तंभावर टाकिलें नंतर तो नेहमींप्रमाणें मिळणारी दक्षिणा न घेतां तेथून निघून जाऊं लागला. इकडे तें उदक पडतांच तो स्तंभ ✻शाखा, पल्लव, फल, पुष्प इत्यादिकांनीं सुशोभित झाला. हा प्रकार पाहून विस्मित झालेला राजा पश्चात्तापपूर्वक म्हणाला, " हे ब्राह्मणश्रेष्ठा ! मलाही तूं पुन्हां याच मंत्रानें अभिषेक कर. म्हणजे मी पवित्र होईन. " हें राजाचें वाक्य ऐकून याज्ञवल्क्य म्हणाला. " मजकडून तूं अभिषेक करवून घेण्यास अयोग्य आहेस. ह्यासाठीं मी माझ्या गुरूकडे परत जातों. " राजा पुन्हां याज्ञल्क्यास म्हणाला. " जाऊं नको माझें म्हणण्याप्रमाणें मला अभिषेक कर. मी तुला पुष्कळसें वस्त्र, पात्र, वाहन, द्रव्य, दक्षिणा वगैरे देईन. " याज्ञवल्क्यानें

---

* — शु. य. माध्यं. सं. अ. ५

✻ तं प्रोवाच विहस्योच्चैर्देहि विप्राक्षतं जलं । मंदुरायां स्थितं यच्च काष्ठमेतत्प्रदृश्यते ॥ याज्ञवल्क्यस्ततो दृष्ट्वा सकोपस्तमुपाद्रवत् । क्षिप्त्वा तत्र जलं विप्राः साक्षतं गृहमागताः ॥ अगृह्य दक्षिणां तस्य पार्थिवस्य यथास्थितां । एतस्मिन्नंतरे तस्य धवकाष्ठस्य सर्वतः । विनिष्क्रांता विविधाः शाखाः पल्लवैरलंकृताः ॥ स्कं. पु. ना. खं. अ. २७८ । ४० — ४३.

पुन्हां राजास सांगितलें, " अभिषेकाकरतां म्हटलेला मंत्र होमांत इतिकर्तव्यतेवांचून फलद्रूप होत नाहीं. सबब तुझी इच्छा पुरविणें मला आतां शक्य नाहीं. मी आतां माझ्या गुरूकडे जातो. " असें म्हणून तो निःस्पृह चित्तानें निघून गेला. नंतर राजाचे मनांत ते दिवशीं विचारांचें काहूर उत्पन्न झालें. तो मनांत म्हणाला, " धिक्कार असो कीं, मी हें अकार्य केलें. निश्चयानें तो ब्राह्मण कोणी तरी देवपुरुष असून ब्राह्मणरूपानें अवतरलेला असावा. त्यावांचून इतके प्रबळ मंत्रसामर्थ्य असणें संभवनीय नाहीं. जर मी त्या मंत्रोदकानें स्नान केलें असतें तर जरामरणरहित झालों असतों, यांत मुळींच संदेह नाहीं. " अशा रीतीनें विचार करणाऱ्या राजाला तो दिवस शतसंवत्सराप्रमाणें वाटला.

दुसरे दिवशीं प्रातःकाल होतांच शाकल्याकडे राजानें दूत पाठवून त्यास बोलावून घेतलें, आणि नम्रभावानें म्हणाला, " काल जो शिष्य आपण मजकडे पाठविला त्यालाच पुन्हां आज पाठवावें. कारण त्याचे ठिकाणीं माझी विशेष भक्ति बसली आहे. " शाकल्य राजाचें म्हणणें कबूल करून घरीं आला, आणि याज्ञवल्क्यास म्हणाला, " हे वत्सा ! आजही शांत्यर्थ तूंच जा. कारण राजानें तुलाच आज बोलाविलें आहे. त्या वेळीं याज्ञवल्क्य गुरूस म्हणाला, ज्या अर्थी राजानें माझा अपमान केला व माझा आशीर्वाद ग्रहण केला नाहीं, तसेंच ज्यानें मला अश्वशालेच्या काष्ठावर अक्षता व जल टाकण्यास सांगून त्या शुष्क काष्ठास वृथा फलपल्लवपुष्पादिकांनीं सुशोभित करावयास भाग पाडलें, अशा त्या गर्विष्ठ व दुर्मति राजाचे घरीं शांति करण्याकरितां मी मुळींच जाणार नाहीं. आपण दुसऱ्या शिष्यास पाठवावें. " नंतर शाकल्य पुन्हां याज्ञवल्क्यास म्हणाला, " हे वत्सा ! हा तुझा प्रभाव पाहूनच तुला त्यानें पुन्हां बोलाविलें आहे. तेव्हां तूं लवकर जा. देशांत राहणाऱ्या लोकांनीं राजाचा अपमान करूं नये. जो कोणी मनुष्य राजाचे विरुद्ध वागेल तो मूर्ख म्हणून समजावा. त्याला कधींही सौख्य होणार नाहीं. त्याचा योगक्षेमही नीट चालणार नाहीं. जो कोणी जाति, द्रव्य, रूप व विद्या यांच्या अभिमानानें राजाच्या विरुद्ध वागतो, त्याला आमरणांत भिक्षा मागणें हें प्रायश्चित्त मिळतें. राजानें केलेल्या अपमानापासून कधींही नुकसान होत नाहीं. राजानें पुन्हां बोलावून मान दिला असतां जो नाकारतो तो राजाला प्रिय होत नाहीं. हा कोप हा

प्रसाद इत्यादि विचार न करितां मानापमानास सारखें समजून जो चित्त स्थिर ठेवील, सहन करील व अंतःकरणांत क्षमा बाळगील, तो सुज्ञ मनुष्य राजास प्रिय होतो. तेव्हां तूं अपमानाचा विचार न करतां राजगृहीं जा. माझी आज्ञा उल्लंघन न करणें हाच खरा तुझा धर्म आहे." या प्रमाणें गुरुशिष्याचा संवाद चालू असतां फिरून राजा सुप्रियाकडून लागोपाठ दोन चार दूत आले व याज्ञवल्क्यास पाठविण्याविषयीं त्वरा करूं लागले. बारंवार सांगून सुद्धां याज्ञवल्क्य ऐकत नाहीं, असें पाहून उद्दालक आरुणि नांवाचे शिष्यास शाकल्यानें राजगृहीं पाठविलें. तोही राजगृहीं जाऊन यथाविधि सर्व कर्म करून शेवटीं तें उदक घेऊन राजाला अभिषेक करण्याकरितां गेला असतां त्यास तें उदक याज्ञवल्क्याप्रमाणें समोरील एका काष्ठावर टाकावयास राजानें सांगितलें. उद्दालक आरुणिही त्या काष्ठावर अभिषेक करून घरीं परत आला. इकडे राजास तें काष्ठ, काष्ठच दिसलें. त्यामुळें त्यास खेद व पश्चात्ताप झाला. पुन्हां राजानें शाकल्याकडे दुसरा दूत पाठवून कळविलें कीं, तुझ्या याज्ञवल्क्य शिष्यालाच तूं मजकडे पाठीव, कारण त्या दिवशीं माझ्या हातून त्याचा अपमान झाल्यामुळें व आशीर्वाद नाकारल्यामुळें माझें मन स्वस्थ नाहीं; करितां त्यालाच पाठविलें असतां माझें मन स्वस्थ होईल. या प्रमाणें राजानें शाकल्याकडे बारंवार निरोप पाठवावे, व शाकल्यानेंही याज्ञवल्क्यास जाण्यास सांगावें; परंतु याज्ञवल्क्यानें ती गोष्ट नाकारावी. नंतर शाकल्यानें उद्दालक आरुणीच्या नतर मधूक पैङ्ग्य, व प्रचूडभागवित्ति या दोन * शिष्यांना क्रमानें पाठविलें, परंतु याज्ञवल्क्याचे ठिकाणीं असलेले मंत्रसामर्थ्य कोणांतच नाहीं असें पाहून एके दिवशीं आनर्ताधिपति स्वतःच शाकल्याचे आश्रमांत येऊन विनंति करूं लागला कीं, तुझ्या याज्ञवल्क्य शिष्याला उद्यां सकाळीं मजकडे पाठीव. म्हणजे त्या योगानें मला स्वास्थ्य मिळेल. या प्रमाणें राजाचें म्हणणें ऐकून घेतल्यानंतर पुन्हां शाकल्य राजासमक्ष याज्ञवल्क्यास म्हणाला " राजा स्वतः बोलवावयास आल्यानें तूं आतां त्याचे घरीं जाऊन रोगविनाशार्थ शांतिक कर्म करावेंस अशी माझी तुला आज्ञा आहे. तूं ती परिपालन

---

* हीं नांवें व परंपरा बृ. इ. खिलकांड अ. ६ येथें आढळते.

केलीच पाहिजे." याज्ञवल्क्यानें गुरूची सक्ती करणारी आज्ञा ऐकून स्पष्ट खणखणीत उत्तर दिलें, "जर तूं शिष्यांना आज्ञा करण्याच्या बाबतींत असलेल्या मर्यादेचें उल्लंघन करीत आहेस तर अन्याय्य अशी ही आज्ञा मी कधींही पाळणार नाहीं. तेव्हां हे गुरो! तूं मला अशी आज्ञा करूं नकोस. मी मुळींच जाणार नाहीं. कारण या राजानें माझा अपमान केला आहे. जर कां तूं बलात्कारानें मला पाठविशील तर मला तुझा त्याग × करावा लागेल." याप्रमाणें याज्ञवल्क्याची ती ओजस्वी प्रतिज्ञातुल्य वाणी ऐकून शाकल्यही म्हणाला, "शिष्याला एक अक्षरदेखील प्रदान करणाऱ्या गुरूची योग्यता फार मोठी असते. पृथ्वीवर असें एकही द्रव्य नाहीं कीं, जें गुरूला मोबदला देऊन त्याचे उतराई होतां येईल. ज्या अर्थी माझें शिष्यत्व पत्करून माझें आज्ञेप्रमाणें वागत नाहींस त्या अर्थी तुला आतां मी ब्रह्मशाप देणार." याप्रमाणें ही गुरूची दर्पोक्ति ऐकून याज्ञवल्क्य म्हणाला, "हे गुरो! आपण कांहीं एक विचार न करितां अन्यायानें शाप देणार असल्यास मीही उलट आपल्याला शाप दिल्याशिवाय रहाणार नाहीं. कारण महर्षींनीं म्हटलें आहे कीं, कार्याकार्य न जाणणारा गर्विष्ठ, व उन्मार्गगामी, अशा गुरूचा × परित्याग करावा. कारण ज्या अर्थी शिष्यांना तूं सारखी अयोग्य आज्ञा करितोस त्या अर्थी आजपासून तूं माझा गुरु नव्हेस. तथापि तुझी इच्छा असल्यास तुझे जितके शिष्य आहेत, तितके दिवस मी तुझे आज्ञेप्रमाणें वागेन. तुझी इच्छा नसल्यास मी येथून दूर निघून जाईन." नंतर शाकल्य म्हणाला, "दुष्टा जा! पाठ दाखव! मात्र जातांना माझी विद्या टाकून जा! नाहीं तर शाप देईन. मी तुला हें क्षुरिकामुंड ॐ कल्पानें अभिमंत्रित केलेलें जल देतों तें घे! पी! त्याच्या सामर्थ्यानें मजपासून शिकलेली जठराग्निचे ठिकाणीं असलेली विद्या तूं सहज टाकशील." म्हणून आथर्वण वेदांतील नादबिंदुपासून उत्पन्न झालेल्या आथर्वण मंत्रांनीं अभिमंत्रण केलेलें जल त्यास दिलें. याज्ञव-

× गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः । उत्पथप्रतिपन्नस्य परित्यागो विधीयते ॥ स्कं. पु. ना. खं. अ. २७८

ॐ हा कल्प आथर्वण वेदांत आहे.

ल्क्यानेंही तें उदक पिऊन क्षणामध्यें शिथिलगात्र होऊन वांतिधर्मानें पण ज्या प्रमाणें हत्ती पान केलेलें उदक आपल्या सोंडेनें बाहेर काढतो, त्या प्रमाणें आपल्या उदरांतील अन्नोदकाबरोबर ऋग्वेद विद्या बाहेर टाकिली. आणि रागावून शाकल्यास म्हणाला " माझे उदरांत तुझ्या विद्येचें एकही अक्षर नाहीं; त्या बाबतींत मी तुझा नाहीं व तूं माझा नाहीं. तेव्हां मी माझ्या इच्छेनें गेल्यास तूं काय करशील? " असें म्हणून याज्ञवल्क्य तेथून निघून × गेला.



× ही सर्व कथा स्कं. पु. ना. खं. अ.२७८ व १२९ मध्यें आहे.

प्रकरण ६ वें

# यजुर्वेद परित्याग

नंतर प्रभास क्षेत्रांत आपला मातामह यजुर्वेदाचा गुरु वैशंपायन महर्षि रहात होता त्याकडे याज्ञवल्क्य गेला व हा घडलेला सर्व वृत्तान्त निवेदन करून त्यानें यजुर्वेदाध्ययन सांगण्याविषयीं त्यास प्रार्थना केली. वैशंपायनानें त्याची ही प्रार्थना मान्य करून त्यास समग्र यजुर्वेद शिकविला. अशा रीतीनें ह्या आजानातवामध्यें गुरुशिष्याचें नातें उत्पन्न झालें.

ह्या गुरुशिष्यांतही एके काळीं तंटा उपस्थित झाला. तो प्रसंग असा कीं, कोणे एके वेळीं सुमेरु पर्वतावर कांहीं विशिष्ट कार्याकरितां ऋषिमंडळींची सभा भरली होती. त्या ऋषिमंडळींत असाही एक संकेत ठरला होता कीं, सात दिवसांच्या आंत जो या सभेस येणार नाहीं त्यास वाचिक ब्रह्महत्येचें पातक लागेल. वैशंपायन ऋषि कांहीं कारणांनीं सभेस जाण्याकरितां बरेच उशीरां निघाले. त्यामुळें त्वरेनें जात असतां मध्यें निजलेल्या आपल्या बहिणीच्या बालकाचे अंगावर पाय पडून तें मृत झालें. त्या बालकाच्या आकस्मित निधनामुळें वैशंपायन सुमेरु पर्वतावर सभेस जाऊं शकले नाहींत. अशा रीतीनें वैशंपायनास बालहत्येचें व वाचिक ब्रह्महत्येचें पातक घडलें. नंतर वैशंपायनानें आपल्या सर्व शिष्यांस बोलावून म्हटलें, "मी वृद्ध आहे; तरी माझ्या ब्रह्महत्या व बालहत्या या दोन्ही पापांचीं प्रायश्चित्तें माझ्याकरितां तुम्ही आचरण करा. कसलाही विचार करूं नका." गुरूचें हें वाक्य ऐकून याज्ञवल्क्य म्हणाला, "या सर्व अल्पसामर्थ्य शिष्यांना कशाकरितां त्रास देतां ! हीं दोन्हीं प्रायश्चित्तें मी एकटाच करीन." ह्या भाषणानें क्रुद्ध झालेला वैशंपायन याज्ञवल्क्यास म्हणाला, "या सर्व ब्राह्मणांना तूं निस्तेज म्हणून संबोधितोस व अशा रीतीनें या ब्राह्मणश्रेष्ठांचा अपमान करितोस. तेव्हां मी अपमान करणाऱ्या या शिष्याशीं कांहींही संबंध ठेवूं इच्छित नाहीं. मजजवळ जें अध्ययन केलेंस त्या सर्वांचा त्याग कर." याप्रमाणें गुरूचें वाक्य ऐकून याज्ञवल्क्य म्हणाला, "हे गुरो ! मी जें म्हटलें तें ब्राह्मणांचा अपमान करण्या-

कारितां नसून आपल्यावरील भक्तिभावानें म्हटलें, असें असतां या माझ्या म्हणण्याचा विपर्यास आपण कारितां त्या अर्थीं मलाही आपलेकडून प्राप्त झालेलें अध्ययन नको. " असें म्हणून त्यानें ऋग्वेदाप्रमाणें वैशंपायनापासून शिकलेला यजुर्वेदही वांतिधर्मानें पण गजपानाप्रमाणें टाकला, व तेथून स्वेच्छेनें प्रयाण केलें. नंतर याज्ञवल्क्यानें टाकलेला यजुर्वेद गुरु वैशंपायनाच्या सांगण्यावरून ज्या शिष्यांनीं तित्तिर पक्षी होऊन ग्रहण केला ते तैत्तिरीयशाखीय झाले, व ज्या शिष्यांनीं ब्रह्महत्या व्रत आचरण केलें ते शिष्य चरकाध्वर्यु ह्या नांवानें प्रसिद्ध झाले. *



* ही कथा ब्रह्मांड पुराण पूर्व भाग अ. ५, विष्णु पुराण अं. ३ अ. ५, श्रीमद्भागवत स्कं. १२ अ. ६, व आत्मपुराण अ. १० मध्यें वर्णन केलेली आहे.

प्रकरण ७ वें.

# सूर्य आराधना

अशा रीतीनें ऋग्वेद व यजुर्वेद टाकल्यामुळें मूढ बनलेल्या याज्ञ वल्क्यानें चमत्कापुर क्षेत्रांतच ' विश्वामित्र ' सरोवरांत स्नान करून पवित्र होऊ श्री सूर्यनारायणाच्या १ धाता २ मित्र ३ अर्यमा ४ शक्र ५ वरुण ६ अंश ७ भग ८ विवस्वान् ९ पूषा १० सविता ११ त्वष्टा १२ विष्णु या द्वादश मूर्तिंची प्रतिष्ठा केली. नंतर त्या द्वादशादित्यांच्या अग्रभागीं श्री सूर्याला उद्देशू तपश्चर्या करण्यास तो प्रवृत्त झाला. याज्ञवल्क्य बालपणापासूनच तेजस्वी बाह्य विषयांविषयीं निरिच्छ होता. तो बाहेर जरी विकारी दिसला तथापि अंत र्गत शुद्ध होता, व त्याचें चित्त निर्मल होतें. तो लोकोपकार करण्याविषय तत्पर असून बालपणापासून तपाचरण करण्याची त्याची प्रवृत्ति होती. हिंस्र पशूंच्या समुदायांनीं गजबजलेल्या घोर अरण्यांत याज्ञवल्क्य धैर्यापासून यत्किं चितही ढळला नाहीं. वर्षाऋतूंत आवरणावांचून वृक्षपर्वताप्रमाणें निश्च बसून व पर्जन्याच्या धारा सहन करून याज्ञवल्क्यानें तपाचरण केलें. ग्रीष्म ऋतूंत मध्यान्ह वेळीं सूर्य किरणांनीं अत्यंत तप्त झालेल्या शिळेवर बसून त्या पंचाग्निसाधन केलें. शीत कालीं हिमावगुंठित स्थिर उदकामध्यें निर्विक चित्तानें बसून त्यानें तपाचरण केलें. या तपाचरणांत त्यानें स्वशरीर पर्णमू फलाहार करून शुष्क केलें. केव्हां ३ रे दिवशीं, केव्हां ६ वे दिवशीं, केव्हां १२ वे दिवशीं त्यानें भोजन करावें. निद्रा तर कधीं मुळींच घेऊं नये. अश प्रकारें पित्यानें उपदेशिलेल्या गायत्री मंत्रानें सूर्य मंडलगत परब्रह्माचें मन मध्यें तो सतत चिंतन करीत असे. या प्रमाणें कित्येक वर्षेपर्यंत तपश्चर झाल्यानंतर तपश्चर्येंत दक्ष असलेल्या याज्ञवल्क्याचे अग्रभागीं श्रावण शु चतुर्दशीयुक्त पौर्णिमेचे दिवशीं मध्यान्ह कालीं भगवान् सूर्य नारायण व प्रदान करण्याकरतां पुरुषरूपानें आविर्भूत झाले. जगताचा प्राणभूत, अतिश तेजस्वितेमुळें कष्टानें दर्शनीय व तपश्चर्येचें मूर्तिमंत फल अशा त्या आदित्या साष्टांग नमस्कार करून याज्ञवल्क्य स्तुति करूं लागला, " हे मुक्तिदायका, शुक्लकिरणा. हे कालाधिपते, हे वेदोमया, हे विष्णुरूपा, हे अमृतमया, हे हिर

ण्मया, हे अमिततेजसा, हे जगत्कारणा, हे वेदविद्याप्रकाशका, हे तत्त्वज्ञाननिधे, हे सदसत्कर्मप्रवर्तका, हे पापहारका, हे भक्तवांछितपूरका, हे देवाधिदेवा नारायणा, माझे तुला शतशः साष्टांग नमस्कार असोत. मी तुझी स्तुति काय बरें करूं शकणार? प्रसन्न व्हा व मजवर अनुग्रह करा हीच प्रार्थना आहे." याज्ञवल्क्यानें केलेली स्तुति ऐकून भगवान् आदित्याच्या नेत्रांत आनंदाश्रु आले व सर्वांगावर रोमांच उभे राहिले. नंतर आदित्यानें याज्ञवल्क्यास आलिंगन देऊन म्हटलें, "हे वत्सा तूं या गहन अरण्यांत येऊन अत्यंत दुर्धर तप केलेंस व फार क्लेश सहन केलेस. तेव्हां हे सौम्य, तुला इच्छित असा वर माग. मी तो तुला देईन" या प्रमाणें सूर्यनारायणाचें वाक्य ऐकून हात जोडून अधोवदन होऊन याज्ञवल्क्य म्हणाला, "कर्मसाक्षी महेश्वरा! आपणांस सर्व विदितच आहे. मी सांगितलें पाहिजे असें नाहीं. मजवर दोन्ही गुरुकडे दोन्ही वेदांच्या परित्यागाचा दुर्धर प्रसंग आला, व अशा रीतीनें विद्याविहीन झालेला मी आपले चरणकमलाजवळ शरण आलों आहे. तसेंच मी अशी प्रतिज्ञा केली आहे कीं, इतःपर मानुष गुरु करणार नाहीं. तेव्हां आपणच माझे गुरु व्हावें, आणि जे आज कोणा * जवळही नाहींत असे × अयातयाम चारही वेद आपण मला शिकवावेत.



---

* वेदविभाग करण्याच्या पूर्वी भावी वृत्तांत जाणून जे वेद ब्रह्मदेवानें सूर्याजवळ काढून ठेविले होते ते. ही कथा वराहपुराणांत वर्णन केलेली आहे.

× 'वांतोच्छिष्टत्वं यातयामत्वं' इति यास्कः निरुक्ते।

तद्विरुद्धमयातयामत्वं। म्हणजे वांतोच्छिष्ट नसलेले.

अयातयामानि तु भानुगुप्तान्यन्यानि जातानि तु नीरसानि ॥
यजूंषि तेषामथ याज्ञवल्क्यो ह्ययातयामानि रवेरवाप ॥

श्रीमद्देवीभागवते ॥ स्कं. ९ अ. ५

प्रकरण ८ वें

# चतुर्वेद प्राप्ति

याज्ञवल्क्यानें केलेली प्रार्थना ऐकून सूर्यनारायण म्हणाले, " मला नित्य मेरु पर्वताला प्रदक्षिणा करण्याकरितां पर्यटन करावें लागतें. अशा स्थितींत मजकडून तुझें वेदाध्ययन कसें साधतां येईल ? तथापि मी सांगतों याप्रमाणें कर. या विश्वामित्र सरोवरांत स्नान कर; व मी याच कुंडांत कांहीं वैदिक सारस्वत मंत्र तुला सांगतों ते पठण कर. म्हणजे तुला एकपाठी शक्ति प्राप्त होईल; व जें पठण करशील त्याचा तत्त्वार्थ तुझे चित्तांत आपोआप स्फुरण पावेल. तसेंच संतुष्ट होऊन तुला ही लघिमा नांवाची विद्या देत आहे. तिचा स्वीकार कर. नंतर तिच्या प्रभावानें लघु स्वरूप धारण करून माझे मुख्य अश्वाच्या कर्णांत बसून माझेपासून चारही वेदांचें अध्ययन कर. असें केलें असतां तुला माझे तेजापासून त्रास न होतां सुखानें सर्व विद्या प्राप्त होईल. नंतर याज्ञवल्क्य सूर्याच्या आज्ञेप्रमाणें लघु स्वरूप धारण करून मुख्य अश्वाच्या कर्णांत × बसला व त्यानें सांगोपांग सरहस्य चारी ❀ वेदांचें अध्ययन केलें. ज्याप्रमाणें पूर्वी अंभिणी नांवाची स्त्री सूर्यशिष्या होऊन गेली, त्याप्रमाणें याज्ञवल्क्यही सूर्याचा प्रिय शिष्य झाला. याज्ञवल्क्य अशा रीतीनें ज्ञान प्राप्त करून घेऊन संन्यास ग्रहण करण्याला उद्युक्त झाला; व गुरूस म्हणाला, " मी आतां संन्यास घेणार असून त्यास आपली आज्ञा असावी; व आपण मजजवळ गुरुदक्षिणा मागावी. " याप्रमाणें पत्नी परिग्रहण करण्यास याज्ञवल्क्य निस्पृह आहे आणि ब्रह्मचर्य कालापासूनच हा

---

× स तथेति प्रतिज्ञाय प्रविश्यादित्यवाजिनः । कर्णेऽपठत्ततो वेदांश्चतुरोऽपि च तन्मुखात् ॥ स्कं. पु. ना. खं. अ. २७८

❀ इत्युक्तो भगवान्सूर्यो याज्ञवल्क्यं महामुनिं । वेदान्षडंगसहितान् रहस्यादिसमन्वितान् ॥ चतुरोऽध्यापयामास स्थापयित्वा रथे निजे ॥

[ आत्मपुराण अ. ७ । ३८ – ४० ]

विरक्तही आहे हें पाहून सूर्यनारायण म्हणाले, " हे याज्ञवल्क्या! प्रथम तूं गृहस्थाश्रम स्वीकारून मी दिलेल्या वेदांची शाखाप्रशाखाद्वारा संप्रदायसिद्ध परंपरा प्रवृत्त कर, व नंतर संन्यास घे. त्यापैकीं ब्रह्मविद्येची परंपरा संन्यासाचे पूर्वी किंवा नंतर तुझ्या इच्छेस वाटेल त्या वेळीं प्रवृत्त कर. हीच गुरुदक्षिणा मला पाहिजे आहे. तसेंच सरस्वती वाग्रूपानें तुझ्या जिव्हाग्रीं वास्तव्य करील असा मी तुला वर देतों. " असें म्हणून सूर्यानें याज्ञवल्क्यास मुख पसरावयास सांगितलें. याज्ञवल्क्यानें मुख पसरतांच सरस्वतीनें त्याचे देहात् प्रवेश केला. याज्ञवल्क्य सरस्वतीच्या तेजानें त्रस्त होऊं लागला. पण सूर्याचे सांगण्यावरून शीतोदकानें स्नान केल्यामुळें त्याचा त्रास शांत झाला. शांत झालेल्या याज्ञवल्क्यास सूर्यनारायण म्हणाले, " आतां तुझ्या मुखांतून सरहस्य, ससंग्रह, सपरिशेष आणि सोत्तर अशा शतपथ ब्राह्मणाचा अविर्भाव होईल; आणि शास्त्रविषयक अनेक ग्रंथ निर्माण होतील. तसेंच तुझा अर्थात् तुला मी दिलेल्या विद्येचा जो कोणी अपमान करील तो तत्काळ भस्मसात् होईल, यांत मुळींच संदेह नाहीं. " याप्रमाणें सूर्यनारायणाचें भाषण ऐकून याज्ञवल्क्य म्हणाला, " हे भगवन्! आपण दिलेल्या ह्या शेवटच्या वरानें फारच अनर्थ ओढवतील. तरी त्यास कांहीं मर्यादा असावी, अशी माझी आपल्या चरणाजवळ नम्र विनंति आहे. " नंतर सूर्यानें त्याच्या प्रार्थनेवरून मर्यादा घातली कीं, " तुझ्या समक्ष तुझी निंदा जो कोणी वीस× वेळां करील त्याला तुझ्या जिव्हाग्रीं स्थित होऊन मी शाप देईन व भस्मसात् करीन." नंतर याज्ञवल्क्य गुरूची आज्ञा शिरसामान्य करून भूतलावर आला व आपल्या घरीं पित्याजवळ येऊन त्यानें घडलेला सर्व वृत्तांत त्यास निवेदन करून संतुष्ट केलें. देवरातास याज्ञवल्क्याचे ठिकाणीं सुविद्यता, तेजस्विता, तपस्विता, प्रयत्नगौरव इत्यादि गुणांचा परिपोष पाहून परमावधीचा आनंद झाला, व त्यानें त्याचा प्रासकालिक समावर्तन संस्कारही केला.



× ही कथा महाभारत शांतिपर्व अ. ३२३ व आत्मपुराण अ. ७ यामध्यें विशेष विस्तारानें दिली आहे.

# प्रकरण ९ वें

## गृहस्थाश्रम

याप्रमाणें पूर्व प्रकरणांत याज्ञवल्क्याच्या विद्यार्थिदशेस कसा आरंभ झाला, स्वकर्तव्य करीत असतां ' श्रेयांसि बहुविघ्नानि ' या न्यायानें अनेक विघ्नें कशीं उत्पन्न झालीं, त्यांना धैर्यानें त्यानें कसें तोंड दिलें, इष्ट साध्य करण्याकारितां त्यास किती उग्र तपश्चर्या करावी लागली व त्याचा अखेर परिणाम ' क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते ' या कव्युक्तिप्रमाणें गोड होऊन पुढील आयुष्यांतील कर्तव्याला तो उद्बोधक कसा झाला, इत्यादिसंबंधीचें विवरण आपल्यापुढें ठेविलें आहेच. आतां आपण त्याच्या गृहस्थाश्रमाकडे वळूं.

नंतर याज्ञवल्क्यानें विवाह करून गृहस्थाश्रम स्वीकारला. याज्ञवल्क्यास दोन भार्या होत्या. एक मित्रयूची कन्या मैत्रेयी व दुसरी कत गोत्रांत उत्पन्न झालेली कात्यायिनी, असें बृ. आ. अ. ४ ब्रा. ५ मंत्र १ यावरून दिसून येतें. तसेंच त्यांच्यापैकीं मैत्रेयी ही ज्येष्ठ भार्या असून कात्यायिनी ही कनिष्ठ होती हेंही याच मंत्रावरील ' हे मैत्रेयीति ज्येष्ठां भार्यामामंत्रयामास ' या श्री शंकराचार्यांच्या भाष्यावरून स्पष्ट होत आहे. याज्ञवल्क्यानें ब्रह्मचर्यानें जसें ऋषींचें ऋण फेडलें, तसेंच देवांचें ऋण फेडण्याकारितां त्यानें अग्न्याधानपूर्वक अग्निहोत्र ग्रहण करून बहुदक्षिणाक अग्निष्टोमादिक यज्ञयाग केले. तसेंच पितृऋणांतून मुक्त होण्याकारितां गुणानें, विद्येनें व कर्तृत्वशक्तीनें आत्मतुल्य पुत्र व कन्याही उत्पन्न केल्या. जरी विरक्त × मनुष्याला ऋण नसतें, तरी पण आश्रमांच्या अनुरोधानें याज्ञवल्क्याला हें ऋण देणें भाग पडलें. नंतर त्या सूर्यशिष्य याज्ञवल्क्यानें विचार केला कीं, ज्याप्रमाणें मी देवर्षिपितृऋण देऊन मुक्त झालों, त्याप्रमाणें आतां मला गुरूच्या ऋणांतून मुक्त होणें जरूर आहे. अशा विचारानें त्यानें आपल्या गुरूपासून मिळविलेले

---

× किं प्रजया करिष्यामो येषां नोऽयमात्मा नायं लोकः । इति श्रुतेः

चारी ❀ वेद क्रमानें, शांखायन ऊर्फ कौषीतकी या नांवाच्या शिष्यास ऋग्वेद, कण्व माध्यंदिनादि १५ शिष्यांस १५ विभाग करून यजुर्वेद, सामश्रवा, कौथुमि प्रभृतींस सामवेद व शौनक वगैरे शिष्यांस अथर्ववेद शिकविले. त्या सर्वांनींही पुढें आपापल्या निरनिराळ्या शिष्यांना पोट विभाग करून गुरुपरंपराप्राप्त वेद शिकविले. अशा रीतीनें याज्ञवल्क्यानें आदित्यप्राप्त चतुर्वेदांची परंपरा शिष्यप्रशिष्यद्वारा निरनिराळ्या शाखा निर्माण करून सुरू केली. या परंपरेला आदित्य संप्रदाय असें म्हणतात.



---

❀ प्राप्य वेदान्मुनिः सर्वान्गृहस्थाश्रमधर्मवान् । चतुर्वेदार्थिनः शिष्यानुपनिन्ये महामनाः ॥ चतुर्धा दृश्यते तस्य मुनेः शिष्यौघमंडली । अध्यापनरतस्यैषा याज्ञवल्क्यस्य धीमतः ॥ चतुर्मंडलमध्यस्थो राजते मुनिभास्करः । दिशां मंडलमध्यस्थो यथाऽयं भगवान्रविः ॥ आत्मपुराण अ. ७ तथा—अथ ह याज्ञवल्क्यः स्वमेव ब्रह्मचारिणमुवाचैताः सोम्योदज गाः सामः-श्रवा३ इति ता होदाचकार ॥ अत्र श्रीमच्छंकराचार्यभाष्यं— अथ ह याज्ञवल्क्यः स्वमात्मीयमेव ब्रह्मचारिणमंतेवासिनमुवाचैता गा हे सोम्योदजोद्गमयास्मद्गृहान्प्रति हे सामश्रवः सामविधिं हि शृणोत्यतोऽर्थाच्चतुर्वेदो याज्ञवल्क्यः ॥ बृह. उप. भाष्ये अ. ३ ब्रा. १ कं. २

प्रकरण १० वें

# वेदसंप्रदाय

आतां येथें प्रसंगानें या निरनिराळ्या संप्रदायांचा आपण थोडा विचार करूं. वेदांत एक ब्रह्मसंप्रदाय व दुसरा आदित्यसंप्रदाय असे दोन संप्रदाय [परंपरा] आहेत. कल्पारंभीं विष्णूनें हयग्रीव दैत्याचा वध करून त्यानें हरण केलेले वेद ब्रह्मदेवास परत आणून दिले. ब्रह्मदेवानें त्याचे दोन विभाग करून एक भाग सूर्याजवळ ठेऊन दुसरा भाग आपल्या वसिष्ठप्रभृति पुत्रांस शिकविला. त्यांनींही आपापल्या पुत्रपौत्रप्रपौत्रांना शिकविला. नंतर कलीचे प्रारंभीं वेदव्यासानें पुढें लोक मंदमति व अल्पसामर्थ्य होतील असें पाहून त्याचे पुन्हां चार विभाग करून क्रमानें 'पैलास' ऋग्वेद, 'वैशंपायनास' यजुर्वेद, 'जैमिनीस' सामवेद व 'सुमंतुस' अथर्ववेद, असे चारही वेद शिकविले. त्यांनींही पुढें शिष्यप्रशिष्यद्वारा निरनिराळ्या शाखा निर्माण करून जो संप्रदाय ( परंपरा ) सुरू केला तो ब्रह्मसंप्रदाय होय.

शतपथ ब्राह्मणाच्या आग्निरहस्य नांवाच्या १० व्या कांडाचे शेवटीं ब्रह्मसंप्रदायबोधक ऋषिवंश आला असून बृहदारण्यकांतील मधुकांडाच्या शेवटीं पुन्हां दोन ब्रह्मसंप्रदायबोधक ऋषिवंश आले आहेत. तसेंच खिल कांडाचे शेवटीं आदित्यसंप्रदायबोधक ऋषिवंश दोन प्रकारानीं आला आहे. एक अंभिण्यादि स्त्रीवंश व दुसरा याज्ञवल्क्यादि पुं-वंश हे होत. या वंशांचें विवेचन करतांना आत्मपुराण अ. ४ श्लो. ६८ – ७० मध्यें म्हटलें आहे कीं, ज्याप्रमाणें एका पर्वताच्या दोन शिखरांतून दोन नद्या निघून सागरापर्यंत जाऊन एकत्र होतात तसें एका परब्रह्माच्याच ब्रह्मा व आदित्य या दोन अधिष्ठानापासून हे दोन वेदसंप्रदाय निघून बऱ्याच शिष्यप्रशिष्यांनंतर संजीवितनयाचे ठिकाणीं तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें एकत्वास पावले. कांहीं आचार्य स्त्रीपुरुष वंशाचा भेद मानितात व कांहीं मानीत नाहींत. परंतु श्रीशंकराचार्य ×

---

× तदिदं शांकरभाष्यं— अथेदानीं समस्तप्रवचनवंशः स्त्रीप्राधान्याद् गुणवान्पुत्रो भवतीति प्रस्तुतं । अतः स्त्रीविशेषणेनैव पुत्रविशेषणादाचार्यपरंपरा कीर्त्यते इति । बृह. उप. भाष्य.

हा भेद मानतात व त्यांतही स्त्रीवंशाला प्राधान्य देतात. आदित्य व ब्रह्म या दोन्ही संप्रदायांत आदित्य संप्रदायच प्रधान आहे, असें जाबाल संहितेंतील अ. १ मध्यें म्हटलें आहे. × हे दोन्ही संप्रदाय मिळून ऋग्वेदाच्या एकंदर शाखा २१ आहेत. पैकीं आश्वलायन प्रभृति २० ब्रह्मपरंपरेंतील असून एकविसावी शाखा शांखायनी, बाष्कळ किंवा कौषितकी म्हणून जी ओळखली जाते, ती आदित्यपरंपरेंतील होय.

यजुर्वेदांत एकंदर १०१ शाखा आहेत. पैकीं ८६ शाखा ब्रह्मपरंपरेंतील असून त्यांना कृष्णयजुर्वेद अशी संज्ञा आहे. बाकी राहिलेल्या कण्व माध्यंदिनादि १५ शाखा आदित्यपरंपरेंतील असून त्यांस शुक्लयजुर्वेद अशी संज्ञा आहे. या संज्ञांविषयीं निरनिराळ्या पंडितांचीं अनेक मतें आहेत, तीं येथें नमूद करणें जरूर आहे.

पं. यज्ञेश्वर भट्टांनीं आपल्या आर्यविद्यासुधारक नांवाच्या ग्रंथांत म्हटलें आहे कीं, दर्शपौर्णमासादि सर्व यज्ञांत उपयोगी पडणारे सर्व यजुर्मंत्र व त्याचे विनियोग करणारे ब्राह्मणभाग यांचा पृथक्तया निर्देश केला असल्यानें आदित्यपरंपरेंतील यजुर्वेद शुक्लयजुर्वेद होय, आणि ज्यामध्यें पूर्वी सांगितलेले मंत्र व ब्राह्मण यांचा अनुक्रमानें पाठ नसल्यामुळें मिश्रण असून यज्ञमार्ग सुबोध समजून येत नाहीं, असा हा ब्रह्मपरंपरेंतील यजुर्वेद कृष्णयजुर्वेद होय. व्यासकृत चरणव्यूह भाष्यकारानें म्हटलें आहे कीं, श्रावण शुक्लपक्षांत चतुर्दशीयुक्त पौर्णिमेला मध्यान्हीं याज्ञवल्क्यास वेद मिळाले म्हणून तो यजुर्वेद शुक्लयजुर्वेद होय. म्हणून उपाकर्माला शुक्लयजुर्वेदीय चतुर्दशीविद्ध श्रावण शुद्ध पौर्णिमा घेतात. तसेंच वद्य प्रतिपदायुक्त पौर्णिमेचे दिवशीं तैत्तरीयांनीं त्यक्त वेद ग्रहण केले म्हणून तो यजुर्वेद कृष्णयजुर्वेद होय. म्हणून कृष्णयजुर्वेदीय प्रतिपद्विद्ध पौर्णिमा उपाकर्मास घेतात.

---

× ब्रह्मणः संप्रदायोऽयं व्याससंदर्शितोऽभवत् । विभक्तस्यैव वेदस्य संप्रदायो द्विधा मतः ॥ ब्रह्मणः संप्रदायस्तु आदित्यस्य तथा मतः । अयातयामसंज्ञोऽयं कृत्स्नकर्मप्रकाशकः ॥ यावद्ब्रह्मप्रकाशस्य रविरूपश्च यो मतः । ब्रह्मणः संप्रदायस्तु मिश्रत्वान्न तथा मतः ॥ जाबाल सं. अ. १

आत्मपुराणांत म्हटलें आहे की, याज्ञवल्क्यानें टाकलेले वांतोच्छिष्ट + यजुर्मंत्र कृष्णसंज्ञक + होत, व त्यानें जे आदित्यापासून $ नवीन यजुर्मंत्र मिळविले ते शुक्लसंज्ञक $ होत.

तसेंच सायणाचार्यांनींही आपल्या काण्वसंहितेच्या उपक्रमभाष्यांत म्हटलें आहे कीं, तित्तिर पक्षी होऊन मिळविलेल्या वेदांत क्वचित् आध्वर्यव, क्वचित् हौत्र, क्वचित् पुन्हां आध्वर्यव, क्वचित् औद्गात्र, क्वचित् पुन्हां हौत्र अशा अव्यवस्थेनें बुद्धिमालिन्याला कारण म्हणून तो कृष्णयजुर्वेद; याच्या उलट ज्याचीं प्रकरणें व्यवस्थित आहेत, असा बुद्धिनिर्मलतेला कारण जो सूर्यलब्ध यजुर्वेद तो शुक्लयजुर्वेद ¶ होय.

सारांश यजुर्वेदांत शुक्ल व कृष्ण असे दोन भेद आहेत. या शुक्ल-यजुर्वेदांतही पुन्हां दोन परंपरा आहेत. एक कण्व परंपरा व दुसरी माध्यंदिन परंपरा. यांनाच वैदिक परिभाषेंत कण्वसमाम्नाय व माध्यंदिन समाम्नाय असें म्हणतात. हे दोन समाम्नाय पडण्याचें कारण असें आहे कीं, याज्ञवल्क्यानें नवीन वेद मिळविले त्यावेळीं कृष्णयजुर्वेदांतील बौधायनी शाखेचा प्रवर्तक ऋषि बौधायन, याचा पुत्र महामुनि कण्व † यानें याज्ञवल्क्याजवळ त्या नवीन वेदाचें अध्ययन केलें. परंतु पितृकुलाच्या अभिमानानें अध्ययन

---

\+ वांत्या च भक्षणेनापि कृष्णान्यासन्यजूंष्यपि ।

आत्मपुराण अ. १० । २६

$ आदित्यानीमानि शुक्लानि यजूंषि वाजसनेयेन याज्ञवल्क्येन आख्यायंते ॥ ( शत. ब्रा. कांड १४ अ. ८ ) तथा— शुक्लं कृष्णं यजुर्द्वेधा कृष्णं तैत्तिरीयकं । शुक्लं वाजसनेयानामिति कात्यायनोऽब्रवीत् ॥ इति आत्मपु.

¶ प्रवर्तितः खंडशस्तैर्न सम्यग्बुध्यते नृभिः । आध्वर्यवं क्वचिद्धौत्रं क्वचिदित्यव्यवस्थया॥ बुद्धिमालिन्यहेतुत्वात्तद्यजुः कृष्णमीरितं । याज्ञवल्क्यस्ततः सूर्यमाराध्यास्मादधीतवान् ॥ व्यवस्थितप्रकरणं यजुः शुक्लं तदीर्यते । पौराणिकीं कथामेतां वेदव्याख्यान आदरात् ॥ इति कण्वसं. भाष्योपक्रमे सायणाचार्याः ॥

† बौधायनपितृत्वाच्च प्रशिष्यत्वाद्विवस्पतेः । शिष्यत्वाद्याज्ञवल्क्यस्य कण्वोऽभून्महतां महान् ॥ इत्यादित्यपुराणे वर्णितं ॥

धर्म मात्र याज्ञवल्क्याचा न घेतां आपलाच ठेविला. कण्व हा बौधायनाचा पुत्र, सूर्याचा प्रशिष्य अर्थात् याज्ञवल्क्याचा शिष्य व स्वतः महातपस्वी असल्यामुळें थोर योग्यतेला प्राप्त झाला. त्यामुळें त्याची ही परंपरा शुक्ल-यजुर्वेदांत बऱ्याच अंशानें रूढ झाली. या दोन्ही परंपरेंतील विशेष फरक पुढें शाखापरिचयाचे वेळीं होईलच.

शुक्ल यजुर्वेदांतील १५ शाखांपैकीं ज्या शाखांचे प्रवर्तक ऋषि अंगिराकुलोत्पन्न आहेत त्या शाखा कण्वानुयायी झाल्या व ज्या शाखांचे प्रवर्तक ऋषि कौशिक पक्षाचे अर्थात् विश्वामित्रगणोत्पन्न आहेत, त्या शाखा माध्यंदिनानुयायी झाल्या हें ' सोऽहं कौशिकपक्षः शिष्यः कात्यायनः ' या प्रतिज्ञा परिशिष्टाच्या उल्लेखावरून व ' एतदादित्यानामयनं, एतदांगिरसानामयनं, तद्‌ तथा न कुर्यात् ॥ ' इत्यादि शतपथ ब्राह्मणांतील ठिकठिकाणीं आलेल्या उल्लेखा वरून स्पष्ट दिसून येईल.

तसेंच सामवेदांत १००० शाखा असून त्याच्यांत दोन संप्रदाय ( समाम्नाय ) आहेत. एक राणायनीय व दुसरा कौथुमीय. राणायनीय समाम्नाय ब्रह्मपरंपरेंतील असून कौथुमीय समाम्नाय आदित्य परंपरेंतील आहे. आज ह्या संप्रदायांतील बऱ्याच शाखा पुरातन कालापासून लुप्त आहेत, असें चरणव्यूहाच्या तिसऱ्या खंडावरून दिसतें.

तसेंच आथर्वण वेदांतही ९ शाखा असून त्यांच्यांतही दोन समाम्नाय आहेत. एक पिप्पलादीय व दुसरा शौनकीय. पैकीं पिप्पलादीय समाम्नाय ब्रह्मपरंपरेंतील असून शौनकीय समाम्नाय आदित्यपरंपरेंत प्रसिद्ध आहे. या चारी वेदांतील दोन्ही संप्रदायांच्या सर्व शाखांचीं नांवें त्या त्या वेदाच्या शाखापटावरून स्पष्ट ज्ञात होतील. त्याचा येथें पुनरुल्लेख करून द्विरुक्ति करूं इच्छित नाहीं.



## प्रकरण ११ वें

# शाखाप्रणयन

याप्रमाणें 'एकविंशतिधा बाह्वृच्यम्। एकशतमध्वर्युशाखाः। सहस्रवर्त्मा सामवेदः। नवधा आथर्वणिकाः। या पातञ्जल महाभाष्याला अनुसरून सर्व शाखाविवरण आम्हीं केलें.

मुक्तिकोपनिषदांत ऋग्वेदादिविभागेन वेदाश्चत्वार ईरिताः॥ तेषां शाखा ह्यनेकाः स्युस्तासूपनिषदस्तथा॥ ऋग्वेदस्य तु शाखाः स्युरेकविंशतिसंख्यकाः॥ नवाधिकशतं * शाखा यजुषो मारुतात्मज। सहस्रसंख्यया जाताः शाखाः साम्नः परन्तप॥ आथर्वणस्य शाखाः स्युः पञ्चाशद्भेदतो हरे। एकैकस्यास्तु शाखाया एकैकोपनिषन्मता॥ तासामेकामृचं येन पठ्यते भक्तितो मयि॥ ह्याप्रमाणें यजुर्वेदांत ८ शाखा व आथर्वण वेदांत ४१ शाखा मिळून ४९ शाखा पातञ्जल महाभाष्यापेक्षां अधिक सांगितलेल्या आहेत. इतरत्र कोठें असा उल्लेख आलेला नाहीं. मुक्तिकोपनिषदांतील अधिक शाखांची संख्या काय अभिप्रायानें असावी याचें निश्चित अनुमान करण्याकरितां पुरेशी सामग्री नसल्यानें कांहींहि तर्क करितां येत नाहीं. तथापि ही अधिक संख्या संहिताकृत शाखाभेदमूलक नसून गृह्यसूत्रकृत शाखाभेद दर्शविणारी असावी, असें निरनिराळ्या ग्रंथांतून अनुपलब्ध सूत्रांच्या येणाऱ्या उल्लेखावरून वाटतें. जसें शुक्लयजुर्वेदांत १ श्रौतसूत्र असून एक पारस्करगृह्यसूत्र आहे

---

* हें मुक्तिकोपनिषदांतील विधान शतपथब्राह्मणाच्या विरुद्ध आहे, हें पुढील शतपथाच्या कंडिकेवरून दिसून येईल.

' स उ एव यजुस्तेजाः। यजुरेकशतविधो यानि पंचाशत्प्रथमानि यजूꣳषि। यानि चोत्तमानि। ताः शतं विधाः। अथ यान्येतदंतरेण यजूꣳषि क्रियंते सैवैकशततमी विधा। एवमु सप्तविध एकशतविधो भवति।'

शत. ब्रा. कां १० अ. २ ब्रा. ६ कं. १२

## याज्ञवल्क्यकृत कण्वमाध्यंदिनादि शाखाप्रणयन



व शिवाय एक वैजवापगृह्यसूत्र निराळेंच आहे. अर्वाचीन अनेक गृह्यसूत्रें एके काळीं बरींच असावींत व तन्मूलकच मुक्तिकोपनिषदांतील अधिक असलेली संख्या असावी असें वाटतें. या गोष्टीचा वैदिक इतिहासज्ञांनीं याहीपेक्षां अधिक बारकाईनें विचार करून सुस्थिर सिद्धांत ठरवावा.

याप्रमाणें याज्ञवल्क्यानें शिष्यप्रशिष्यद्वारा शाखा निर्माण करून त्या त्या संहितांचें प्रवचन करणारे असे ब्राह्मणग्रंथ स्वतः निर्माण केले व करविले. शाखा म्हणजे संहिता व ब्राह्मण, ब्राह्मण म्हणजे संहितेचें प्रवचन होय. कारण ब्राह्मण शब्दाची व्युत्पत्ति अशी आहे कीं, " ब्रह्मणः वेदस्य इदं नाम प्रवचनं ब्राह्मणं वेदव्याख्यानमित्यर्थः ।"

या ब्राह्मणग्रंथांपैकीं शुक्लयजुर्वेदांतील १५ शाखांचे १५ शतपथ ब्राह्मण याज्ञवल्क्यानें केले आहेत, व ऋग्वेदादि शाखांचे ब्राह्मण त्या त्या शाखाप्रवर्तक शिष्यांकडून करविलेले आहेत, हें त्या त्या ब्राह्मण ग्रंथाच्या नांवावरून स्पष्ट दिसतें. जसें आदित्यपरंपरेंतील शांखायन ब्राह्मण, कौषितकी ब्राह्मण, कौथुमीय ब्राह्मण, जाबाल ब्राह्मण इत्यादि. शतपथ ब्राह्मणांस याज्ञवल्क्य ब्राह्मण अशी संज्ञा आहे. ' नैरुक्त्यं यस्य मंत्रस्य विनियोगः प्रयोजनं ॥ प्रतिष्ठानं विधिश्चैव ब्राह्मणं तदिहोच्यते. । इत्येवं याज्ञवल्क्यस्य ब्राह्मणस्य तु लक्षणम् ' इति वाचस्पतिमिश्राः॥ अर्थात् जर ब्राह्मण हें संहितेचें प्रवचन आहे आणि जर संहिता शाखाभेदाला कारण आहेत तर शुक्लयजुर्वेदाच्या १५ शाखा असून त्या संहितेचे १५ ब्राह्मणही आहेत, हें सहजच सिद्ध आहे. त्याप्रमाणें त्या त्या संहितांचे व ब्राह्मणांचे ठिकठिकाणीं उल्लेखही आलेले आहेत.

" वातो वा मनो वा गंधर्वाः ॥ "

" वायुर्वा $ त्वा मनुर्वा त्वा गंधर्वाः ॥ "

---

$ निरुक्त अ. १ खं. ५ सू. १ येथें हा मंत्र दुर्गाचार्यानें उल्लिखित केला असून तो शु. यजु. अ. ९ मं. ७ असल्याचें म्हटलें आहे. हा मंत्र कण्व व माध्यंदिन संहितेंत असा नसून ' वातो वा मनो वा ' असा पहिल्या पाठाप्रमाणें आहे. अर्थात् हा मंत्र शु. यजुर्वेदांतीलच कण्व व माध्यंदिन शाखेखेरीज तिसऱ्या एका शाखेंतील असला पाहिजे.

ओषधे त्रायस्व स्वधिते मैनꣳ हिꣳसीः ।

$ ओषधे त्रायस्व स्वधिते मैनꣳ हिꣳसी ॥ इत्यादीनि । आप्यायतान्ध्रुवा हविषां,घृतेन यज्ञं यज्ञं प्रतिदेवयद्भ्यः । प्रतिदेवयद्भ्यः‡ हीं झालीं अस्पष्ट उदाहरणें.

स्पष्ट उदाहरणें पुढील प्रमाणें आहेत. " नाशे च । " प्रातिशाख्य भाष्य अनंतदेव अ. ३ सू. ४३ " दुःनाशं । " दुणाशं संख्यं तव । इति शावीयादि शाखोदाहरणं । हें शापेय शाखेचें उदाहरण होय. गोपीनाथ भट्टी या नांवाच्या ग्रंथांत ' तापायनीय श्रुतिरपि । सप्त द्वीपवति भूमिर्दक्षिणार्थे ¶ न कल्पते । इति । असा तापायनीय श्रुतीचा उल्लेख आहे. तंत्रवार्तिकांत ' अरुणपाराशरशाखाब्राह्मणस्य कल्परुपत्वात् । ' इति व्याकरण महाभाष्ये ४ । २ । ६० ' पाराशरकाल्पिकः ' याप्रमाणें व्याकरण भाष्यांचें वाक्य उद्धृत करून पाराशर शाखेचा उल्लेख केला आहे. त्याचप्रमाणें कातीय हौत्रसूत्रांत ' नववतीश्चिकीर्षेदिति जाबालः ' असा जाबाल संहितेचा उल्लेख करून नववतीसंज्ञक 'न मंतुस्तोममग्नयेत्यादि ' जाबाल संहितेंतील मंत्र दिले आहेत. तसेंच विश्वरूपाचार्यकृत याज्ञवल्क्यस्मृतिव्याख्येंत अ. ३ । २३७ स यदा राजानमुन्नेतोन्नयति । अथैनस्विन उपतिष्ठंते । अत उपब्रुवते इत्थं ब्राह्मणमवाधिष्ठामित्थं गुरोर्जायामभ्यगामिति । निरुक्तमेनो यथा तान् ऋत्विजो राजा च ब्रूयुरश्वमेधावभृथपूता भवथेति । तेऽपोभ्यवयंति यथाहिस्त्वचो निर्मुच्यते एवं सर्वस्मात्पाप्मनो निर्मुच्यंते तान्नजुगुप्सेयुः। स यावंतमश्वमेधेनेष्ट्वा लोकं जयति । त्रिस्तावंतं जयति । यस्यैवं विदुषः

$ हा मंत्र शु. यजु. सं. अ. ४ मं. १ म्हणून दिला आहे. परंतु कण्व व माध्यंदिन संहितेंत असा पाठ नसून पहिल्या पाठाप्रमाणें आहे. अर्थातच हा मंत्र पूर्ववत् तिसऱ्या एका शाखेंतील असला पाहिजे.

‡ हा मंत्र कण्वसंहितेंतल आहे. परंतु पहिल्या पाठाप्रमाणें आहे. अर्थात् दुसऱ्या पाठाचा मंत्र पूर्ववत् तिसऱ्या एका शाखेंतील असला पाहिजे.

¶ एतत् श्रुतिमूलकच ' सा भूमिः सर्वान्प्रत्याविशेषात् ' हें सूत्र जैमिनीनें केलें असावें.

एवमेनास्विनोऽवभृथमभ्यवयंति ॥ असा जाबाल ब्राह्मणाचा अर्थात् जाबालशाखीय शतपथाचा उल्लेख आलेला आहे.

तसेंच भर्तृयज्ञ भाष्यानुसारी स्थपति गर्गाच्या गृह्यपद्धतींत आवसथ्याधान प्रकरणांत 'ततोग्न्यागारकरणं समचतुरस्रं पंचारत्नि दाक्षिणपूर्वे द्वारे द्वारत्निके ' इति जाबालश्रुतेर्मानाद्युपलब्धं। असा जाबालश्रुतीचा उल्लेख आलेला आहे. व्याकरण भाष्य १ - १ - ४४ मध्यें ' गालवा एव ऱ्हस्वान् प्रयुञ्जीरन्निति । ' असें गालव ब्राह्मणाचें अर्थात् गालवशाखीय शतपथाचें वाक्य उद्धृत केलें आहे.

तसेंच अन्यत्रहि उल्लेख आला आहे. गालवछर्दि ब्राह्मणं—

" अथ तैत्तिरीयकं स वेदः । परमानंदो याज्ञवल्क्यो वमनः सूर्यनारायणाय याज्ञवल्क्यहृद्यन्तरं कृष्णयाजुषं तैत्तिरमौखेयी तित्तिरीयरूपेण सानंदप्रसादेन स भवंति य एवं वेद ॥ ' तसेंच प्रातिशाख्य दीपिकेंत ' औञ्झिझान ' अर्थात् औधेय शाखेचा पुढीलप्रमाणें उल्लेख आला आहे. ' औञ्झिझायनकैर्माध्यंदिनमतानुसारिभिः । अवग्रहो यदा नीच उच्चगो मध्यतः क्वचित् । ताथाभाव्यो भवेत्कंपस्तनूनप्त्रेति दर्शनं । पदपाठे तु भवति कंप इति ।

तसेंच ' सावित्रानिवृत्तिः श्रुतिविरोधाभ्याम् ' या सोमप्रकरणांतील आतिथ्येष्टिविषयक सूत्रावरील आपापल्या भाष्यांत पितृभूति, कर्क, अनंतदेव, यांनी बैजवाप शाखीय सूत्राचा निर्देश केला आहे. ' एवं च बैजवापायनाचार्येण सूत्रितं न सावित्रमाहेतीति पितृभूतिभाष्यात् । उदवसानीयायामाग्नेयः पंचकपालः समारूढनिर्मथिते ' इति कातीयसौमिकसूत्रे पितृभूतिकर्कौ ॥

याप्रमाणें याज्ञवल्क्यानें चारी वेदांत अनेक शाखा निर्माण केल्याबद्दल प्रमाण परंपरा स्पष्ट दिसून येत आहे.



## प्रकरण १२ वें

# शतपथप्रणयन

सनातनधर्मप्रदीपांत ❀ कात्यायन शाखीय शतपथ ब्राह्मणाचा उल्लेख आलेला आहे. लाहोर येथें आंध्र लिपींत लिहिलेलीं कात्यायन ब्राह्मणाचीं चार कांडें उपलब्ध आहेत. जाबाल व गालव वगैरे शाखांच्या ब्राह्मणांचे उल्लेख मागील प्रकरणांत दिले आहेतच. कण्व माध्यंदिनांचे शतपथ ब्राह्मण आज प्रत्यक्ष उपलब्ध आहेत. यावरून १५ शाखाचे संहिता व ब्राह्मण निरनिराळे आहेत असें सिद्ध होतें. म्हणूनच कात्यायन श्रौतसूत्राची व्याख्या करितांना ठिकठिकाणीं पितृभूति, कर्क वगैरेंनीं शाखांतरीय श्रुति म्हणून याच १५ शाखांतील श्रुति उद्धृत केल्या आहेत. या सर्व १५ शाखांना वाजसनेयी, शुक्लयजुर्वेदी अशी सामुदायिक संज्ञा आहे. तसेंच त्या सर्वांच्या संहितांना वाजसनेयी श्रुति, शुक्लयजुर्वेद इत्यादि सामुदायिक संज्ञा असून त्यांच्या ब्राह्मण ग्रंथांस शतपथ ब्राह्मण हें सामुदायिक नांव आहे. त्या शिवाय त्या त्या शाखेच्या प्रवर्तक ऋषींचे नांवानेंही ते ओळखले जातात.

ही गोष्ट सायणाचार्यानें आपल्या कण्व संहितेच्या उपोद्घातांत स्पष्ट नमूद केली आहे.

" यद्यप्ययं वेदः स्वयंभूपरमेष्ठ्यादिपरंपरया प्राप्त आदित्याशिष्येण याज्ञवल्क्येन बहुभ्यः शिष्येभ्य उपदिष्टः तथापि महता तपसाऽनुष्ठितस्येश्वरस्यानुग्रहात् कण्वसंबंधितयैव लोके प्रख्यायते ॥ तमेतं काण्ववेदमधीयन्ते विदन्ति वेति व्युत्पत्त्या कण्वशिष्यप्रशिष्यादिपरंपरया वर्तमानाः सर्वेऽपि काण्वा इत्युच्यंते । एवं ज्ञात्वा

---

❀ तो उल्लेख असा ' समुद्रो वा एष यदहोरात्रस्तस्यैतेऽगाधतीर्थे यत्संधी तस्मात्संधौ होतव्यमिति कात्यायनब्राह्मणं भवति नक्षत्रं दृष्ट्वा प्रदोषे निशायां वा सायम् । ' आब्धिनौयानमीमांसापृष्ठ ७० व सनातनधर्मप्रदीप शुद्धि प्रकाश.

जाबालादिषु द्रष्टव्यं ।

हा शतपथ ब्राह्मण याज्ञवल्क्यानें श्री सूर्यनारायणाच्या सांगण्यावरून तयार केल्याचें वर्णन महाभारत शांतिपर्व मोक्षधर्म अ. ४३ मध्यें आलें आहे. याज्ञवल्क्यानें जो शतपथ तयार केला तो सरहस्य, ससंग्रह, सपरिशेष व सोत्तर असा तयार केला. शतपथ ब्राह्मणापैकीं ९ कांडांना षष्टिपथ असेंही नांव आहे. १० वें कांड रहस्य नांवानें, ११ वें कांड संग्रह नांवानें, १२ वें व १३ वें कांड परिशेष किंवा खिल नांवानें आणि १४ वें कांड उत्तर व उपनिषद् या नांवांनीं प्रसिद्ध आहे. १४ कांड मिळून शतपथ ब्राह्मण होय. अशा रीतीनें याज्ञवल्क्यानें शतपथाचें प्रणयन केल्यानंतर याज्ञवल्क्य सूर्याजवळून निघून परत पुन्हां शाकल्यऋषि जवळ येऊन म्हणाला, " हे महाभाग ! तूं पूर्वीं एके कालीं माझा गुरु होतास. त्यासाठीं मी तुला गुरुदक्षिणा देणार आहे. कारण × ज्येष्ठ भ्राता, पिता, माता, गुरु हे आपल्या विरुद्ध वागत असले, तरी ते पूजनीय होत, अशी शास्त्राज्ञा आहे. मी सूर्याजवळून सांगोपांग चारही वेदांचें अध्ययन केलें आहे. तसाच त्यांचा अर्थही जाणला आहे. तेव्हां हे गुरो ! मी तुम्हांला कोणती दक्षिणा देऊं तें सांगा." नंतर शाकल्य म्हणाला, " सूर्यानें जे वेदरहस्य तुला सांगितलें व आहे ज्यांच्या व्याख्यानानें व पठनानें सर्व पापांचा नाश होतो, तें वेदरहस्य मला सांग. हीच गुरुदक्षिणा मला पाहिजे आहे." नंतर याज्ञवल्क्यानें ज्या ठिकाणीं द्वादशादित्यांची स्थापना केली होती, त्या ठिकाणीं सर्व शिष्यांसह शाकल्याला नेऊन चारी वेदांतील उपनिषत्प्रोक्त तत्त्वज्ञान सांगितलें. तसेंच चारी वेदांतील ' रथं युञ्जन्ति ' ' त्रिष्टुभेति ' ' चित्रं देवाना ' ' हंसः ' ' पावमान ' हीं ऋग्वेदांतील सूक्तें, सामवेदांतील आदित्यश्रेष्ठ प्रभृति एकवीस साम, तसेंच अथर्ववेदांतील क्षुरिकासंपुट, सूर्यकल्प, शांतिकल्प, असे मुख्य मुख्य भाग सांगितले. अशा रीतीनें याज्ञवल्क्य शाकल्य

---

× ज्येष्ठो भ्राता पिता चैव माता चैव गुरुस्तथा । वैरुध्ये नापि वर्तेते यद्येते द्विजसत्तम ॥ तथापि पूजनीयाश्च पुरुषेण न संशयः ॥
स्कं. पु. ना. खं. अ. २७८

प्रभृतींचा गुरु झाला. तसेंच याज्ञवल्क्य हा वेदव्यासाचा गुरु असल्याबद्दलचा उल्लेखही आदित्यपुराण उत्तर खंड अ. १२ मध्यें आहे. पूर्वी व्यासानें ज्या वेळीं चारी वेदांचा विभाग केला त्या वेळीं याज्ञवल्क्यानें मिळविलेले वेद सूर्याजवळ असल्यानें ते व्यासाजवळ नव्हते; परंतु ते आपणास प्राप्त व्हावे म्हणून व्यास ते याज्ञवल्क्याजवळ शिकले. यासाठीं व्यास हे याज्ञवल्क्याचे शिष्य झाल्यानें याज्ञवल्क्य हा व्यासाचा गुरु झाला. या कथेचें निदर्शक कृष्ण-द्वैपायनाचार्य असें नांव याज्ञवल्क्यास असल्याचें याज्ञवल्क्याच्या अष्टोत्तरशतना-मावलीवरून दिसून येतें. यास आणखी सबळ पुरावा म्हणजे आदित्यपुराण व वायुपुराण यांत ❀ देवता व ❀ ऋषि यांच्यापैकीं जे वाजसनेयी असल्याबद्दलचा उल्लेख केला आहे, त्यांत व्यासाचेंही नांव आलें आहे.

अशा प्रकारानें शतपथाचें प्रणयन केल्यानंतर याज्ञवल्क्यानें आणखीही पुष्कळ ग्रंथ तयार केले. पैकीं दुसरा महत्वाचा ग्रंथ याज्ञवल्क्यस्मृति प्रसिद्धच आहे. या याज्ञवल्क्यस्मृतिवर अनेक टीकाकारांनीं ज्या टीका केल्या आहेत, त्यावरूनच तिचें महत्व दिसून येतें. याज्ञवल्क्याचा तिसरा महत्वाचा ग्रंथ याज्ञवल्क्यगीता होय. ही गीता १२ अध्यायात्मक असून गार्गीला सांगितलेली आहे. या गीतेंत योगशास्त्राचें उत्तम विवरण केलें आहे.

---

× व्यासः पराशरमुनौ पितरि स्थितेऽपि साक्षात्स्वयं मधुहरोऽपि यमेव वव्रे ॥ आचार्यमद्‌भुतगुणोत्कर राजमानं तं याज्ञवल्क्यगुरुमेव सदा नतोऽस्मि ॥ इत्यादित्यपुराणे ॥

❀ निशाकरोऽग्निः सूर्यश्च विधाता विश्वदेवताः । त्रिलोचनः शंखपाणिः सप्त ब्रह्मर्षयो मताः ॥ मृकंडुव्यासकपिलाः शुक्रः कण्वः पराशरः ॥ नारदोऽगस्त्यवाल्मीकी इमे माध्यंदिनाः स्मृताः । इत्यादित्यपुराणे ॥
तथा-- शक्रसोमाग्निरुद्राश्च विश्वेदेवास्त्रिलोचनाः । विधाता शंखपाणिश्च तथा सप्तर्षयोऽमलाः ॥ मृकंडुकपिलव्यासयाज्ञवल्क्यपराशराः । वाल्मीकिर्नारदोऽगस्त्य इत्येते वाजिशाखिनः ॥ इतिवायुपुराणे ॥

प्रकरण १३ वें

# योगीश्वर पदवी

याज्ञवल्क्य हे उत्तम योगवेत्ते व योगशास्त्राचे प्रवर्तक होते, हें त्यांच्या सुप्रसिद्ध योगीश्वर ह्या पदवीवरून स्पष्ट होत आहे. योगीश्वर ह्या नांवाच्या प्राप्तीसंबंधाची कथा पूर्वी 'जन्मकथा' ह्या प्रकरणांत निरूपण केलीच आहे. आतां ह्या प्रकरणांत योगीश्वर ही पदवी मिळाल्याचें कथानक वर्णन करावयाचें आहे. वरवर पहातां योगीश्वर हें नांव व योगीश्वर हीच पदवी असल्याचें वर्णन विलक्षण असें वाटतें.

ब्रह्मदेवानें याज्ञवल्क्याचे नामकरणाचे वेळीं ठेविलेलें योगीश्वर हें नांव कांहीं काल 'नांव' च राहिलें. पण सुविद्यता, तपस्विता, सत्यप्रतिज्ञता, निग्रहानुग्रहसामर्थ्य इत्यादि गुणांचा परिपोष जसजसा झाला तसतसा याज्ञवल्क्य जगद्विख्यात झाला. इतर गुणांच्या परिपोषाबरोबर त्याचें योगशास्त्रावरील प्रभुत्वही वृद्धिंगत झालें आणि तें प्रभुत्व दाखविण्याकारितांच पूर्वी अप्रकाशित राहिलेलें योगीश्वर हें नांव शंकराच्या मुखांतून पदवीरूपानें प्राप्त झालें. अशा रीतीनें सकल जगाचा उत्पादक या नात्यानें ब्रह्मदेवाकडून नामरूपानें व सकल विद्यांचा अधिपति या नात्यानें शंकराकडून पदवीरूपानें याज्ञवल्क्य ह्या नांवामागें योगीश्वर हीं चार अक्षरें संलग्न होऊन अन्वर्थक झालीं. ही घटना व आथर्वण वेदांतील पिप्पलादीय समाम्नाय प्रवृत्तीची घटना घडवून आणण्याकरितां विधिसंकेतानें पुढील घटनेचा प्रसंग घडून आला.

कोणे एके काळीं महासमर्थ पिप्पलाद व याज्ञवल्क्य या उभयतांत कांहीं आकस्मिक कारणानें द्वेषाग्नि पसरला. तेव्हां याज्ञवल्क्याचा सूड घेण्याकारितां त्यानें अरण्यांत जाऊन अग्नीचें ध्यान केलें व त्या अग्नींत आभिचारिक हवन करून एक कृत्या उत्पन्न केली. ती कृत्या हात जोडून पिप्पलादास म्हणाली, "हे मुने, कशाकारितां तूं मला बोलाविलेंस ? तुझें काय काम आहे ? समुद्रास शोषून, पर्वताचें चूर्ण करून, पृथ्वीस वेढून, आकाश फोडून किंवा कोणाचे मस्तकावर जाऊन त्याचा नाश करूं ? लवकर

सांग. " हें त्या कृत्येचें भाषण ऐकून पिप्पलाद भिंवया वर चढवीत मोठ्या आवेशानें म्हणाला, " मीही तुला तितक्याच त्वरेनें बोलाविलें आहे. तरी तूं येथें मुळींच थांबूं नकोस. मिथिलेंत याज्ञवल्क्य रहात आहे. त्याचा नाश कर. " अशा प्रकारची पिप्पलादाची आज्ञा होतांच ती कृत्या मिथिलेंत याज्ञवल्क्या-जवळ येऊन उभी ठाकली. याज्ञवल्क्य त्या कृत्येस पाहून पळूं लागला. ती कृत्याही त्याचे पाठोपाठ निघाली. कृत्येपासून संरक्षण होण्याकरितां याज्ञवल्क्य क्रमानें राजा जनक, देवेंद्र, ब्रह्मा व विष्णु यांचेकडे शरण गेला. परंतु त्या सर्वांकडून त्यास एकच जबाब मिळाला कीं, " ब्राह्मणानें उत्पन्न केलेल्या कृत्येपासून संरक्षण करणें आम्हांस अशक्य आहे. शेवटीं जीविताविषयीं निराश होऊन याज्ञवल्क्य सर्वविद्याधिपति शंकराला शरण गेला. श्री शंकरानें त्यास आश्रय व अभय देऊन आपल्या शरीरांत प्रविष्ट करून घेतलें व त्यास योगशास्त्राचा उपदेश केला. ती कृत्याही पाठोपाठ शंकराचे जवळ येऊन म्हणाली, " या पुरुषास तूं सोड ! " शंकरानें याज्ञवल्क्यास म्हटलें, " तूं बाहेर ये भिऊं नकोस. " तसेंच शंकर कृत्येसही म्हणाले, " या पुरुषाचें तूं काय करणार ? " यावर कृत्या म्हणाली, " क्रुद्ध झालेल्या पिप्प-लादानें त्याच्या हिंसेकरितां माझें स्मरण केलें असल्यामुळें मी याचा नाश करीन. " हें त्या कृत्येचें भाषण ऐकून श्रीशंकरांनें आपल्या देहाच्या ठिकाणीं असलेल्या याज्ञवल्क्यास कवचमंत्रानें अभिमंत्रित करून वज्रदेही बनविलें. नंतर योगीश्वर ही पदवी देऊन त्यास आपल्या शरीराचे बाहेर सोडून देऊन अंतर्धान पावले. नंतर त्या कृत्येनें याज्ञवल्क्यास मारण्यासाठीं पुष्कळ प्रयत्न केला. परंतु कांहीं चालत नाहीं असें पाहून ती कृत्या तेथेंच शांत झाली. कृत्या शांत झाल्यानंतर याज्ञवल्क्य स्वस्थानाला परत आला. इकडे पिप्पलाद त्या कृत्येस याज्ञवल्क्याकडे पाठवून देऊन नर्मदा कांठीं निघून गेला. तेथें शंकरास प्रसन्न करून घेण्याकरितां तपश्चर्या करून सिद्धि

---

मिथिलास्थः स योगीन्द्रः क्षणं ध्यात्वाऽब्रवीन्मुनीम्

याज्ञ. स्मृ. आ. अ. श्लो. २ पूर्वार्ध

मिळवून महामुनि झाला. हाच पिप्पलाद पुढें अथर्ववेदांत पिप्पलाद-शाखेचा प्रवर्तक व ब्रह्मसंप्रदायांतील पिप्पलादीय समाम्नायाचा जनक झाला. अशा रीतीनें याज्ञवल्क्य हा पुढें योगीश्वर ❀ ह्या महत्त्वाच्या उपपदानें मंडित झाला.



---

❀ ही कथा स्कं. पु. अवंतिखंडांतर्गत रेवाखंड नर्मदा-महात्म्य अ. ४२ मध्यें दिली आहे, व स्कं. पु. ना. खं. अ. १७४ मध्येंही दिली आहे.

प्रकरण १४ वें

# उत्तरवंश

पूर्वी आम्ही सांगितलेंच आहे कीं, याज्ञवल्क्यास दोन भार्या असून, त्यास अनेक पुत्र होते. त्या दोन भार्यांपैकीं मैत्रेयीस कांहीं संतान नसून कनिष्ठ भार्या कात्यायनी इलाच अनेक पुत्र होते. त्या सर्वांचीं नांवें उपलब्ध झालीं नाहींत. आह्निक–सूत्रावलींत शेवटीं दिलेल्या याज्ञवल्क्य चरित्रांत 'कात्यायनीला— चंद्रकांत, महामेध व विजय या नांवाचे तीन पुत्र होते, असें म्हटलें आहे. परंतु असा उल्लेख आर्ष ग्रंथांतून आम्हांस कोठें दिसून आला नाहीं. फक्त स्कं. ना. खं. अ. १२९--३० मध्यें याज्ञवल्क्यास कात्यायनीचे ठिकाणीं कात्यायन × नांवाचा वेदार्थ वक्ता व कल्पसूत्र कर्ता असा पुत्र झाल्याचें वर्णन आलें आहे. हा कात्यायनही आपल्या पित्याप्रमाणें महातपस्वी व उदारचरित असा होता. त्याचे संबंधीं उपलब्ध झालेला थोडासा इतिहास या प्रकरणात देण्याचें ठरविलें आहे.

प्रथम याज्ञवल्क्य हा आपली ज्येष्ठ भार्या मैत्रेयी ब्रह्मवादिनी असल्यामुळें प्रायः तिचेवरच विशेष प्रेम करीत असे; हें पाहून कात्यायनीस राहून राहून खेद होई. एके दिवशीं कात्यायनीनें आपली प्रिय सखी जैमिनि ऋषिची पत्नी, शांडिली हिचे जवळ आपल्या दुःखाचें कारण सांगितलें. शांडिलीनेंही तिचें दुःख निवारण करण्याकरितां कात्यायनीस मार्गशीर्ष शु. ३ पासून एक वर्षपर्यंत गौरीव्रत करावयास सांगितलें. कात्यायनीनें तें व्रत आचरण केलें, व त्यामुळेंच तिचें मनास समाधान वाटून तिला तिच्या अपेक्षेप्रमाणें याज्ञवल्क्यापासून एक पुत्र झाला. तोच हा कात्यायन होय. हा कात्यायन यज्ञविद्येंत फार कुशल होता. हाच उत्तम वेदार्थवक्ता म्हणून

---

× कृत्वोपनिषदं चारु वेदार्थैः सकलैर्युतं । जनकाय नरेंद्राय व्याख्याय च ततः परं ॥ कात्यायनं सुतं प्राप्य वेदसूत्रस्य कारकम् ॥ इति

स्कं. पु. ना. खं. अ. १२९-३०

## कात्यायन-माध्यंदिनसह याज्ञवल्क्य



त्याची फार ख्याति असे.

यानें आदित्य परंपरेत शुक्लयजुर्वेदांत यज्ञोपयोगी असे अनेक ग्रंथ निर्माण केले आहेत. फक्त स्वशाखेंतच ग्रंथ निर्माण केले असें नसून अन्य शाखांतही अर्थात् ऋग्वेद, सामवेद, आथर्वणवेद यांतही अनेक ग्रंथ निर्माण केले आहेत, व त्यामुळेंच त्याला पारस्कर × असें नांव मिळालें. कात्यायनानें आदित्यपरंपरेंतील चारी वेदांत निरनिराळीं गृह्यसूत्रें, श्रौतसूत्रें व परिशिष्टें निर्माण करून पित्याच्या शाखाप्रणयनांत भर टाकून यज्ञसंस्था पूर्णावस्थेस नेली. कात्यायनास ' बह्वृचाचार्यसिंह ‡ ' अशी पदवी असल्याचा उल्लेख आश्वलायन सर्वानुक्रमणिका ' एको हि शौनकाचार्यशिष्यो भगवान् कात्यायनः ॥ ' या सूत्रावरील षड्गुरुशिष्याचे भाष्यांत व शुक्लयजुःसर्वानुक्रमावरील अनंतदेवभाष्यांत आला आहे. कात्यायनानें केलेल्या ग्रंथांचा परिचय उत्तरार्धांत देऊं. कात्यायनासही ' सर्वगुणमंडित वेदवेदांगपारग अनुष्ठाननिरत ' असा एक वररुचि नांवाचा पुत्र होता. कात्यायनानें वडनगर क्षेत्रांत एक वास्तुपद नांवाचें तीर्थ व महागणपति नांवाचें पीठ स्थापन केल्याचें वर्णन स्कं. पु. ना. खं. अ. १३२ मध्यें आलें आहे. शुक्लयजुर्वेदांतील कात्यायन शाखेचा प्रवर्तक कात्यायन व याज्ञवल्क्यसुत कात्यायन ह्या व्यक्ति एक नाहींत. कारण कात्यायन शाखेंतील बरेचसे श्रौतसिद्धांत कण्व समाम्नायाला जुळणारे आहेत, व शाखाप्रवर्तक कात्यायन हा कण्वाप्रमाणें अंगिरागणांतील कपिगणांतर्गत असून त्याचे प्रवर – आंगिरस, बार्हस्पत्य, कापेय असे आहेत. याज्ञवल्क्यसुत कात्यायन हा विश्वामित्रगणांतील कतगणांतर्गत असून त्याचे प्रवर– वैश्वामित्र, कात्य, आत्कील असे आहेत, व तो स्वतःस कौशिक पक्षाचा शिष्य म्हणवितो, असें आम्ही मागें दाखविले आहेच. यावरून हे दोन्ही कात्यायन निरनिराळ्या व्यक्ति असल्याचें आमचें मत आहे.

---

× पारक्यं करोतीति पारस्करः स्वशाखासूत्राणि प्रणीय ऋक्सामाथर्वेषु सर्वानुक्रमणिकाकर्मप्रदीपिकादीनि सूत्राणि प्रणीतानि । इति

‡ बह्वृचाचार्यसिंहेन कात्यायनमहर्षिणा । इति षड्गुरुकृतसर्वानुक्रमभाष्ये अनंतदेवकृतशुक्लयजुःसर्वानुक्रमभाष्ये च ।

पाणिनीय सूत्रावरील वार्तिककार व भ्राजश्लोक लिहिणारा सुप्रसिद्ध कात्यायन हा दोन्ही व्यक्तीहून निराळाच होय. कारण ह्या तिसऱ्या कात्यायनास कथासरित्सागरामध्यें वररुचि या नांवानें संबोधिलें आहे. हा सोमदत्तापासून वसुदत्तेच्या ठिकाणीं उत्पन्न झालेला असून पुष्पदंत नांवाच्या शंकराच्या गणाचा अवतार म्हटलें आहे. यालाच श्रुतधर असें तिसरें नांव दिलेलें आहे. कात्यायन व वररुचि हीं दोन्हीं नांवें येथें एकाच व्यक्तिचीं असून पूर्वीं सांगितलेले कात्यायन व वररुचि ह्या दोन निरनिराळ्या व्यक्ति असून त्यांच्यांत पितापुत्राचें नातें आहे. शिवाय हा कात्यायन कलीच्या दहाव्या शताब्दींत झाला असून याज्ञवल्क्यसुत कात्यायन हा कलीच्या प्रथम शताब्दींत झाला आहे हें याज्ञवल्क्याच्या कालावरून सिद्ध होत आहेच. वार्तिककार कात्यायनाचा काल सुप्रसिद्ध पं. दुर्गाप्रसाद द्विवेदी ह्यांनीं आपल्या साहित्यदर्पणाच्या भूमिकेंत सिद्ध केला आहे. तेव्हां त्याचा विस्तार आम्ही येथें करीत नाहीं.

वार्तिककार कात्यायन भृगुगणांतील वात्स्यायनगणांतर्गत भार्गवच्यावनादि पंचप्रवरी असणें विशेष संभवनीय आहे.



जनकसभा—वादस्थळ



प्रकरण १५ वें

# जनक सभेंतलि दिग्विजय

मागील प्रकरणांत सांगितलेला शाखाप्रणयनाचा वृत्तांत घडल्या-नंतर याज्ञवल्क्याचा कीर्तिपरिमल भूतलावर सर्वत्र प्रसार पावला. ती कीर्ति ऐकून आदिवैदेह शालांग नांवाच्या जनक * राजास वाटलें कीं, आपण याज्ञवल्क्यास गुरु करून त्याजपासून ब्रह्मविद्या ग्रहण करावी व अक्षय्य सुखाचा लाभ मिळवावा. परंतु हें घडावें कसें ! कारण सर्व ब्राह्मणांत याज्ञवल्क्यच सर्वांत ब्रह्मिष्ठतम आहे, हें प्रत्ययास आणून देणें फारच जोख-मीचे आहे. जर मी एखाद्याला प्रश्न केला तर तो आपलेंच मनोगत सांगेल, व आपल्याविषयीं राजा जनक संशयी आहे असा मनोदय करून घेईल. किंवा एखाद्याचा दुसऱ्याविषयीं द्वेष असेल, तर तो त्याची निंदा करील, मग तो देव असो, गुरु असो किंवा ब्रह्मदेव असो. याचें अगदीं उलट एकाद्याचे दुसऱ्याविषयीं प्रेम आहे, तर तो त्याची स्तुति करील. मग तो ज्ञानाविज्ञानशून्य, असला तरी हरकत नाहीं. उदासीनाकडून कोणत्याच प्रकारचा निर्णय होणें शक्य नाहीं. कारण त्यास दुसऱ्याचे गुणदोष उदासीनत्वामुळें माहीत अस-ण्याचा संभव नसतो. तसेंच ब्राह्मणांना ' तुमच्यापैकीं कोण ब्रह्मिष्ठतम आहे असा प्रश्न केला तर सर्वच म्हणतील मीच ब्रह्मवेत्ता आहे, कारण स्वतःचा कमीपणा कोण वर्णन करील ? तसेंच जर मी या ब्राह्मणांना निरानिराळया प्रकारचें प्रश्न करून निर्णय करून घेईन म्हटलें, तर तेंही शक्य नाहीं. कारण ते मला शाप देतील ! किंवा तुम्ही आपसांत वाद करा म्हणजे त्यांतून ब्रह्मिष्ठ कोण, हें मी ठरवीन, असेंही म्हटलें तरी क्रुद्ध होऊन आपल्या ब्रह्मतेजानें मला भस्मसात् करतील. तेव्हां आतां अशा एखाद्या उपायाची योजना केली पाहिजे कीं, जेणेंकरून हे स्वतःच वादाला प्रवृत्त होतील. ' असा विचार

---

* स्कं. पु. ना. खं. अ. २७८ मध्यें या जनकाचे ' रत्नमिश्र ' असें नांव दिलेलें आढळते.

करितांना जनकास एक उपाय सुचला. द्रव्यामुळें सर्व कांहीं अपेक्षेप्रमाणें घडून येतें म्हणून त्यानें त्या प्रमाणें अंतःकरणाशीं याज्ञवल्क्याला गुरु मानून बाह्यतः बहुदक्षिणाक अश्वमेध यज्ञाच्या निमित्तानें कुरु–पांचालप्रभृति देशांतील ब्राह्मणसमुदाय एकत्र जमविला. तेव्हां त्यांना पाहून त्या वैदेह जनकाला त्या ब्राह्मणांतील ब्रह्मनिरूपण करण्यास अतिशय समर्थ असा कोण आहे, हें विशेषेंकरून जाणण्याची इच्छा झाली. त्यानें गोठ्यांत एक सहस्र गाई कोंडल्या. एकेका गाईच्या दोन्ही शिंगांना मिळून दहा दहा सुवर्णाच्या मोहरा बांधल्या होत्या. नंतर जनक त्या ब्राह्मणांस म्हणाला, 'अहो पूज्य ब्राह्मणहो! तुम्हांपैकीं जो ब्रह्मिष्ठ असेल त्यानें या गाईंना आपल्या घरीं न्यावें.' पण ते ब्राह्मण त्या गाई नेण्यास धजले नाहींत. तेव्हां याज्ञवल्क्य आपल्या विद्यार्थ्याला म्हणाला, "हे प्रियदर्शना सामश्रवा! या गाईंना तूं आपल्या घरीं ने." तेव्हां त्यानें त्या गाई याज्ञवल्क्याच्या घरीं नेण्यास आरंभ केला. हें पाहून ब्राह्मण रागावून म्हणाले, "हा आम्हांमध्यें स्वतःस ब्रह्मिष्ठ कसें म्हणतो?" वैदेह जनकाचा होता (हवन करणारा ऋत्विज) अश्वल म्हणून होता. तो त्याला विचारूं लागला, "हे याज्ञवल्क्या! तूंच एक काय तो आम्हांमध्यें ब्रह्मिष्ठ आहेस होय?" तेव्हां याज्ञवल्क्य म्हणाला, "आम्ही ब्रह्मिष्ठाला नमस्कार करतों. आम्ही फक्त गाईची इच्छा करणारेच आहोंत." असें बोलून याज्ञवल्क्यानें आपल्या सामश्रवा शिष्यास गाई नेण्याविषयीं पुन्हां आज्ञा केली. गुरूच्या आज्ञेप्रमाणें सामश्रवा गाई नेत असतां त्या ऋषिमंडळांत फारच मोठा कोलाहल झाला. नंतर अश्वल, जरत्कारूपुत्र आर्तभाग, लाह्याचा पुत्र भुज्यु, चाक्रायणाचा पुत्र उषस्त, कौषीतकीचा पुत्र कहोल, वचक्नु ऋषीची कन्या गार्गी, अरुणपुत्र उद्दालक या सर्वांनीं याज्ञवल्क्याशीं ब्रह्मविद्येसंबंधीं पण कर्मविद्यारहस्यप्रकाशक असा विवाद क्रमाक्रमानें केला.

हा विवाद बृहदारण्यक उपनिषदाच्या तिसऱ्या अध्यायांत सविस्तर आलेला असून त्यावर शंकराचार्यांचें भाष्य, सुरेश्वराचार्यांचीं वार्तिकें व शंकरानंदांचें आत्मपुराण आहेत. विशेष जिज्ञासूंनीं तो विवाद त्यांचेच शब्दांत पहावा. सामान्य जनांसाठीं त्या विवादाचें तात्पर्यमात्र येथें आम्ही देत आहोंत.

वरील प्रमाणें याज्ञवल्क्याचें भाषण ऐकून जनक राजाच्या यज्ञांत

हौत्र कर्म करणाऱ्या अश्वल ऋषीनें प्रश्न केला कीं, "आपण जर ब्रह्मज्ञ आहांत तर हें सांगा कीं, हें सर्व जग मृत्यूनें ग्रासलेलें आहे. तर आमचे यजमानाला या मृत्युभयापासून ऋत्विज, अग्नि व होता या तिहींपैकीं कोण मुक्त करील ?" याज्ञवल्क्यानें उत्तर दिलें कीं, ❀ "आत्मयज्ञ केला असतां आत्मैक्य भावनेनें सर्वात्मा मृत्युपासून मुक्त होतो, हीच मोक्षपदाची प्राप्ति होय" पुनः प्रश्नः— "हें जग दिवस रात्र या कालानें व्याप्त आहे; तर ह्या कालव्याप्तीपासून आमचे यजमान, कोणत्या अध्वर्यूकडून या भवसमुद्रांतून पार होतील. ?" उत्तरः— "चक्षुरिंद्रिय हा ज्ञानयज्ञांत अध्वर्यु, त्या इंद्रियाची अधिदेवता, कालाचा उत्पादक सूर्य व त्या सूर्याचें अधिष्ठान जें कूटस्थ चैतन्य तें आपण या तिहींच्या ऐक्य भावनेनें सूर्यात्मा आपणच होतो. म्हणून ह्या कालापासून आत्मा हा × मुक्त होतो." पुनः प्रश्नः— "आत्मयज्ञांत अध्वर्यु किती आहुति घालतो व त्यांचें फल काय ?" उत्तरः— "अध्वर्यु आत्मयज्ञामध्यें उज्ज्वलंति, अतिनेदंति व अतिशेरंति अशा तीन आहुति टाकितो. ह्या तिहींपासून अनुक्रमें देवलोक, पितृलोक व मनुष्य लोक यांची प्राप्ति होते." पुन प्रश्नः— "किती देवासहवर्तमान ब्रह्मदेव यज्ञ संरक्षण करितो ?" उत्तरः— "एकट्या मनोनामक देवासह तो यज्ञाचें रक्षण करितो ! मनाला अनंत अशी संज्ञा आहे आणि देव अनंत आहेत, अशी श्रुति आहे. म्हणून एकट्या मनाच्या योगानें अनंत लोकींचें फल मिळतें." हें ऐकून हा खराच ब्रह्मवेत्ता आहे असें म्हणून अश्वल ऋषि स्वस्थ राहिला.

---

❀ आत्मयज्ञाचें स्वरूपः— आत्मयज्ञांत वागिंद्रिय हा होता, ऋत्विज हा त्या वाणीची देवता, अग्नि तोच अग्नि, व अग्नीचें अधिष्ठान कूटस्थ चैतन्य हा यजमान होय. ह्या तिहींच्या ऐक्य भावनेनें मृत्युव्याप्त जगापासून आत्मा निराळा होऊन सहजच मुक्त होतो.

× ही कालमुक्ति होय. जग हें अज्ञानानें भासतें व बोलण्याला मात्र सत्य वाटतें. निष्प्रयोजक जगदस्तित्वाच्या अहंकाराच्या ध्यासानें मृत्यु कल्पितच वाटतो; तेंव्हां सर्व जग आत्मस्वरूपच आहे असा निश्चय झाल्यावर आत्मा सहजच मुक्त होतो. हीसच जगन्मुक्ति असेंही म्हणतात.

नंतर जरत्कारूचा पुत्र आर्तभाग यानें प्रश्न केला. " आत्मयज्ञांत ज्ञानाग्निमध्यें होम करण्यास ग्रह किती व उपग्रह किती आहेत. " उत्तरः- १ प्राण २ वाणी ३ जिव्हा ४ चक्षु ५ मन ६ कान ७ हात व ८ त्वचा हे आठ ग्रह झाले. आतां अतिग्रह ऐक. प्राणाचा उपग्रह अपान १ वागिंद्रियाचा भाषण २ जिव्हेचा-रस ३ चक्षूची-रूप ४ मनाचा-काम ५ कानाचा-शब्द ६ हाताची-क्रिया ७ त्वचेचा-स्पर्श ८ असे आठ उपग्रह आहेत. ह्या अति-ग्रहांशीं प्राणादिग्रह सर्वकाल संयुक्तच असतात आणि गंधादि विषयरूपी हवि-र्द्रव्य जीवाला समर्पण करितात. तात्पर्य आठ इंद्रियें ग्रहस्थानीय, आणि आत्मा हा अग्निस्थानीय अशी भावना केल्यानें विषयीं गुंतून न राहातां आत्मा वासना रहित होऊन मुक्त होतो. " पुनः प्रश्नः- " मृत्यूचें भक्ष्य सर्व जग आहे. परंतु मृत्यु कोणाचें भक्ष्य, याचें उत्तर दिलेंस तर हे याज्ञवल्क्या तूं खरा ब्रह्मज्ञ, " उत्तरः- " ऐक-आत्मविस्मृति हेंच मरण होय. जग मोहित झाल्यानें त्या मोहित जनांच्या दृष्टीनें मृत्यु हा जगभक्षक आहे. पण जो निःसंशयपणें आपण ब्रह्मच आहे असें जाणतो तोच मृत्युचा भक्षक होय." पुनः प्रश्नः- " जो आत्मज्ञानी देह सोडतो त्याची वाणी अग्निदेवतेप्रत प्राण आदित्यदेवतेप्रत पोंचतात. म्हणजे प्राण वायुप्रत-नेत्र सूर्याप्रत-मन चंद्राप्रत-श्रोत्रादि शरीर पृथ्वीप्रत-अंतःकरण आकाशा प्रत-केश औषधींत आणि रक्त व रेत उदकाप्रत पावतात. पण जीव हा कोठें रहातो तें सांग. " उत्तरः- " जीव हा ब्रह्मांत ब्रह्मरूपानें असतो. " पुनः प्रश्नः- " ती वस्तु मला स्पष्टपणें दाखवाल काय ? " उत्तरः- " ती दाखवण्यास एकांतवास पाहिजे. " असें म्हणून दोघांनीं एकांतांत जाऊन बराच वेळ आत्मविचार केला. त्यामध्यें आत्मज्ञानानें मोक्ष, पुण्यकर्मानें पुण्यलोक, पापकर्मानें पापलोक प्राप्त होतो, " असें सांगितलें. तेव्हां तो आर्तभाग या वादविवादांत आत्मज्ञानी झाल्यामुळें स्वस्थ राहिला. त्यानंतर लाह्यायनाचा पुत्र भुज्यु म्हणाला, " हे याज्ञवल्क्या ! मद्रदेशांत काप्यनामक ब्राह्मणाच्या मुलीच्या अंगांत आलेल्या गंधर्वाचें व आमचें काय भाषण झालें तें सांग ? " उत्तरः- " पारीक्षित ❀ हे कोठें रहातात ? व

---

❀ पूर्वकल्पांत अश्वमेध यज्ञ केलेले.

ताक्ष्यचयनावर * अश्वमेध केलले कोठें जातात ? असा तुमचा प्रश्न होता. त्याचें उत्तर त्यानें दिलें कीं पारीक्षितांचें ¶ स्थान ब्रह्मांडाबाहेर आहे. ताक्ष्यचित अश्वमेध करणाऱ्यांचे स्थानीं जाण्यास इंद्रही असमर्थ आहे. ब्रह्मांडकटाहसंधीचा मार्ग सूक्ष्म असल्यामुळें इंद्र स्वतः गरुड होऊन वायुलोकीं जाऊन त्यांना वायूचे स्वाधीन करितो. नंतर वायु त्यांना आत्मस्वरूपी ( वायुरूपी ) करून, ब्रह्मांडाबाहेर जेथें पारीक्षित आहेत तेथें पोंचवितो. " हें ऐकून भुज्यु स्वस्थ राहिला. नंतर चक्रायणाचा पुत्र उषस्त ह्यानें प्रश्न केला, " हे याज्ञवल्क्या, सर्वांचा आत्मा कसा आहे हें आम्हांस प्रत्यक्षपणें दाखव. " उत्तरः— " हा आत्मा देहद्वयाहून $ वेगळा असून जड वृत्तींचा चालक आहे. हा विज्ञानमय ‡ कोशांत स्पष्टपणें प्रत्ययास येतो. " पुनः प्रश्नः— " चालती गाय व पळता घोडा हे जसे स्पष्ट दृष्टिगोचर नाहींत तसें तुझें हें भाषण स्पष्ट झालें नाहीं. तरी आम्हांस आत्मा स्पष्ट रीतीनें दाखव. " उत्तरः— " जो प्रियरूप आहे व प्राणवायूस प्रेरणा करून प्राणचेष्टा करवितो आणि अपानवायूला खालीं ओढितो तोच तुमचा व सर्वांचा आत्मा. ज्याच्या आश्रयानें तुम्ही मी आहे, मी जाणतों, असें मानतां तो तुमचा अंतरात्मा होय. तुम्ही जर तो अद्वितीय आत्मा आहांत तर दाखविणारा दुसरा कसा मिळेल ? श्रवण करणारा व मनन करणारा एका आत्म्याशिवाय दुसरा कोणीही नाहीं. आत्म्यावांचून जें कांहीं भासतें तें मृगजलाप्रमाणें मिथ्या होय कारण सर्व कांहीं संकल्परूपी भ्रमानें व आत्मविस्मरणानें दिसतें. संकल्पामुळें द्वैताचा भास होतो. संकल्पाचा क्षय होऊन निःसंकल्प झालें असतां शेष सर्वांतरात्माच राहतो. " हें ऐकून उषस्तही स्वस्थ बसला. नंतर कौषीतकाचा पुत्र कहोलऋषि ह्मणाला,

---

* गरुडाच्या आकाराचे चयनयज्ञांतील आहवनीय अग्नीचें स्थान.

¶ पूर्वकल्पांत अश्वमेध यज्ञ केलेले.

$ भौतिक देहाच्या आंत लिंगदेह व त्याच्या आंत अज्ञानरूपी कारणदेह आहे.

‡ वेदांतशास्त्रांत अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय असे शरीरांत पांच कोश आहेत, असें सांगितलें आहे.

" हे याज्ञवल्क्या, सर्वांतर्गत जें तें आम्हांला प्रत्यक्ष दाखव. " उत्तर:- " जो क्षुधा, तृषा, शोकादिकांहून निराळा, देहातीत, असंग, निरिच्छ व सर्वसाक्षी आहे तो तूंच आहेस. ज्या आत्मसाक्षात्कारास्तव मुलेंबाळें, धनदौलत व गणगोत यांचा त्याग करून ब्राह्मण संन्यास घेऊन लहान मुलाप्रमाणें निरभिमानपणें स्वैर संचार करितात व मी ब्रह्मच आहे असा निश्चय करितात, तोच सर्वात्मा निःसंशयपणें तूंच आहेस. तुजवांचून सर्व कांहीं मायिक व असत्य आहे. " हें भाषण ऐकून कहोलही स्वस्थ बसला. नंतर वचक्नु ऋषीची निरंतर दिगंबर वृत्तीनें रहाणारी गार्गी नांवाची कन्या होती, तिनें प्रश्न केला, " हे याज्ञवल्क्या, हें सर्व जग कशानें पूर्ण व्यापिलें आहे ? " उत्तर:- ' उदकानें. ' प्रश्नः- ' उदक कशानें ? ' उत्तर:- ' वायूनें. ' प्रश्नः- ' वायू कशानें ? ' उत्तर:— ' अंतरिक्षानें. ' प्रश्नः- ' अंतरिक्ष कशानें ? ' उत्तरः- ' गंधर्वलोकानें ' प्रश्नः— ' तो ? ' उत्तर:— ' आदित्यलोकानें ' प्रश्नः— ' तो ? ' उत्तर:- ' चंद्रलोकानें ' प्रश्नः- ' तो ? ' उत्तर:- ' नक्षत्रलोकानें. ' प्रश्नः- ' तो ? ' उत्तर:— ' इंद्रलोकानें. ' प्रश्नः- ' तो कशानें? ' उत्तर:- ' प्राजापत्यलोकानें ' प्रश्नः- ' तो? ' उत्तर:- ' ब्रह्मलोकानें. ' प्रश्नः— ' तो ? ' याज्ञवल्क्य पुढें म्हणाला, " हे गार्गि, यापुढें विचारूं नकोस. देवतेचें उल्लंघन करून अवैदिक प्रश्न करशील तर तुझें मस्तक तुटून पडेल. " तेव्हां अवैदिक तर्कानें याज्ञवल्क्यऋषीचें अतिक्रमण करणें भयंकर होय. असें जाणून ती स्वस्थ राहिली. नंतर अरुणपुत्र उद्दालक पुढें येऊन म्हणाला, " हे याज्ञवल्क्या, सूत्र तें कोणतें ? व अंतर्यामी असणारा तो कोण ? या दोहोंचीही उत्तरें जो देईल तोच ब्रह्मवेत्ता असें पतंचलाच्या स्त्रीच्या अंगांत येणाऱ्या गंधर्वानें सांगितलें आहे. तर या दोनही प्रश्नांचीं उत्तरें माहीत असल्यास सांग. ' तुझें मस्तक तुटून पडेल ' असें म्हणून भिववूं नकोस. तूं जर शोकामुक्त आहेस तर तुझें मस्तक कां पडूं नये तें सांग; कारण ब्रह्मज्ञानी निरिच्छ असतात. " उत्तर:— " वायू हा सर्वव्यापक आहे. हा सर्व जीवांच्या आंत बाहेर प्राणरूपानें व्यापून राहिला आहे. म्हणून या वायूलाच सूत्र म्हणतात. हाच जडदेहांचा चालक आहे. आतां हे उद्दालका, अंतर्यामी कोण आहे तें सांगतों ऐक. पंचमहाभूतें, दशेंद्रियें, सूर्य, नक्षत्रें, चंद्र, अंतरिक्षादि लोक यांना अंतर्बाह्य एकटाच व्यापून टाकणारा, जो सर्वांना जाणतो

पण ज्याला कोणीही जाणत नाहींत, जो सर्वांचा नियामक, जो अखंड ज्ञानघन असून, कूटस्थ * आहे त्यालाच अंतर्यामी म्हणतात. सुवर्ण व त्यापासून केलेले अलंकार जसे अभिन्न तद्वतच आत्मा व विश्व हे अभिन्न आहेत. ह्याच्यावांचून कांहीं नाहीं. हा भ्रांतीनें द्वैतरूप भासतो. हा दृष्टीलाही पाहणारा, श्रवणेंद्रियाचा श्रोता व बुद्धीचाही जाणता आहे. सर्वकाल सर्वांच्या हृदयांत अहंकारानें स्फुरणारा तोच तुझा व सर्वांचा आत्मा होय. तूं सर्वसाक्षी व विज्ञानदेही असून तुजवांचून सर्व कांहीं मायिक व वृथा आहे, हें पक्कें समज. तूंच अंतर्यामी आहेस. " हें ऐकून उद्दालक ऋषिही स्वस्थ बसला. नंतर पुनः गार्गी म्हणाली, " अहो पूज्य ब्राह्मणहो, आतां मी याला दोन प्रश्न विचारीन. त्यांचीं उत्तरें जर यानें दिलीं तर तुम्हांपैकीं, याला कोणीही केव्हांच ब्रह्मसंबंधीं भाषणांत जिंकणार नाहीं. " तेव्हां इतर ब्राह्मण म्हणाले, " हे गार्गि, बरें विचार. " नंतर ती म्हणाली, " हे याज्ञवल्क्या, महारथी एकाच वेळीं दोन बाण टाकितो, त्याप्रमाणें तुझ्यावर आतां दोन प्रश्नरूपी बाण टाकितें, त्यांचें निवारण कर. ( १ ) या जगाच्या वर खालीं काय आहे ? ( २ ) तसेंच मागें झालेलें, पुढें होणारें व सध्यां असलेलें हें जग कोणाचा आश्रय धरून आहे ? " उत्तरः— " ज्याला ज्ञानाकाश असें म्हणतात तेंच सर्वांना वर व खालीं व्यापून आहे. पूर्वीं झालेलें, पुढें होणारें व हल्लीं असलेलें हें जग समुद्रावर तरंगावें त्याप्रमाणें याच्याच आधारावर अवलंबून आहे. " " हे याज्ञवल्क्य ऋषे, तुम्हांस नमस्कार असो. तुमचें हें ज्ञानाकाशाविषयीं निरूपण ऐकून मला आनंद झाला आहे. तरी हें चिदाकाश कोणे ठायीं आहे हें मला स्वात्मानुभवासाठीं सांगावें. " असें गार्गी म्हणाली. उत्तरः— " हे गार्गि, त्याचें अधिष्ठान अविनाशी आहे. जें स्थूल ना सूक्ष्म, ऱ्हस्व ना दीर्घ, रक्तादिवर्णरहित, सदा असंग, तमाहून निराळें, विषय, इंद्रियें व प्राणिजात यांहून निराळें, ज्ञानरूप, स्वसंवेद्य ( आपणाला आपण जाणणारें ), संकल्परहित, स्वयंप्रभ व जें स्वरूपाहून अभिन्न असें हें चिदाकाशाचें अधिष्ठान होय.

---

* कांहीं विकार न होतां एकाच स्वभावानें जो कालास व्यापक असतो तो.

त्याचेच आज्ञेवरून चंद्रसूर्य हे आकाशांत चालतात, त्याच्याच धाकानें नद्या वाहतात व इंद्रादि देव त्याच्या आधीन आहेत. अशा या अविनाशी वस्तूला जो कोणी स्वात्मैक्यभावानें जाणत नाहीं, त्याचीं होमादि सर्व कर्मे नाशवंत होत व तो पुनः या जन्ममरणाच्या भोंवऱ्यांत गुरफटून जातो. परंतु याला स्वात्मैक्य-भावानें जे जाणतात ते मुक्त होतात. हे गार्गि, तें अक्षर ब्रह्म तूंच. जें पहाणारें, ऐकणारें व विचार करणारें एकच ब्रह्म, तें तूंच आहेस. हे गार्गि, हें पक्कें समज कीं, ज्ञानाकाश हें तुझ्या ठायींच आहे. " हें ऐकून गार्गी म्हणाली, " हे ब्राह्मणहो, या याज्ञवल्क्याविषयीं शंकित होऊं नका. हा वंद्य आहे. " असें बोलून ब्रह्मज्ञ गार्गी स्वस्थ राहिली.

नंतर महापंडित शाकल्य ऋषि वादार्थ पुढें सरसावून म्हणाला, " हे याज्ञवल्क्या, एकंदर देवता किती आहेत ? " उत्तरः— " तेहतीस. " प्रश्नः— " त्या कोणत्या ? " उत्तरः— " अष्टवसु, एकादश रुद्र, द्वादश आदित्य, एक इंद्र व एक प्रजापति. प्रश्नः— " त्यांचीं नांवें मला सांग ? " उत्तरः— " शाकल्या, सविस्तर ऐक. १ अग्नि, २ भूमि, ३ वायु, ४ आकाश, ५ आदित्य, ६ चंद्र, ७ सत्तावीस अश्विन्यादि नक्षत्रें व ८ इतर तारे हे अष्टवसु; दहा प्राण व जीवात्मा हे एकादश रुद्र, हे प्राण्याचा त्याग करतांना त्याला रडवितात, म्हणून यांना रुद्र अशी संज्ञा आहे. सर्व जगाला काल-मानानें गिळंकृत करणारे द्वादश आदित्य बारा महिने होत. यज्ञाला इंद्र असें म्हणतात. स्तनयित्नु ( वीज ) हिला प्रजापति असें म्हणतात. अशा एकंदर तेहतीस देवता आहेत. " पुनः प्रश्नः— " या सर्व ऋषींना एकीकडे ठेवून तूं आपणालाच ब्रह्मज्ञ मानितोस तर सर्व दिशांच्या देवता व त्यांचीं वसतिस्थानें हीं माहीत असल्यास सांग ? " उत्तरः— " पूर्व दिशेचा देव सूर्य होय; हा अध्यात्म संज्ञेनें नेत्रगोलकीं असतो; रूप हें नेत्राचें अधिष्ठान असून त्याचें अधिष्ठान हृदय होय. दक्षिण दिशेचा देव यम असून तो यज्ञाच्या ठिकाणीं वसति करतो. यज्ञ दक्षिणेच्या ठायीं, दक्षिणा श्रद्धेच्या व श्रद्धा हृदयाच्या ठायीं राहिलेली असते. वरुण हा पश्चिम दिशेचा अधिपति, तो उदकाचे ठिकाणीं, उदक रेताचे ठिकाणीं व रेत हृदयाचे ठिकाणीं असतें; म्हणूनच आपणासारखी संतति होते. उत्तर दिशेचा स्वामी चंद्र हा दीक्षेच्या ठायीं, दीक्षा सत्यावर अवलंबून व सत्य हृदयामध्यें असतें. म्हणूनच दीक्षित

सत्य बोलतात, असें लोक समजतात. " प्रश्नः– " सर्वांचें ठिकाण जें हृदय तें कोठें आहे ? " उत्तरः– " हे शाकल्या, हें पक्कें समज कीं, सर्वांचें आदिकारण व सर्वांना आश्रयदायक जें हृदय तें तुझ्याच ठिकाणीं आहे. " प्रश्नः— " मी कोठें आहे ?" उत्तरः– "आपलें स्वरूप वाणीला अशक्य आहे, तें वेदवाक्यानेंच ओळखून घ्यावें. हे शाकल्या, हे अहह्लिका ❀ ! हीं आठ आयतनें, आठ लोक, आठ देव, व आठ पुरुष; जो त्या पुरुषांस निश्चयानें जाणून पुनः हृदयांत उपसंहार करून उपाधिधर्मांचें अतिक्रमण करतो त्या औपनिषद पुरुषासंबंधीं मी विचारतों. त्यासंबंधीं जर तूं मला स्पष्टपणें सांगणार नाहींस तर तुझें मस्तक तुटून पडेल. " असें याज्ञवल्क्य म्हणाला. त्याल शाकल्य जाणत नव्हता, म्हणून त्याचें मस्तक तुटून पडून तो एकाएकीं मृत्यु पावला इतकेंच नव्हे तर चोरांनीं धनच आहे असें समजून त्याचीं हाडें चोरून नेलीं. शाकल्याचें मस्तक तुटून पडल्यामुळें सर्व सभासद घाबरून स्तब्ध राहिले. तेव्हां याज्ञवल्क्यानें सर्वांना नमस्कार करून म्हटलें, " हे ब्राह्मणहो, ज्याला कांहीं विचारावयाचें असेल, त्यानें भय न धरितां खुशाल विचारावें. अथवा मी सर्वांना एखादा प्रश्न विचारावा काय हें सांगा. "

---

❀ या बृहदारण्यकांतील विवादाचे पूर्वीं असाच एकदां अग्निहोत्रविषयक विवाद झाला होता. त्या वेळीं शाकल्य व जनक हे दोघेही होते. त्यांत शाकल्याशीं याज्ञवल्क्याचा समानांत वाद झाला. त्या वादांतच याज्ञवल्क्यानें शाप दिला होता कीं, "पुरेऽतिथ्ये मरिष्यासि न तेऽस्थीनि च गृहान्प्राप्स्यंतीति स ह तथैव ममार । तस्य हाप्यन्यन्मन्यमानाः परिमोषिणोऽस्थीन्यपजह्रुः । तस्मान्नोपवादी स्यादुत ह्येवंवित्परो भवतीति । " पुण्यक्षेत्रातिरिक्त देशांत व पुण्यातिथि शून्यकालीं मरशील व तुझ्या अस्थीही घरास पोंचणार नाहींत. तो शाप अस्तित्वांत येण्याचा समय जवळ आला अशी सूचना देण्याकारितांच हें दुसरें विशेषण दिलें. अहह्लिक म्हणजे [ अहनि लीयते ] दिवसा लीन होतो, अर्थात् प्रेतस्वरूप बनतो, असा आहे. ही आख्यायिका शतपथ ब्राह्मण कांड ११ अध्याय ६ ब्राह्मण ३ कंडिका ११ या स्थळीं आली आहे.

भीतिमुळें कोणीही बोलत नाहींत असें पाहून महामुनि याज्ञवल्क्यानें स्वतःच त्यांना विनयानें प्रश्न केला, " मनुष्य व वृक्ष ह्या दोहोंत अगदीं साम्य आहे. लोम हींच या मनुष्यरूपी वृक्षाचीं पानें, त्वचा ही साल, रक्त हाच रस व अस्थि हींच काष्ठें होत. वृक्ष छेदन केला असतां त्याला पुनः अंकुर फुटून पूर्वस्थिति प्राप्त होते. तर या मनुष्यरूपी वृक्षाला मृत्यूनें छेदिलें असतां तो कोणत्या मुळापासून पुन्हां उत्पन्न होतो ? रेतापासून होतो असें मात्र सांगूं नका. कारण सजीवपणीं रेतापासून प्रजोत्पत्ति होते. " हें ऐकून " याचें उत्तर आम्हांस ठाऊक नाहीं. आपणच सांगावें. " असें त्यांनीं सांगितलें. तेव्हां याज्ञवल्क्य म्हणाला, " परमानंद ब्रह्म हेंच ह्या जीवाचें मूळ होय. "

वर सांगितल्याप्रमाणें शाकल्याच्या सर्व प्रश्नांस याज्ञवल्क्यानें उत्तरें दिल्यानंतर शाकल्य कुंठितमति झाला. कोणतेही प्रकारें याज्ञवल्क्याचा पराभव होत नाहीं असें पाहून शाकल्य संतापला व त्या संतापाच्या भरांत शाकल्यानें याज्ञवल्क्याची यथेच्छ निंदा * केली. वीस वेळां निंदा झाल्यानें श्री सूर्यनारायणानें घालून दिलेल्या मर्यादेचें उल्लंघन झालें व सहजगत्या याज्ञवल्क्याकडून शाकल्यास एक प्रश्न केला गेला. त्याचें उत्तर शाकल्य जाणत नव्हता. त्यामुळें उपरोक्त शिरःपाताचा भयंकर अनर्थ घडला. हाच विदग्ध शाकल्य याज्ञवल्क्याचा प्रथम ऋग्वेदाध्यापक गुरु होय. ज्या वेळीं त्याचे जवळील अध्ययन याज्ञवल्क्यानें टाकिलें, त्या वेळेपासून त्यानें याज्ञवल्क्याचा द्वेष करण्यास सुरवात केली. त्या दीर्घ द्वेषाचें पर्यवसान अशा प्रकारें आत्मनाशांत झालें.

सदर प्रसंगासंबंधीं पूर्वी कोणी एका ब्रह्मवेत्त्या याज्ञवल्क्यभक्तानें कांहीं ओंव्या करून ठेविल्या आहेत. त्यावर कर्त्याचें नांव वगैरे मुळींच कांहीं दिलेलें नाहीं. परंतु त्या ओंव्या प्रकृत प्रसंगाची यथार्थ कल्पना करून देणाऱ्या व मार्मिक असल्यानें वाचकवर्गाकरितां त्यांपैकीं कांहीं येथें देत आहोंत.

---

* सदरील निंदा आम्हीं आमच्या लेखणीनें उद्धृत करावी, हें आम्हांस प्रशस्त न वाटल्यामुळें ती आम्ही येथें उद्धृत केली नाहीं. जिज्ञासूंनीं आत्मपुराण अध्याय पांच मध्यें पहावी.

( जनकसभेतून याज्ञवल्क्यानें आपल्या शिष्यास गाई घेऊन जाण्याविषयीं आज्ञा केल्यानंतर तेथें जो प्रकार घडला त्यासंबंधीं वर्णन पुढील ओव्यांत आलें आहे. )

ऐसें देखोनी ते वेळीं । समस्त क्षोभली ऋषि मंडळी ॥
सकळ सभा गडबडली । निंदेस सर्व प्रवर्तले ॥ १ ॥
कुणी उठोनि उभे ठाकती । कुणी बैसले ठाईं बोलती ॥
येक क्रोधें थरथरा कांपती । प्रवर्तती वादासी ॥ २ ॥
निर्भत्सती अवघे जन । उच्चारती दोषगुण ॥
परी याज्ञवल्की आनंदघन । संतापें मन पोळेना ॥ ३ ॥
ब्राह्मण म्हणती देखा । तूं ज्ञाता कैसे न आधीक ॥
शिष्या हातीं गोधनें मकळिक । न्यावया येथें कोण तूं ॥ ४ ॥
ब्रह्मवेत्ता मी म्हणविशी । निःस्पृहता अंगीं वागविशी ॥
आज्ञा धरूनी गोधनें नेशी । अपमानून आम्हांतें ॥ ५ ॥
येरु बोले शिष्य सद्विवेक । वृत्ती गाई वळिल्या देख ॥
गोरक्षणें करावें सम्यक् । श्रुत्यर्थ हाच निर्धारी ॥ ६ ॥
चरम म्हणिजे शेवटील स्थिति । जीहुनी थोर नाहीं परती ॥
चंचलता नसे निश्चिती । चरमवृत्ती तो म्हणिजे ॥ ७ ॥
गाई रक्षण न करितां । चरम वृत्ती न ये हातां ॥
अलंकारासमवेत तत्वतां । गोधनें बरवीं रक्षावीं ॥ ८ ॥
तुम्ही म्हणाल कोणते अलंकार । श्रवणमननादि नवप्रकार ॥
दया क्षमा शांती निरंतर । शृंगार सह रक्षाव्या ॥ ९ ॥
निजानुसंधान गोकंठपाश । त्याविण गाई नावरती निःशेष ॥
निरंजनीं सावकाश । गाई न्याव्या चरावयास ॥ १० ॥
वेदमर्यादा काठी घेउनी । गाई वळाव्या क्षणक्षणीं ॥
परि विषयक्षेत्रीं जाउनी । भरोन द्याव्या सर्वथा ॥ ११ ॥

---

वरील ओव्या शक्य तों मूळ ग्रंथास अनुसरूनच देणें योग्य त्यावरून मूळ ग्रंथांतील दोष मुळींच सुधारले नाहींत.

ऐसें करितां गोरक्षण । सप्त भूमिका ओलांडुन ॥
चरम वृत्ती बाणे पूर्ण । शेवटील जीस म्हणती ॥ १२ ॥
ऐसें याज्ञवल्की बोलला । परि ते न मानेच तयाला ॥
आश्वलायन-आर्तभाग कहोला । वाद केला तिहीं बहू ॥ १३ ॥
श्वेतकेतु-आजमीढ-जरत्कादिक । अवघे जिंकी याज्ञवल्क्य ॥
सत्य निरंतर केलीया अधोमुख । सर्वेही ऋषी पाहाती ॥ १४ ॥
तों तेथें गार्गी नामें योगिनी । ब्रह्मवेत्ती सदा नम्र ॥
आकस्मात उभी ठाकली येउन । म्हणे कां रे भांडण करितसां ॥ १५ ॥
झाला जो पूर्व वृत्तांत । जनक गार्गी प्रती सांगत ॥
ती म्हणे ऋषी हो ऐका समस्त । निवडीतें येथें वाद हा ॥ १६ ॥

* ❀ *

तुझी केवळ ब्रह्मस्थिती । वादीं जिंकिलें सकळाप्रती ॥
तरी माझे प्रश्न सांग निश्चिती । याज्ञवल्की यावर बोले ॥ १७ ॥
तुझे प्रश्नाचें करीन निरसन । जरी तूं आडवे घेशी जाणोन ॥
तरी शीर पडे तुटोन । जाण खूण हेच पै ॥ १८ ॥
अंतरीं जाणोन यथार्थ । अन्यथा बळें प्रतिपादित ॥
तरी होईल अनर्थ । शिर पडे खालती ॥ १९ ॥
यावरी करी तूं प्रश्न । मग गार्गी काय बोले वचन ॥
संतीं परिसावें सावधान ॥ ब्रह्मानंदें करूनियां ॥ २० ॥
गार्गी बोले याज्ञवल्क्यास । म्यां घेतलें संदेह धनुष्य ॥
दोन प्रश्न बाण निःशेष । लाऊन सोडितें तुजवरी ॥ २१ ॥
अविलंबें मोडी दोन्ही शर । याज्ञवल्की बोले उत्तर ॥
सद्गुरु माझा भास्कर । प्रत्युत्तर देईल तो ॥ २२ ॥
काय आहे एकवीस स्वर्गावरी । सप्त पाताळातळीं काय निर्धारी ॥
ओतप्रोत मध्य अवधारी । काय आहे सांग पां ॥ २३ ॥
वस्तु व्यापक सर्वांतरीं । हेही सांग कवणे परी ॥
व्यापूनि वेगळे सर्वत्रीं । कोणे रीतीनीं सांग पां ॥ २४ ॥

हे स्त्री करीते प्रश्न । म्हणोन न करी हेळण ॥
सांगतां तूं न होईं भिन्न । अभेदपणें सांगावें ॥ २५ ॥
मग याज्ञवल्की मांडी धैर्यठाण । काढी वेदांतींचे दिव्य बाण ॥
आतां प्रश्न-शर छेदून । बिदारील आशंकेतें ॥ २६ ॥
तटस्थ पाहे ऋषिमंडळ । सावधान ऐके जनक भूपाळ ॥
अंतर्ज्ञानी निर्मळ । सर्वद्रष्टा याज्ञवल्की ॥ २७ ॥
पुससी तूं स्वर्गावरतें । आणि पाताळाखालतें ॥
बोलतो त्या मर्यादातें । सांगतां जाय विरोन ॥ २८ ॥
तरी वरी खालीं मध्य जाण । ओत प्रोत संपूर्ण जाण ॥
अवघें चिन्मात्र आनंदघन । अद्वय निरंजन सर्वही ॥ २९ ॥
जळीं बुडाली जळगार । तीस आंतर बाह्य अवघें नीर ॥
स्वयें तें सलिल साचार । द्वैत विचार नसेची ॥ ३० ॥
कीं समुद्रीं पडलें सामुद्रिक । तें स्वयें सागर देख ॥
कीं भूमी सगट ऐक्य । न मेळवितां मिळाली ॥ ३१ ॥
कीं खग जाय ऊर्ध्व पंथें । त्यास खालीं आणि वरते ॥
आकाशावांचूनि रितें । अणुमात्र नसेचि ॥ ३२ ॥
मेदिनीवसनाचें पैल तीर । दृश्य जरी नव्हे समग्र ॥
परि अवघा एक साचार । सरितानाथ सत्य कीं ॥ ३३ ॥
तैसें वर खालीं मध्य संपूर्ण । अवघें चिन्मात्र निरंजन ॥
जेथें सच्चिदानंदघन । हाही संशय ओसरे ॥ ३४ ॥
एक कोरुनि धराधर । देउळें केलीं अपार ॥
आकृतीचे नाना विकार । परि अचल एकची ॥ ३५ ॥
लहरी कल्लोळ तरंग नाना विधी । परि अवघा एक जळनिधी ॥
कीं एकीं अनेक उपाधी । चंचळत्वपणें दीसति ॥ ३६ ॥
जैशा जळगारा विशाळ । अरण्यांत पडल्या पुष्कळ ॥
लेकरें आनंदोनि सकळ । खेळावया तेथें गेलीं ॥ ३७ ॥
कोणी म्हणती करूं भरती । कोणी पात्रामाजीं धरती ॥
शेवटीं जळाचि प्राशिती । निवाविती तृषेतें ॥ ३७ ॥
म्हणती जळ काय शीतळ । जैशी गारची केवळ ॥

तेथें जाणते बोलती सकळ । गार जळ एकची ।। ३९ ।।
एक म्हणती गारेचा गुण । एक बोलती शीतळ जीवन ।।
घट पृथ्वीअंश कठिण । एक ऐसे स्थापिती ।। ४० ।।
घट गार विरतां पूर्ण । कोठें पृथ्वीचें कठिणपण ।।
अवघें एक जीवन । रूपअभिधानें निराळीं ।। ४१ ।।
शेलीयाचे दोरे उकलुन । मागुती एकवट केले जाण ।।
तेथें पट हें अभिधान । सहज मग तें राहिलें ।। ४२ ।।
तैसें व्यापकत्व सार । उरलें अनाम निरंजन ।।
पूर्ण ब्रह्म सनातन । दुजें कांहीं दिसेना ।। ४३ ।।
ब्रह्मीं अन्यथा भास दिसत । त्याचें नांव दृश्य सत्य ।।
दोरावरी पादोदर भासत । भ्रमें करुनी तत्त्वतां ।। ४४ ।।
स्थाणू असतां चोर दिसत । कीं शुक्तिवरी रजत भासत ।।
कीं मृगजळनीर मिथ्याभूत । भ्रांति लागे सत्य गमे ।। ४५ ।।
तैसी निरसतां भ्रांति । मग सहजाचि वस्तुप्राप्ती ।।
यालागीं श्रीगुरुप्रती । शरण जावें अनन्य ।। ४६ ।।
प्रकाशला अर्क । मग कोण पुसे दीपक ।।
रत्नपरीक्षा करितां देख । गार देती भिरकाउनी ।। ४७ ।।
करितां सुधारस पान । मग इतर रस पुसे कोण ।।
प्राप्त होतां नृपासन । मग कोरान्न कासया ।। ४८ ।।
तैसें आचार्य कृपे तत्त्वतां । स्वरूप अंगे होतां ।।
मग दृश्यजाल पहातां । शोधितांही न सांपडे ।। ४९ ।।
क्रियेसहित ज्ञान शुद्ध । तोच म्हणजे विद्द ।।
त्याचा महिमा वेद । वर्णी स्वयें निजमुखें ।। ५० ।।
ऐसें दिव्य निरूपण । गार्गी आनंदली ऐकोन ।।
जनकाचें अंतःकरण । मन उन्मन जाहलें ।। ५१ ।।

प्रकरण १६ वें.

# जनकाला ब्रह्मविद्योपदेश.

नंतर राजा जनकानें याज्ञवल्क्याचा अद्‌भुत प्रभाव व सर्वोत्तम ब्रह्मनिष्ठा पाहून परम संतोषानें मधुपर्कपूर्वक पूजा करून व प्रार्थना करून याज्ञवल्क्यास म्हटलें, मला आपण ब्रह्मविद्येचा उपदेश करावा. मी आपला अनुग्रह घेऊं इच्छित आहे. याज्ञवल्क्यानें जनकाची विनंति मान्य केली. नंतर जनकानें याज्ञवल्क्यास उच्चासन दिलें व आपणहि जवळच कमी प्रतीच्या उच्चासनावर बसला. नंतर याज्ञवल्क्य जनकास ब्रह्मविद्येचा उपदेश करण्याचे हेतूनें म्हणाला "हे सम्राट् जनका, कोणी कोणी तुला कोण कोणती उपासना सांगितली हें मला खरेंच सांग म्हणजे मी तुला ज्ञानमार्ग सांगतों." जनक म्हणाला, "वाणीच ब्रह्म असें शैल ऋषींनीं, प्राणच ब्रह्म असें शौल्बायनांनीं, नेत्रच ब्रह्म असें वार्ष्णर्य ऋषींनीं, श्रोत्रच ब्रह्म असें भारद्वाजांनीं, मनच ब्रह्म असें जाबाल ऋषींनीं व शाकल्यांनीं तर हृदयच ब्रह्म असें सांगितलें आहे." "पण त्यांतील प्रत्येकाची प्रतिष्ठा व आयतन सांगितलें कां?" असा याज्ञवल्क्यानें उलट प्रश्न केला. नंतर त्यांतील प्रत्येक हा ब्रह्माचा एकदेश आहे असें म्हणून प्रत्येकाचें आयतन व प्रतिष्ठा सांगून वागादिकच ब्रह्म आहे अशी उपासना करावयास सांगितलें. प्रत्येक उपदेशानंतर जनक हस्तितुल्य वृषभानें युक्त सहस्रगायी दान करावयास तयार झाला, शेवटीं हा मी व हा विदेह देश तुझे आधीन आहेत, असेंहि म्हणाला. पण शिष्याला उपदेश करून कृतार्थ केल्यावांचून त्याच्या पासून कांहीं घेऊं नये असें माझे पित्याचें म्हणणें आहे, व माझेंहि तेंच व्रत आहे, असें म्हणून याज्ञवल्क्यानें त्यास नकार दिला.

वरील उपदेश व याज्ञवल्क्य मुनींचें निःस्पृहत्व पाहून जनकाचा ज्ञानाभिमान शिथिल झाला. तो आपल्या विशिष्ट आसनावरून उठून याज्ञवल्क्यास शरण गेला. तेव्हां त्या मुनीनें राजास दक्षिण नेत्रांतील इंध संज्ञक पुरुषाच्या 'इंद्र' या परोक्ष नांवाचा उल्लेख करून डाव्या नेत्रांतील पुरुष ही त्याची भोग्य पत्नी आहे अशी कल्पना दिली. त्यांचे हृदयस्थ आकाश हें समागमस्थान, लोहितपिंड, हें अन्न, हृदयांतील नाडीच्छिद्रांचें जाळें हें त्यांचें

आच्छादनीय वस्त्र, हृदयापासून वर जाणारी नाडी हा त्यांचा स्वप्नांतून जागरितांत जाण्याचा मार्ग, हिता नांवाच्या नाड्या हा सर्व शरीरांत अन्न जाण्याचा मार्ग, इत्यादि वर्णन करून त्या अवस्थेचा अभिमानी तैजस हा वैश्वानराहून अति सूक्ष्माहार आहे असें सांगितलें. नंतर एके प्रसंगीं याज्ञवल्क्य जनकाचे भेटीस गेला असतां त्यानें असा विचार केला कीं मी राजाला या वेळीं आणखी कांहीं ज्ञान सांगणार नाहीं. पूर्वीं एकदां जनक व याज्ञवल्क्य यांचा अग्निहोत्राच्या निमित्तानें संवाद झाला होता. तेव्हां जनकाच्या अग्निहोत्रविषयक ज्ञानानें संतुष्ट होऊन याज्ञवल्क्यानें त्याला वर दिला. त्या वेळीं जनकानें विचारलेल्या कोणत्याही प्रश्नाचें उत्तर मिळावें हाच वर मागितला. याज्ञवल्क्यानें तो त्याला दिला. त्या कामप्रश्नरूप वराच्या बळावर राजानेंच त्याला विचारलें, " हा देह कोणत्या ज्योतीच्या बळावर व्यवहार करितो ? " तेव्हां मुनीनें त्याला आदित्य, चंद्र, अग्नि इत्यादि बाह्य ज्योति क्रमानें सांगून व त्याची जिज्ञासा वाढवून शेवटीं स्वयंज्योतिस्वरूप आन्तर आत्मज्योतीचा उपदेश युक्तिपूर्वक केला. विज्ञानमय आत्मा स्वतः अकर्ता असला तरी बुद्धिरूप होऊन तिन्ही अवस्था [ जीवत्, स्वप्न, मरण ] व इहलोक परलोक यांतून संचार करितो. जीवदवस्थेंत तो शरीरेंद्रियांनीं युक्त होऊन मरणावस्थेंत तो शरीरेंद्रियांनीं रहित होतो. स्वप्नांत तो वासनामय शरीर व रथादि पदार्थ निर्माण करतो. तो स्वयंज्योति आत्मा येथें पुण्यफल व पापफल नुसतें पाहतो त्यांनीं लिप्त होत नाहीं. अनेक अवस्थांतून संचार करीत असतांनाहि तो त्यांत आसक्त होत नाहीं, या विषयीं दृष्टांत देऊन आत्म्याचें स्वरूप सविस्तर सांगितलें. शेवटीं वैराग्यासाठीं मरण दशेचेंही वर्णन केलें.

नंतर याज्ञवल्क्यानें मुमुक्षूच्या इंद्रियादिकांचा लय झाल्यावर त्याच्या हृदयाचा अग्रभाग प्रदीप्त कसा होतो, अंत्यमतीप्रमाणें आत्म्याचें शरीरांतून चक्षुरादिद्वारा उत्क्रमण कसें होतें, त्याचे बरोबर काय काय जातें इत्यादि सांगून या शरीरांत असतांनाच जीव दुसऱ्या शरीराचें भावनेनें ग्रहण कसें करितो या विषयीं तृणजळूचा दृष्टांत व दुसरें चांगलें नवें रूप ग्रहण करितो या विषयीं सोनाराचा दृष्टांत सांगितला. पुण्यवान् पुण्य शरीरी होतो व पापी हीन जन्म घेतो असें सांगून पुरुष काममयच आहे, तो जशी इच्छा

करतो तसा निश्चय करतो, निश्चयानुसार कर्म करतो व कर्मानुरूप फळ भोगतो. कामी पुरुषच या कर्मफळाच्या चक्रांत पडतो. जो अकाम, आत्मकाम, आप्तकाम असतो तो ब्रह्मच होतो; असें सांगून त्या विषयीं अनेक प्रमाणभूत श्लोकांचा याज्ञवल्क्यानें उपदेश केला. त्यास जनकानें वारंवार प्रश्न केल्यामुळें याज्ञवल्क्यानें आत्मज्ञानाचीं अनेक साधनें त्यास सांगितलीं. सर्व वेदांचा व कर्मांचा आत्मविविदिषेकडे विनियोग करावा असें सांगून "तोच महान् अज आत्मा अजर, अमर, अमृत, अभय ब्रह्म आहे. जो असें जाणतो तो अभय ब्रह्मच होतो." असा आत्मस्वरूपाचा उपसंहार केला आहे. अशा रीतीनें याज्ञवल्क्यानें राजा जनकाला सुंदर व सोपपत्तिक असें ब्रह्मविद्येचें बोधामृत पान करवून त्यास जीवन्मुक्त केलें. देहातीत आत्मज्ञानाचा लाभ झाल्यामुळें जनकाचें वैदेह हें देशवाचक नांव सार्थ झालें. नंतर याज्ञवल्क्य ऋषी राजा जनकाच्या प्रार्थनेवरून मिथिला नगरींतच आश्रम करून राहूं लागला.

येथेंही आम्हीं याज्ञवल्क्यानें जनकाला जो ब्रह्मविद्योपदेश केला त्याचें तात्पर्यच वर्णन केलें आहे. विशेष जिज्ञासूंनीं सदरील उपदेशाचा विस्तार बृहदारण्यक उपनिषद् अध्याय ४ व त्यावरील शंकराचार्यादिकांचें भाष्य वार्तिकें वगैरे ठिकाणीं पाहावा.



## प्रकरण १७ वें

# अनेक यज्ञांतील याजकत्व

मागील प्रकरणांत वर्णन केल्याप्रमाणें याज्ञवल्क्यानें जनकसभा जिंकून आपला कीर्तिध्वज अक्षय्यपणें या भूतलावर उभारून ठेविला आहे.

याज्ञवल्क्यानें जनस्थान ( नाशिक पंचवटी ) क्षेत्रांत जनकासह येऊन जनकाकडून अश्वमेध याग करविल्याचें वर्णन ब्रह्मपुराणांतर्गत श्री गोदावरी-माहात्म्य अध्याय १३-१७ व ३४ यामध्यें आलें आहे. तसेंच त्रिशंकु राजाला सदेह स्वर्गास पाठविण्याकरितां विश्वामित्रानें आरंभिलेल्या यज्ञांत याज्ञवल्क्य उद्गाता नांवाचा ऋत्विज होता असें स्कंदपुराण नागर खंड अ. ५ मध्यें आलें आहे. तसेंच महाभारत शांतिपर्व मोक्षधर्म अ. ४३ मध्यें याज्ञवल्क्यजनकसंवादांत याज्ञवल्क्य म्हणतो, "हे जनका, तुझ्या पित्यानें केलेल्या यज्ञांत माझ्या मातुलपक्षीय देवलऋषिबरोबर स्वस्ववेद व दक्षिणा यासंबंधीं भांडण सुरू असतां देवलाच्या संमतीनें मीं अर्धी दक्षिणा घेतली. या माझ्या करण्याला सुमंतु, पैल, जैमिनि यांनीं अनुमति दिली." असें वर्णन आलें आहे. आणि सभापर्वगत राजसूय यागोपक्रमांत धर्मराजानें केलेल्या राजसूययागांत वेदव्यासाकडे ब्रह्मत्व, धनंजयश्रेष्ठ सुसाम्याकडे औद्गातृत्व, वसुपुत्र पैल व धौम्यप्रभृतींकडे होत्र आणि ब्रह्मिष्ठ याज्ञवल्क्याकडे आध्वर्यव + होतें, असेंही वर्णन आलें आहे.

हें केवळ आम्हीं उदाहरणादाखल दोनचार उल्लेख उद्धृत केले आहेत. असे अनेक यज्ञ याज्ञवल्क्यानें करविल्याचे उल्लेख आर्षग्रंथांतून ठिकठिकाणीं आले आहेत. ते सर्व येथें विस्तारभयास्तव देणें शक्य नाहींत.



---

+ स्वयं ब्रह्मत्वमकरोत्तस्य सत्यवतीसुतः । धनंजयानामृषभः सुसामा सामगोऽभवत् ॥ याज्ञवल्क्यो बभूवाथ ब्रह्मिष्ठोऽध्वर्युसत्तमः । पैलो होता वसोः पुत्रो धौम्येण सहितोऽभवत् ॥ ३४ । ३५ ॥ इति ॥

प्रकरण १८ वें

# संन्यासाश्रम

पूर्वी वर्णन केल्याप्रमाणें याज्ञवल्क्यानें आपल्या दोन्ही भार्यांसह उत्तम प्रकारानें गृहस्थाश्रम व वानप्रस्थाश्रम संपादन करून, संन्यासाश्रम स्वीकारण्यास प्रवृत्त झाला. त्या वेळीं मैत्रेयी व कात्यायनी यांस बोलावून तो म्हणाला, "हे मैत्रेयी, मी या आश्रमापासून वरच्या आश्रमास जाण्याची इच्छा करीत आहे. यास्तव तुझी अनुमति विचारतों. दुसरें या कात्यायनी-बरोबर तुझा दायविभाग करून देतों." त्यावर मैत्रेयी ह्मणाली, "ज्यायोगें मुक्ति मिळत नाहीं, तें द्रव्य घेऊन काय करूं? मी मुक्त कशानें होईन तें मला द्यावें." स्वस्त्रीचें हें भाषण ऐकून योगीश्वर याज्ञवल्क्य संतुष्ट होऊन म्हणाला, "तूं प्रियभाषिणी आहेस.तर मी तुला ब्रह्मज्ञान सांगतों ऐक व त्याचाच निदिध्यास कर. पतिपुत्रादिकांपेक्षां आत्मा अत्यंत प्रिय आहे. पतिपुत्रादिकांवर जी प्रीति असते ती त्यांच्याकरितां नसून, आपल्या करितांच असते. अशीच गोष्ट ब्राह्मण, शरीर, पशु, देव व सर्व प्राणिजात यांविषयीं आहे. तरी आत्मा हा अभेद्य आहे हें निःसंशयपणें जाणण्यास हींच साधनें होत. हें सर्व आपणच आहोंत, अशी भावना केली म्हणजे सर्व कांहीं अनुभव तसाच येतो. या मृत्युसंकट आणणाऱ्या संसारापासून जो दूर रहातो व जो, सर्वात्मा विष्णु तो मीच आहे असें म्हणतो तो स्वतःच शिव होतो. ब्रह्मदेवापासून कृमि-कीटकादि क्षुद्र जीवजंतूपर्यंत सर्वत्र एकत्व आत्मा असा अनुभव आहे. त्याअर्थी सर्व कांहीं तूंच आहेस. शंख वाजविणाऱ्याचें चित्त शंख नादांत गुंगल्यामुळें त्याला जसा इतर बाह्य आवाज ऐकूं जात नाहीं; त्याच प्रमाणें ब्रह्मानंदीं मग्न झालेल्यास बाह्य ज्ञान होत नाहीं. ओल्या जळणाच्या वेळीं अग्नि व धूर वेगळे दिसतात, त्याचप्रमाणें आत्मा हा संकल्पयुक्त झाला म्हणजे त्याला हें जग भिन्न दिसूं लागतें. वाळलेलें सर्पण जळत असतां अग्नीशिवाय दुसरें कांहींच दिसत नाहीं. तसेंच आत्मा संकल्पातीत झाला असतां त्याला जग हें भिन्न दिसत नाहीं. समुद्र हा जलाचा आधार तसाच तुझा आत्मा सर्व जगाचा आधार होय. मीठ अंतर्बाह्य खारट असतें;

त्याप्रमाणें हे निष्पापे मैत्रेयि, सर्वत्र तूं आहेस. तुला हें जें द्वैत भसतें तें तुझ्याच कल्पनेमुळें; तीच कल्पना तूं जर टाकशील तर तो आनंदघन ईश्वर तूंच आहेस हें तुझें तुलाच कळून येईल. यास्तव हे कल्याणि, हृदयामध्यें सर्व संकल्पांचें निरोधन करून मीच ब्रह्म आहे अशी अखंड भावना कर. म्हणजे आयुष्य आहे तोंपर्यंत जीवन्मुक्तिदशा प्राप्त होईल व अंतीं परमब्रह्मस्वरूपीं कायमची मिळून जाशील. " अशा प्रकारें मैत्रेयीला आत्मबोध ❀ करून कात्यायिनीला गृहवित्तभूम्यादि सर्व दिलें. अशा रीतीनें दोनही भार्यास पुत्राच्या आश्रयास ठेवून आपण विद्वत्संन्यासविधीनें परमहंस दीक्षा घेतली.

तत्त्वज्ञानाचें रहस्य व त्याकरितां संन्यासाश्रमाची जरुरी यासंबंधीं भावना जागृत करून याज्ञवल्क्यानें संन्यासाश्रमाची परंपरा वृद्धिंगत केली. या दृष्टीनें याज्ञवल्क्यमुनि आद्य संन्याशी असून यतिवर्गाचे आद्य गुरु होत. याच अभिप्रायानें आदित्यपुराणस्थ याज्ञवल्क्यअष्टोत्तरशतनामस्तोत्रांत त्यांना ' संन्यासिनामादिमः ' असें संबोधिलें आहे. याज्ञवल्क्य हा आद्य संन्याशी होता, याला दुसरा प्रबळ पुरावा म्हणजे बृहदारण्यकाच्या मैत्रेयीब्राह्मणाच्या पहिल्या व दुसऱ्या मंत्रांतील " याज्ञवल्क्योऽन्यद् वृत्तमुपाकरिष्यन् " " उद्यास्यन्वा अरेऽहमस्मात्स्थानादस्मि " ह्या श्रुति होत. यावर अनुक्रमें शंकराचार्यांनीं पुढीलप्रमाणें भाष्य केलें आहे. " अथैवं सति ह किल याज्ञवल्क्योऽन्यत्पूर्वस्माद्गार्हस्थ्यलक्षणाद् वृत्तात्पारिव्रज्यलक्षणं वृत्तमुपाकरिष्यन्नुपाचिकीर्षुः सन् " " हे मैत्रेयीति ज्येष्ठां भार्यामामंत्रयामास । आमंत्र्य चोवाच ह उद्यास्यन्वा प्रव्रजिष्यन्वा पारिव्राज्यं करिष्यन्वा अरे मैत्रेय्यस्मात्स्थानाद्गार्हस्थ्यादहमस्मि भवामि । " कारण असा साक्षात् संन्यासाचा निर्देश श्रुतींत व दशोपनिषदांतहि फक्त हाच आहे. त्यावरून ही संन्यासदीक्षा याज्ञवल्क्यापासूनच प्रथम सुरू झाली असली पाहिजे हें

---

❀ येथेंही आम्ही तात्पर्य मात्र वर्णन केलें आहे. विशेष जिज्ञासूंनीं बृहदारण्यक उपनिषद् अध्याय ४ ब्राह्मण ५ व त्यावरील भाष्यें वार्तिकें वगैरे पहावींत.

उघड आहे. याज्ञवल्क्यानें संन्यासाश्रमद्वारा निवृत्तिमार्गाची उत्तम प्रकारें जोपासना करून व परतत्त्व अधिगत करून शेवटीं आपला देह या लोकीं ठेविला व स्वत: परब्रह्माचे स्वरूपीं विलीन झाला.

ब्रह्मभावप्राप्तीचा दिवस उपलब्ध व्हावा म्हणून बराच प्रयत्न केला परंतु तो मिळूं शकला नाहीं; असो. अत्यंत परिश्रमानें जमविलेलें यथाशक्ति यथामति विरोधाभास व विरोध यांचा होतां होईल तों परिहार करून वस्तुस्थितीला न सोडतां समन्वयपद्धतीनें लिहिलेलें वैदिक इतिहासांत क्रांति घडवून आणणारें असें हें अभूतपूर्व **श्री योगीश्वर याज्ञवल्क्याचें जीवनचरित्र** वाचकवर्गापुढें सादर करीत आहे.

त्यांतील सूक्तासूक्ताचा विचार करण्याचा अधिकार गुणैकदृष्टि व निर्मत्सर अशा विद्वज्जनांस आहेच. माझा हा अल्पसा व मराठी भाषेंत प्रथमच असलेला प्रयत्न अंशत: जरी त्यांच्या कृपेस पात्र झाला तरी मी एका मोठ्या ऋणांतून मुक्त झालों असें समजेन.



## प्रकरण १९ वें

# उपसंहार

याज्ञवल्क्य-चरित्रांत अनेक गुणांचा परिपोष असून, हें चरित्र अतिशय उदात्त व प्रवृत्ति निवृत्ति मार्गाला परस्पर प्रतिबंधक न होतां आपलें आयुष्य कसें सफल करावें याबद्दल सन्मार्ग दाखविणारें व स्वकर्तव्य-जागरूक पुरुषाला प्रतिक्षणीं उत्साह वाढवून सदुपदेश करणारें असें आहे.

जसे या चरित्रांत अनेक गुण दृष्टोत्पत्तीस येतात, तसेच बरबर अवलोकन करितां कांहीं दोषही दिसतात; व या दोषामुळें कांहीं लोकांकडून याज्ञवल्क्यावर भलतेच आक्षेप केले जातात. त्या सर्वांचा येथें थोडक्यांत विचार करण्याचें ठरविलें आहे.

याज्ञवल्क्य हा ब्रह्मदेवाचा किंवा सूर्यनारायणाचा अवतार आहे, व तो अयोनिज आहे; हें दर्शविण्यांतच याज्ञवल्क्याचें भावी आयुष्य देव-मनुष्याहून विलक्षण असून अपूर्व लोकोपकार करणारें असल्याचें सहजच दिग्दर्शित होतें. याज्ञवल्क्याचा अवतार होण्याला घडलेलें निमित्त म्हणजे सावित्री ही एक पत्नी असतांना ब्रह्मदेवानें पुन्हां गायत्रीशीं विवाह केला. तें पाहून सावित्रीनें ब्रह्मदेवाला शाप दिला. कारण त्यास एक पत्नी असतांना त्यानें दुसरी पत्नी केली. ह्याविषयीं विचार करितां जरी पुरुषास अनेक विवाह करण्याची अनुज्ञा आहे, तरी त्यांनीं योग्य कारणाशिवाय एक पत्नी विद्यमान असतांना दुसरा विवाह करूं नये असा सिद्धांत निघतो.

याज्ञवल्क्याच्या पूर्ववंशाचा विचार केला तर पुढीलप्रमाणें दिसतें. विश्वामित्राच्या पूर्वींचे सर्व पुरुष क्षत्रिय होते व नंतरचे सर्व पुरुष ब्राह्मण होते. ह्या क्षत्रिय कुलाचें रूपांतर ब्राह्मण कुलांत करण्याकरितां ह्या वंशांतील कुशिकराजानें ब्राह्मण्यप्राप्तीसाठीं तपश्चर्या केली व च्यवनभार्गवमुनीची एकनिष्ठपणें सेवा केली. तेव्हां मुनि त्यास म्हणाले, “ तुझा नातू तुला ब्राह्मण्य प्राप्त करून देईल. ” तदनंतर कुशिकपुत्र गाधी, यानेंही ब्राह्मण्यप्राप्तीसाठीं तपश्चर्या केली. त्यास संतान नव्हतें, तसेंच त्याची कन्या ऋचीक ऋषीची पत्नी सत्यवती हिलाही संतान नव्हतें. त्यामुळें सत्यवतीनें आपल्या पतीची

प्रार्थना केली कीं, " मला व माझ्या मातेला पुत्रप्राप्ती होण्यासाठीं आपण एखादें अनुष्ठान करावें. भार्येच्या प्रार्थनेवरून भृगुकुलदीपक ऋचीक ऋषीनें भार्येकरितां व सासूकरितां असे दोन चरू अनुक्रमें ब्राह्म व क्षात्र मंत्रांनीं अभिमंत्रित करून, पुत्रकामेष्टि विधीनें स्थापन केले. परंतु भक्षणकाळीं दैववशांत ते चरु मायलेकींनीं उलटपालट करून भक्षण केले.

त्यामुळें उपरोक्त क्षत्रियकुलांत ब्राह्मबीज व ब्राह्मणकुलांत क्षात्रबीज प्रस्थापित झालें. गर्भांतच त्या ब्राह्मबीजावर आणखी ब्राह्ममंत्रप्रयुक्त ब्राह्म-संस्कार होऊन गाधिपुत्र विश्वामित्र जन्मास आला. ही कथा महाभारत शांतिपर्व अ. ४९ व अनुशासनपर्व अ. ५५ । ५६ यांत वर्णन केलेली आहे.

गर्भस्थ बीजाश्रित ब्राह्मसंस्कारांनीं अनुकूल निमित्त पाहून उठावणी करतांच विश्वामित्राला ब्राह्मण होण्याची तीव्र इच्छा उत्पन्न होऊन त्यानें त्यासाठीं अत्यंत उग्र तपश्चर्या केली. त्या तपश्चर्येच्या प्रभावानें स्वतः ब्राह्मणत्व व ब्रह्मऋषित्व प्राप्त करून त्यानें पिता व पितामह यांची इच्छा सफल केली.

तेव्हांपासून हा वंश ब्राह्मणकुलांत गणला गेला. पुढें अंगिरा-कुलोत्पन्न शुनःशेप हा जन्मकथा प्रकरणांत वर्णन केल्याप्रमाणें देवरात हें नांव धारण करून विश्वामित्राचा स्वयंदत्त पुत्र झाला. त्याजपासून चवथ्या पिढीला याज्ञवल्क्य जन्मास आला; व तो त्याचा जन्मही अयोनिज असाच झाला. याप्रमाणें हें कुल उत्तरोत्तर जात्युत्कर्षाच्या नियमानुसार क्षात्र क्षेत्रबीजापासून आलिप्त होऊन ब्राह्म बीजक्षेत्राच्या पूर्ण उत्कर्षाला गेलें.

यावरून याज्ञवल्क्य हे क्षत्रियकुलोत्पन्न आहेत, अशी शंका उद्भ-वण्याचें कारण नाहीं. तसेंच एकाच 'जन्मांत वर्ण बदलूं शकत नाहीं— +चातु-र्वर्ण्य जन्मसिद्ध, आहे ' हे धर्मशास्त्राचे सिद्धांत बरोबर नाहींत, इत्यादि शंकाही उद्भवूं शकत नाहींत. सदरील धर्मशास्त्राचे सिद्धांत श्रुतिस्मृतिसिद्ध असून तो ह्या वंशसंक्रमणानें मुळींच व्यभिचारित होत नाहींस. चातुर्वर्ण्यांत पूर्वी अनुलोमविवाह होत असत. परंतु हल्लीं ते कलिवर्ज्य प्रकरणानें वर्ज्य केले

---

+ न ब्राह्मण्यं क्षत्रियाद्यैस्तपःकोट्याऽपि लभ्यते ।
विश्वामित्रस्य तत्प्राप्तिर्मात्रा ब्रह्मौदनाशनात् ॥

हे धर्मशास्त्रज्ञांस विदितच आहे. हें निराळें अधिक विस्तारानें सांगावयास पाहिजे असें नाहीं.

याज्ञवल्क्यानें गुरूची आज्ञा उल्लंघन करून अधीत केलेले वेद टाकून देऊन गुरूचा द्रोह केला असा कोणी याज्ञवल्क्याचे माथीं दोषारोप लादतात. वस्तुतः यांत कांहींच दोष नाहीं. आनर्त राजाचे घरीं जाण्याबद्दलची गुर्वाज्ञा याज्ञवल्क्यानें गुरूशीं द्रोह करावा म्हणून मोडली नसून ती अन्यायमूलक असल्यामुळें मोडली. गुरुशिष्याचें नातें स्वामिभृत्यासारखें नसून, फार उत्कृष्ट दर्जाचें असें आहे. गुरूनें शिष्यास आज्ञा करतेवेळीं कार्याकार्यांचा विचार अवश्य करून गुरुशिष्यसंबंधास कोणतेहीप्रकारें बाध येणार नाहीं अशी दक्षता बाळगूनच आज्ञा करावयास पाहिजे. याज्ञवल्क्यास गुरुद्रोहच कर्तव्य असता तर सूर्यापासून वेद मिळाविल्यानंतर पुन्हां परत येऊन शाकल्यप्रभृतींस गुरुदक्षिणा मागण्याकारितां त्यानें विनविलें नसतें. याज्ञवल्क्यानें शाकल्य व वैशंपायन यांचे जवळील ग्रहण केलेले वेद टाकिले ते गुरूशीं द्रोह करावा म्हणून टाकिले नसून क्रुद्ध झालेले गुरु, आपण या वेळीं वेद न टाकिले तर शाप देऊन भस्मसात् करतील, या भीतीनें टाकिले. आत्मसंरक्षणाकरितां केलेली ही गोष्ट बावगी केली असें कोणीही सूज्ञ म्हणणार नाहीं. उलट गुरूच्या वजनाला न बळी पडतां आपल्यावर कसलीही आपत्ति कोसळली तरी ती सहन करण्यास तयार राहून अपमानास्पद कार्य करण्याविषयीं अन्यायमूलक अशी गुर्वाज्ञा उल्लंघन करून स्वतःचें शुद्ध व सात्विक मनोधैर्य, अंतःकरणाची गंभीर वृत्ति व स्वाभिमानाची कार्यक्षमता ही प्रगट केली, याबद्दल कोणीही कौतुकच करील. वैशंपायनाचे बाबतींत तर याज्ञवल्क्यानें गुरूच्या हातून घडलेल्या दोषांचें प्रायश्चित्त करण्याची जबाबदारी स्वखुषीनें आपल्या शिरावर घेऊन अंतःकरणांत असलेली निस्सीम गुरुभक्ति प्रगट केली. तसेंच इतर सहाध्यायांविषयीं त्यानें प्रेमपूर्ण स्नेह प्रगट केला. पण दुर्दैवानें वैशंपायनांनीं त्याचा विपर्यास करून भलताच मनोग्रह करून घेतला व शाप देण्यास प्रवृत्त झाले. इतर सहाध्यायांचा अपमान करावा किंवा गुरूचा अनादर करावा असा याज्ञवल्क्याचा मुळींच हेतु नव्हता. परंतु येथेंही दैवानें याज्ञवल्क्याची पाठ पुरविली व पूर्ववत् वेदपरित्यागाचा प्रसंग प्राप्त झाला.

आतां मानुष गुरु करणार नाहीं ह्या प्रतिज्ञेनें याज्ञवल्क्यानें

सूर्याची आराधना करून चारी वेद मिळविले. त्यांत त्याच्या मनाची निश्चयवृत्ति व प्रतिज्ञात अर्थ पूर्ण करण्याविषयीं दीर्घ प्रयत्न ह्या गोष्टी दिसून येतात. तसेंच चारही वेदांच्या शिष्यप्रशिष्यद्वारा अनेक शाखा निर्माण करून त्यांची सुसंघटित व्यवस्था लावणें इत्यादि गोष्टींमुळें त्याची उद्यमप्रियता व कार्य करण्याविषयीं नैपुण्य दिसून येतें. याज्ञवल्क्याच्या शिष्यप्रशिष्यपरंपरेमध्यें व्यासासारखे व कण्वासारखे महामुनिही येऊन दाखल झाले. त्यामुळें मूळचाच उज्ज्वल असलेला याज्ञवल्क्याचा महिमा अधिक प्रकाशित झाला.

याज्ञवल्क्याच्या ह्या शाखाप्रणयनावरून हल्लीं प्रचलित भिन्नशाखीय विवाहाच्या प्रश्नावर बराच प्रकाश पडतो. याज्ञवल्क्याच्या पूर्वींची वेदपरंपरा ब्रह्म संप्रदाय ह्या नांवानें ओळखली जाते. दानही संप्रदायांत कमी अधिक प्रमाणानें चारही वेदांच्या शाखा विद्यमान आहेत. त्यांचींही कल्पसूत्रें, गृह्यसूत्रें व धर्मसूत्रें निरनिराळीं आहेत. अर्थातच त्यांचें कर्म, उपासना व ज्ञान ह्या तीनही कांडांत दोन्ही संप्रदायांच्या दृष्टीनें महदंतर आहे.

उदाहरणाकरितां खालील दोनचार ठळक गोष्टी नमूद करितों.

ब्रह्मसंप्रदायांत शुक्ल १ चे दिवशीं चंद्रदर्शनीं दर्शयाग केला असतां महान् अभ्युदय सांगितला आहे, तर आदित्यपरंपरेंत चंद्रदर्शनीं याग केला असतां प्रायश्चित्तेष्टि + सांगितली आहे. ब्रह्मसंप्रदायांत ‘ अन्नं ब्रह्मेत्युपासीत ॥ ’ ‘ मनो ब्रह्मेत्युपासीत ॥ ’ इत्यादि अव्यक्त पण स्थूल उपासना सांगितल्या तर आदित्यसंप्रदायांत ‘ खं ब्रह्म ’ ‘ अंतर्यामिपुरुष ’ ‘ अक्षिपुरुष ’ इत्यादि अव्यक्त पण सूक्ष्म स्वरूपाच्या उपासना सांगितल्या. ब्रह्मसंप्रदायांत सोमप्रधान ( सोम म्हणजे नक्षत्रपति चंद्रमा व सोमवल्ली ) तत्त्वज्ञान सांगितलें आहे, तर आदित्यसंप्रदायांत सूर्यप्रधान तत्त्वज्ञान प्रतिपादन केलें आहे. ह्या तारतम्यामुळें ब्रह्मसंप्रदाय व आदित्यसंप्रदाय हे परस्पर विलक्षण असे आहेत. आपआपला संप्रदाय अविच्छिन्नपणें जसाचा तसाच कायम रहावा ह्मणून परस्पर संप्रदायांत विवाहसंबंध घडूं नयेत, असा निर्बंध त्या वेळीं ऋषिमंडळींनीं

---

+ यजनीयेऽह्नि सोमश्चेद्वारुण्यां दिशि दृश्यते ।
प्रायश्चित्तेष्टिं निर्वपेत्तत्र दण्डं दद्याद् द्विजातये ॥

ब्राह्मण्य निःसंशय सिद्ध आहे, तर त्यांच्याशीं आज अन्नोदकव्यवहार करण्यास काय हरकत आहे. परंतु या प्रश्नाचें उत्तर त्या प्रश्नांतच आहे. ज्याप्रमाणें कण्व–माध्यंदिनशाखीयांनीं आपआपली शाखा म्हणजे संहिता व ब्राह्मण आजतागायत अध्ययन अध्यापनादि परंपरेनें अविच्छिन्नपणें संरक्षिली त्याप्रमाणें इतर शाखीयांनीं आपापल्या शाखेच्या संहिता व ब्राह्मण कायम ठेविले नाहींत. केवळ नाममात्र शाखांचें संरक्षण केलें. त्यामुळें त्या त्या शाखांचे आज संहिता व ब्राह्मण उपलब्ध नसल्यानें त्या त्या शाखा वेदविरहित झाल्या व याच कारणामुळें त्यांच्याशीं अन्नोदकव्यवहाराचा संबंध समाजानें ठेविला नसावा, असें यावरून आमचें मत होत आहे.

हा प्रश्न सोडाविणें असल्यास तो त्या त्या शाखेची संहिता व ब्राह्मण उपलब्ध करून सोडविणेंच श्रेयस्कर होय. शुक्लयजुर्वेदांतर्गत १५ शाखांपैकीं १३ शाखांच्या संहिता व ब्राह्मण आज उपलब्ध नाहींत, पण उपलब्ध करण्याचा प्रयत्न केला असतां उपलब्ध होऊं शकतील अशी आमची खात्री आहे. कारणः—

द्वे सहस्रे शतन्यूने मंत्रे वाजसनेयके ।
ऋग्गणः परिसंख्यातः शेषमन्यद्यजुः स्मृतम् ॥
एतच्चतुर्गुणं ब्राह्मणम् ॥

या प्रतिज्ञापरिशिष्टावरून एकंदर शुक्लयजुर्वेदाच्या १५ शाखा मिळून संहिताग्रंथांत ऋङ्मंत्र म्हणजे ज्यांचीं अक्षरें, पाद व अवसान, नियत आहेत असे छंदोबद्ध मंत्र १९०० आहेत, यजुर्मंत्र म्हणजे ज्यांचीं अक्षरें, पाद व अवसान हीं अनिश्चित आहेत असे वाक्यसदृश गद्यात्मक मंत्र ८८८० व ८ अक्षरें आहेत. ही संख्या शु. य. वेदांतील आज उपलब्ध असलेल्या कण्व व माध्यंदिन यांच्या संहिता व ब्राह्मणावरून व कात्यायनानें केलेल्या श्रौत-सूत्र, गृह्यसूत्र, हौत्रसूत्र, श्राद्धसूत्र प्रातिशाख्य व इतर परिशिष्टें इत्यादि सूत्रग्रंथांवरून निवडली असतां पूर्ण होऊं शकते. ती तशी निवडली आहे. त्या त्या शाखेच्या संहितेची आनुपूर्वी बसविण्यालाही हेंच प्रतिज्ञापरिशिष्ट व पितृभूत्यादि भाष्यग्रंथ फारच उपयोगी पडतील. हा प्रयत्न होणें अत्यंत इष्ट असल्यानें द्रव्यसहाय्य होत गेल्यास वैदिक विद्याभिलाषी विद्वज्जन हा प्रयत्न सहज करूं शकतील व त्या बरोबरच अंतर्गत अवांतर शाखेच्या अन्नो-

दकव्यवहाराचा प्रश्न आपोआपच याच अंशानें मोकळा होईल असें आम्हांस वाटतें.

याज्ञवल्क्यास ज्या कांहीं पुत्ररत्नांचा लाभ झाला त्यांपैकीं कात्यायनानें आपल्या पित्याचें अवशिष्ट राहिलेलें आदित्य संप्रदायाच्या प्रतिष्ठेचें कार्य आपल्या शिरावर घेऊन अनेक ग्रंथसंपत्ति निर्माण केली व अनेक शिष्य प्रशिष्यद्वारा तिचा विस्तार करून अंगीकृत जबाबदारी पार पाडली व तिच्या द्वारा स्वतः देव-ऋषि-पितृऋणांतून मुक्त होऊन आम्हां सर्व अनुयायांस मात्र अत्यंत ऋणी करून ठेविलें आहे. तात्पर्य याज्ञवल्क्यानें आदित्य संप्रदायाची प्रवृत्ति सुरू केली खरी परंतु त्याची प्रतिष्ठा कात्यायनानेंच " यावच्चंद्रदिवाकरौ " करून ठेविली यांत मुळींच संशय नाहीं.

जनकाच्या सभेंतील वृत्तांतावरून याज्ञवल्क्याचें सर्ववादिमूर्धन्यत्व, अनूचानतमत्व, वाक्पटुता, विषयप्रतिपादनशैली, निर्भयवृत्ति, वगैरे गुण दिसून येतात. अनेक ऋषींनीं "तूंच काय आमचे मध्यें एकटा ब्रह्मनिष्ठ आहेस होय!" असा एकच कोलाहल केला असतां " आम्ही गोकाम आहोंत, म्हणून गाई नेत आहोंत. ब्रम्हनिष्ठ म्हणून नव्हे " ह्या दिलेल्या उत्तरावरून ब्रह्मनिष्ठतेबरोबर विनयही दिसून येतो. तसेंच विदग्ध शाकल्यानें वीस वेळां केलेल्या निंदेच्या प्रसंगावरून सहिष्णुता, शेवटीं जनकासारख्या मुमुक्षूस केलेल्या अध्यात्मविद्येच्या उपदेशावरून श्रेष्ठ प्रतीचें गुरुत्व, जनकाकडून अनेक यज्ञ करविल्याचे कथानकावरून यज्ञविद्यादि अनेक विद्यांचें आचार्यत्व इत्यादि बहुमोल सद्गुणांची प्रभावलि याज्ञवल्क्याचे शिरावर विराजत होती असें दिसून येतें.

याज्ञवल्क्य हा केवळ त्रयीविद्येंत व अध्यात्मविद्येंतच आचार्य व प्रवर्तक होता, असें नव्हे तर तो व्यवहारशास्त्र, राज्यतंत्र, दंडनीति, योगशास्त्र वगैरे लौकिक समाजहितसंवर्धक विद्यांतही अत्यंत निपुण असून, त्यांच्या पुरस्कर्त्यांपैकीं अग्रेसर असा होता, हें त्याच्या स्मृतिग्रंथावरून स्पष्ट प्रत्ययास येतें.

याज्ञवल्क्यानें जसें आपलें सर्व आयुष्य वेदपुरुषाच्या सेवेंत व भगवदाराधनेंत खर्ची घातलें तसा प्रपंचही अत्यंत दक्षपणानें अनासक्तीनें व गृहस्थपणाला उचित अशा गुणशाली कर्तृत्वानें केला आहे, याची साक्ष

याज्ञवल्क्यानें संन्यास घेते वेळीं मैत्रेयी व कात्यायनी यांच्यामध्यें करून दिलेली वांटणी ही एकच गोष्ट देत आहे.

याज्ञवल्क्यानें जसा प्रवृत्तिमार्ग आचरिला व त्या आचरणाचे नियम घालून दिले, तसेच निवृत्तिमार्गांतही मैत्रेयी व जनक प्रभृतींना उपनिषदर्थाचें रहस्य समजावून देण्याच्या मिषानें तद्विषयक अनेक शास्त्रें निर्माण केलीं. संन्यासदीक्षा स्वीकारून यतिवर्गाचें आद्य गुरुत्व मिळविलें. निवृत्तिमार्ग व त्याचे नियम हे जरी पुरातन असले, तथापि त्यांच्या प्रवृत्तीचा जनक याज्ञवल्क्यच आहे. याज्ञवल्क्यानें आपल्या अनुयायांस प्रवृत्ति निवृत्ति हीं धर्माचीं दोनही अंगें परस्परांना बाधक न होतां पोषकच होऊन इहपरत्र सर्वांगीण आत्मोन्नति साधून देण्यास कशीं उपयुक्त आहेत, हें आपल्या आचरणानें पटवून दिल्याचें दिसून येतें.

स्त्रीवर्गात एक सद्योवधू म्हणजे गृहकृत्य करण्याला अत्यंत पटु अर्थात् गृहिणी हें नांव सार्थ करणारी स्त्री व दुसरी ब्रह्मवादिनी म्हणजे परहितास कोणतेही प्रकारें बाध न आणतां स्वहित साधणारी व ब्रह्मविद्यानिरत असणारी स्त्री असे दोन प्रकार आहेत. पैकीं याज्ञवल्क्याची ज्येष्ठ भार्या मैत्रेयी ही ब्रह्मवादिनी होती हें बृहदारण्यकांतील मैत्रेयीब्राह्मणावरून स्पष्ट दिसून येईल. याज्ञवल्क्य हा मूर्तिमंत धर्म व त्याच्या प्रवृत्ति निवृत्ति म्हणजे कात्यायनी व मैत्रेयी ह्या होत. कात्यायनीच्या धर्मपत्नीत्वामुळें प्रवृत्तिमार्ग व मैत्रेयीच्या धर्मपत्नीत्वामुळें निवृत्तिमार्ग हे याज्ञवल्क्यास करतलामलकवत् झाले असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं.

सारांश आमूलाग्र याज्ञवल्क्य-चरित्र अवलोकन केलें असतां जे गुण म्हणून दिसून येतात ते स्वभावतःच गुण असून याज्ञवल्क्याच्या आश्रयानें गुणोत्तम ठरले आहेत, हें कोणासही नाकबूल करतां येणार नाहीं. जगांत आधिभौतिक व आधिदैविक सृष्टिव्यवस्थेची अवनति झाल्यास म्हणजे परस्पर पोषक असण्याऐवजीं विनाशक स्वरूपांत न्यूनाधिक होऊं लागल्यास, लोकोत्तर विभूति म्हणून ईश्वराचे दैवी विष्ण्वादि अवतार होत असतात. तसेंच आध्यात्मिक व आधियाज्ञिक या दोन संस्कृतींची तशीच दुरवस्था झाल्यास ऋषितहश ब्रह्मा, शिव प्रभृति देव ऋषिरूपानें अवतीर्ण होत असतात. त्यांच्या चरित्रांतील सर्वसामान्य अपवाद नसलेलें कर्तव्य मात्र जरूर आचरणांत

आणावयास पाहिजे. तैत्तिरीय उपनिषदांत शिक्षावल्लींत गुरूंनीं शिष्याला उपदेश करते वेळीं " आमचे जे गुण असतील तेच तूं आचरण करावे. कर्तव्याच्या कक्षेबाहेरील गोष्टींचें अनुकरण करूं नये. † " अशी स्पष्ट आज्ञा केली आहे. या श्रुतीला अनुसरूनच ' न देवचरितं चरेत् । न ऋषिचरितं चरेत् ॥ ' हे न्याय प्रवृत्त झाले आहेत. तात्पर्य— याज्ञवल्क्यचारित्रानें त्या काळांत तात्त्विक व सांस्कृतिक चिरस्थायित्व घडवून आणलें आहे; त्याचे परिणाम सृष्टीच्या अंतापर्यंत टिकणारे असल्यानें हें चरित्र आपणांस पावलों-पावलीं उद्बोधक होणारें आहे, असें वाटल्यावरून यथामति लिहून याज्ञवल्क्य-भक्तांस सप्रेम सादर केलें आहे.

**पूर्वार्ध समाप्त.**



† यान्यनवद्यानि कर्माणि । तानि सेवितव्यानि । नो इतराणि यान्यस्माकं सुचरितानि । तानि त्वयोपास्यानि । नो इतराणि ।

# वै. ति. पं. अण्णाशास्त्री वारे यांचीं

## प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें

१ शुक्लयजुःशाखीय कर्मकांडप्रदीप. २ आषाढोद्वाहनिर्णय

## प्रसिद्ध होणारीं पुस्तकें

१ शांतिकांडप्रदीप
२ गृह्यकर्मकांडप्रदीप
३ श्रौतकर्मकांडप्रदीप
४ पर्वनिर्णयप्रदीप
५ प्रतिष्ठासरणि
६ शतचंडीसहस्रचंडीपद्धति
७ राज्याभिषेकपद्धति
८ यज्ञपार्श्वपरिशिष्टव्याख्या
९प्रातिज्ञाप्रसवोत्थानपरिशिष्टव्याख्या
१० आर्षानार्ष सूत्रविवेक
११ गोत्रप्रवरनिर्णयप्रदीपिका आपदेवीयव्याख्या

# पं. श्रीधरशास्त्री वारे यांचीं

## प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें

१ दत्तकानिर्णयामृतम्
२ कुंडार्क सुप्रभा
३ ब्रह्मकर्मप्रदीप भाग १ ला
४ ब्रह्मकर्मप्रदीप भाग २ रा

## प्रसिद्ध होणारीं पुस्तकें

१ ब्रह्मकर्मप्रदीप भाग ३ । ४ । ५
२ सूत्रोक्त पद्धति
३ वृत्तचंद्र
४ छंदोमंजरी चंद्रिकाटीका
५ कातीय परिभाषाध्याय अधिकरणार्थदर्शिनी
६ धर्मशास्त्रीय प्रवचनमाला
७ याज्ञवल्क्यशिक्षा भाषांतर

# ब्रह्म संप्रदाय [परंपरा] द्योतक वंशपट. ×




---

×या वंश पटांत एक पुत्रवंश व दुसरा विद्यावंश, या दोन अनुक्रमानें शाखाप्रवर्तन झालें आहे.

† ब्रह्मापासून व्यासापर्यंत पुत्रपरंपरेनें शाखा प्रवृत्ति झाली आहे.

‡ हे पैलादि चार ऋषि व्यासाचे शिष्य असून यांचे पासून पुढें शिष्यपरंपरेनें शाखा-प्रवृत्ति झाली आहे.

# ब्रह्मसंप्रदाय ऋग्वेद वंशपट




---

१ * ह्या चिन्हांनीं अंकित शाखा आदित्य संप्रदायांतील आहे.

२ बाकीच्या चिन्हरहित शाखा ब्रह्मसंप्रदायांतील होत असें समजावें.

# ब्रह्मसंप्रदायगत कृष्णयजुर्वेद शाखापट

१ वैशंपायन
२ लौहित्य
३ शावध
४ पलांडु
५ आलंबि
६ कलिंग (फल्ट)
७ कमलाद
८ ऋचाभ
९ आरुणि
१० तंडी
११ श्यामायन
१२ कठ
१३ कलाप
१४ चुलभि
१५ सुमति
१६ देववर
१७ अनुकृष्ण
१८ आयु
१९ अनुभूमि
२० अप्रीत
२१ कृशाश्व
२२ सुमूलि
२३ बाष्कलि
२४ शुक
२५ लौकि
२६ भूरिश्रवा
२७ सोमावि
२८ आतुनांतक्य
२९ धौम्य
३० काश्यप
३१ औख्य
३२ हलक
३३ उपमन्यु

३४ विद्
३५ भार्गव
३६ मधुक
३७ पिंग
३८ श्वेतकेतु
३९ प्रजादर्प
४० कहोड
४१ याज्ञवल्क्य
४२ शौनक
४३ आनंग
४४ उनिर
४५ ताल
४६ यास्क (पैंगि)
४७ खांडायन कंठांतेवासी
४८ पिंजुलकठ क्रौंचद्वीपे
४९ औदलकठ शाकद्वीपे
५० सपिच्छवकठ ,,
५१ मुद्गलकठ काश्मीरदेशे
५२ शृंगलकठ सृजदेशे
५३ सौभरकठ सिंहलदेशे
५४ भौरसकठ कुशद्वीपे
५५ चुचुककठ यवनदेशे
५६ योगकठ ,,
५७ हापिलकठ ,,
५८ दौसलकठ सिंगलदेशे
५९ धौषकठ क्रौंचद्वीपे
६० जृंभककठ श्वेतद्वीपे

४८–६० इति त्रयोदश कठाः वेदवृक्षपटे ।

६१ चरक
६२ आव्हरक
६३ भ्राजिष्ठवकठ
भृष्टकपिष्ठलकठ
६४ प्राच्यकठ
६५ कापिष्ठलकठ
६६ वारायण
६७ चारायण
६८ श्वेत
६९ श्वेताश्वतर
उपमन्यु
७० पातांडि
७१ मैत्रेय

६१ – ७१ इति चरणव्यूहे द्वादशभेदाः ।

७२ मनु
७३ वराह
७४ दुंदुभि
७५ एकि
७६ हरिद्रु
७७ श्याम
श्यामायन

७२ — ७७ इति मैत्रायणीयानां सप्तभेदाः ।

७८ हारिद्रुण
७९ छगलि
८० तुंबुरु
८१ उलुपि

७८-८१ इति कलापानां चर
पातञ्जलमहाभाष्ये तत्त्वबोधि

८२ आसुरि
८३ गर्ग
८४ शार्कराक्ष
८५ मृग
८६ वसव

८२ – ८६ इति हा
पंचभेदाः चरणव्यूहे ।

# ब्रह्मसंप्रदायगत अथर्ववेद शाखा

## वंशपट

सुमन्तुः
- कबन्धः
  - पथ्यः
    - ||जाजलिः
    - ||कुमुदादिः
    - ||शौनकः
      - ||बभ्रुः
      - ||सैंधवायनः
        - || मुंजकेशः +
  - वेदस्पर्शः
    - मोदः
    - ब्रह्मबलः
    - पिप्पलादः
    - शौकायनि-स्तपनः

---

१ || हें चिह्न ज्यांच्या नांवापुढें आहे त्या शाखा आदित्यसंप्रदाय-गत समजाव्या.

इतर शाखा ब्रह्मसंप्रदायगत आहेत असें समजावें,

+ मुंजकेशाची संहिता दोन प्रकारची; १ संहिता २ नक्षत्रकल्पः, वैतानकल्पः, अंगिराकल्पः, शांतिकल्पः.

# आदित्य संप्रदाय [ परंपरा ] द्योतक

## वंशपट.






# आदित्य संप्रदायगत शुक्ल यजुर्वेद पंचदश शाखा
## वंशपट

| | |
|---|---|
| योगीश्वर याज्ञवल्क्य | |
| १ जाबालः | १ हल्लीं नार्मद ह्या नावांनें मध्यप्रान्त व वऱ्हाड मध्यें प्रसिद्ध आहेत. |
| २ बौधेयः | २ रणावट ह्या नावांनें खानदेशांत व औदिच्य व गुर्जर ह्या नावांनीं गुजराथेंत प्रसिद्ध आहेत. |
| * ३ कण्वः | ३ कर्णावट ह्या नांवानें कोठें कोठें प्रसिद्ध आहेत. |
| ४ माध्यंदिनः | ४ उत्तरहिंदुस्थानांत शरयूपारी ह्या नांवानें प्रसिद्ध आहेत. |
| ५ शापेयः | ५ नागर ह्या नावांनें सर्वत्र प्रसिद्ध आहेत. |
| ६ तापायनीयः | ६ नारमदेव ह्या नांवानें माळवा व नेमाड मध्यें प्रसिद्ध आहेत. |
| ७ कपोलः | ७ भृगु गौड, भगोरा, भार्गव म्हणून सर्वत्र प्रसिद्ध आहेत. |
| * ८ पौंड्रवत्सः | ८ त्रिवाडी मेवाडा, भट मेवाडा वगैरे नावांनीं प्रसिद्ध आहेत. |
| ९ आवटिकः | ९ श्रीगौड माळवी म्हणून प्रसिद्ध आहेत. |
| १० परमावटिकः | १० आदिगौड म्हणून प्रसिद्ध आहेत. |
| ११ पाराशरः | ११ गुजराथेंत पाराशर म्हणून प्रसिद्ध आहेत. |
| * १२ वैनधेयः | १२ बौध्य पर्वत देशांत कंकर ह्या नांवानें प्रसिद्ध आहेत. |
| १३ गालवः | १३ वऱ्हाड, गुजराथ व मध्यप्रांतामध्यें माळवी म्हणून प्रसिद्ध आहेत. |
| १४ कात्यायनः | १४ महाराष्ट्र, नर्मदा संगमाजवळ, वऱ्हाड व मध्यप्रांत ह्या देशांत कास्त नांवानें ओळखले जातात. |
| १५ वैजवापः | १५ नारायण सरोवराकडे याच नांवानें प्रसिद्ध आहेत. |

---

* हें चिह्न ज्यांच्या अगोदर आहे त्या शाखा कण्व समाम्नायांतील समजाव्या. चिह्नरहित शाखा माध्यंदिन समाम्नायांतील समजाव्या.

# आदित्य संप्रदायगत सामवेदशाखा× वंशपट




---

* सामश्रवा व कुथुमी ह्या व्यक्ति दोन नसून एकच आहेत. सामश्रवा ह्या नांवाचा उल्लेख बृहदारण्यक उपनिषदांत आहे. कुथुमी नांवाचा उल्लेख व कांहीं थोडासा कथाभाग स्कंदपुराण नागरखंडांत आला आहे.

× यांतील देखील बऱ्याच शाखा आज उपलब्ध नाहींत.

## आदित्य संप्रदायगत अथर्ववेद शाखा

### वंशपट.






---

|| मुंजकेशाची संहिता दोन प्रकारची
१ संहिता.
२ नक्षत्रकल्प, वैतानकल्प, अंगिराकल्प, शांतिकल्प.

# शुक्ल यजुर्वेद वैदिक वाङ्मय परिचय

## प्रकरण १ लें

## वेद

पूर्वार्धांत श्री योगीश्वर याज्ञवल्क्यांचें जीवन-चरित्र दिल्यानंतर उत्तरार्धांत वाचकवर्गास शुक्लयजुर्वेद वाङ्मयाचा परिचय करून देण्याचें ठरविलें आहे. वस्तुतः परिचय करून देण्याची जरूर नव्हती; कारण परंपरागत परिचय सहजच होत असतो. तथापि सांप्रतच्या परिस्थितींत वैदिक वाङ्मयाची अध्ययन-अध्यापन-परंपरा विरल होत चालली आहे. कांहीं दिवसांनीं ती सर्वस्वी नष्ट होईल अशी साधार भीति उत्पन्न झाल्यामुळें भावी कालांत वैदिक वाङ्मयाचा परिचय करून देणारा असा एखादा तरी अल्पसा प्रयत्न व्हावा म्हणून व प्रकृत चरित्रालाही उपयोगी म्हणून ह्या उत्तरार्धांत शुक्लयजुर्वेद वैदिक वाङ्मयाचा परिचय करून देणें क्रमप्राप्त झालें आहे.

वर्णाश्रमधर्मानुयायी आर्यांचें संपूर्ण ज्ञानविज्ञान ज्यांत साठविलें आहे, व ज्याचे योगानें धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चारही पुरुषार्थ साध्य होऊं शकतात, व ज्यामुळें वैदिक संस्कृति आजपर्यंत उच्चपदारूढ आहे, असा कर्म, उपासना व ज्ञान या तीन कांडांनीं मंडित, सर्व प्रमाणप्रमेयशास्त्रांत मूर्धन्य आणि स्वतंत्र असा असलेला जो शब्दराशि त्यास वेद असें म्हणतात. या वेद शब्दाची व्युत्पत्ति सायणाचार्यांनीं ऋग्वेद भाष्याचे उपोद्घातांत पुढील-प्रमाणें केली आहे. ' प्रत्यक्षेणानुमित्या वा यस्तूपायो न बुध्यते । एनं विन्दति वेदेन तस्माद्वेदस्य वेदता ' इति । जो अर्थ प्रत्यक्ष व अनुमान ह्या प्रमाणांनीं जाणला जात नाहीं, तो या वेदांनीं जाणला जातो, हेंच वेदाचें वेदत्व होय. त्यासच भिन्न भिन्न स्थळीं श्रुति, त्रयी, वेद, आम्नाय इत्यादि शब्दांनीं संबोधिल्याचें आढळतें; अर्थात् हे सर्व शब्द पर्याय असून एकार्थाचेच बोधक आहेत. वेद हाच वर्णाश्रमधर्मीयांचा मुख्य ¶ धर्मग्रंथ असून पूर्वी तो

---

¶ धर्मं जिज्ञासमानानां प्रमाणं परमं श्रुतिः । मनु. अ. २।३

विभागलेला नसून † यजुर्वेद ह्या एकाच नांवानें प्रसिद्ध होता, असें ब्रह्मांड पुराण अ. ३५ मध्यें म्हटलें आहे. त्या नंतर कलियुगांत लोक अल्पशक्तिचे व व मंदबुद्धिचे होतील, त्यामुळें एवढ्या विस्तृत वेदाचें समग्र ज्ञान सर्वांस सारखें होणें शक्य नाहीं व त्याचे अभावीं वेदपरंपरा विनाश पावण्याचा प्रसंग येईल हें जाणून ब्रह्मदेवानें मनूस वेदसंरक्षणाविषयीं आज्ञा केली. मनूनें त्यासाठीं श्री नारायणाची प्रार्थना केली. श्री विष्णूनें मनूच्या प्रार्थनेवरून वेदसंरक्षणा करितां श्री वेदव्यास स्वरूपानें जन्मास येऊन ह्या वेदाचे हौत्र, आध्वर्यव, औद्गात्र आणि ब्रह्मत्व अशा क्रमानें प्रकरणशः चार विभाग करून त्यांस ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, व आथर्वणवेद अशा संज्ञा दिल्या. ह्याची सविस्तर कथा मागें जीवनचरित्रांत शाखाविवरण प्रसंगीं दिली आहे, ती तेथें पाहावी.

वेदव्यासापासून वैशंपायनादिकांस प्राप्त झालेली वेदचतुष्टयी ब्रह्मपरंपरेची होय. ह्या दोन्ही संप्रदायांचें सविस्तर विवरण शाखाप्रणयन प्रकरणांत आलें आहे. हे वेद अपौरुषेय, स्वतःप्रमाण व नित्य असे असल्या बद्दलचा आम्हां आर्यांचा फार दृढ विश्वास आहे व तो यथार्थही आहे, हें पुढील विवरणावरून सहज लक्षांत येईल. त्यांत प्रथम वेदाच्या अपौरुषेयत्वा विषयीं विचार करूं.

---

† एक एवासीद्यजुर्वेदस्तं चतुर्धा व्यकल्पयत् ।
चातुर्होत्रमभूचास्मिंस्तेन यज्ञमकल्पयत् ॥
आध्वर्यवं यजुर्भिस्तु ऋग्भिर्हौत्रं तथैव च ।
औद्गात्रं सामभिश्चक्रे ब्रह्मत्वं चाप्यथर्वभिः ॥
ब्रह्मत्वमकरोद्यज्ञे वेदेनाथर्वणेन तु ।
ततः स ऋचमुद्धृत्य ऋग्वेदं समकल्पयत् ॥
होतृकं कल्प्यते तेन यज्ञवाहं जगद्धितम् ।
सामभिः सामवेदं च तेनौद्गात्रमरोचयत् ॥
राज्ञस्त्वथर्ववेदेन सर्वकर्माण्यकारयत् । वायुपुराण अ. ६०

# वेदाचें अपौरुषेयत्व.

सामान्यतः कोणताही ग्रंथ म्हटला म्हणजे त्या ग्रंथाचा कोणी तरी कर्ता असावयाचाच व त्या कर्त्यानें ज्या काळांत तो ग्रंथ लिहिला तो काळही असावयाचाच ही गोष्ट स्वाभाविक आहे. परंतु वेदाचें तसें नाहीं; वेदाचा जर कोणी कर्ता असता तर त्याचें स्मरण अध्येतृपरंपरेनें अवश्य राहिलें असतें. ज्या अर्थी * वेदकर्त्याचें स्मरण होऊं शकत नाहीं, त्या अर्थी शशशृंगाप्रमाणें त्याचा अभावच होय. यावर कोणी कदाचित् अशी शंका घेतील कीं, 'प्रजापतिर्वैनमसृजत' या शतपथ ब्राह्मणांतलि वाक्यांत, 'तस्माद्यज्ञात्सर्वहुत ऋचः सामानि जज्ञिरे । छंदांसि जज्ञिरे तस्माद्यजुस्तस्मादजायत ' या पुरुष सूक्तांतील मंत्रांत व ' यो वै ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै ' या श्वेताश्वतर उपनिषद्वाक्यांत व ' अनादिनिधना नित्या वागुत्सृष्टा स्वयंभुवा ' ह्या स्मृतिवाक्यांत वेदाचा कर्ता प्रजापति असल्याबद्दलचें म्हटलें आहे. परंतु ही शंका युक्त नाहीं. हीं श्रुतिस्मृतींचीं वाक्यें अर्थवादस्वरूप असून अर्थवादांना स्वार्थांत तात्पर्य नसतें असा मीमांसकांचा सिद्धांत आहे. काठक, कालापक, कौथुम इत्यादि संज्ञा वेदांना ज्या आहेत, त्या कर्तृत्व निमित्तक आहेत असें जर कोणी म्हणेल तर तेंही त्याचें म्हणणें बरोबर नाहीं. कारण ह्या संज्ञा प्रवचनाच्या अतिशयपणामुळें संभवूं शकतात. तसेंच पदपदार्थ व तन्मूलक वाक्यार्थ हे अनादि वृद्धपरंपरेनें नित्य असल्यामुळें तन्मूलकही पौरुषेयता वेदाला येऊं शकत नाहीं. येथें पौरुषेयत्व म्हणजे पूर्व पूर्व आनुपूर्वीला सोडून उच्चारण करण्याचे बाबतींत पुरुषबुद्धीचें स्वातंत्र्य होय. तें महाभारतादि ग्रंथांत व्यासादिकांना संभवलें, कारण त्यांचे पूर्वी त्या सारखें उच्चारण कोणी केलें नव्हतें. वेदाचे बाबतींत कर्त्याच्या अभावामुळें अध्यापकाकडून तसें उच्चारण कदापिहि संभवनीय नसल्यामुळें ते अपौरुषेय होत हेंच म्हणणें बरोबर आहे.

---

* न कश्चिद्वेदकर्ता स्याद्वेदस्मर्ता चतुर्मुखः । वेदो नारायणः साक्षात्स्वयंभूरिति शुश्रुम ।। पराशरस्मृति.

## वेदाचें स्वतःप्रमाणत्व

जसे वेद अपौरुषेय आहेत, तसे ते स्वतःप्रमाणही आहेत, कारण वेद ज्ञानमय आहेत, ही गोष्ट सर्ववादिसंमत आहे. जर वेद ज्ञानमय आहेत तर सर्वच ज्ञान हें स्वभावतःच प्रकाशकत्व धर्मामुळें स्वतःसिद्ध प्रमाण असतें. ज्ञानाला आपला विषय व त्याची यथार्थता पटवून देण्याविषयींची जी एक प्रकारची शक्ति असते ती दुसऱ्याकडून केव्हांही उत्पन्न केली जात नाहीं, तर ती स्वयंसिद्धच असते. यावर कोणी कदाचित् म्हणतील कीं, कारण, गुण, संवाद व अर्थक्रिया, या विशिष्ट ज्ञानांनीं ती उत्पन्न केली जाते, तर तें म्हणणें बरोबर होणार नाहीं. कारण जशी या ज्ञानाला कांहीं विशिष्ट ज्ञानाची आवश्यकता लागते, तर याही विशिष्ट ज्ञानाला आणखी एखाद्या विशिष्ट ज्ञानाची आवश्यकता लागणार; आणि मग ही परंपरा थांबविण्याला बलवत्तर कारण न सांपडल्यामुळें मुळांत प्रामाण्यच नष्ट होण्याचा प्रसंग प्राप्त होईल. येथें प्रामाण्य म्हणजे अबाधित व अप्राप्त अर्थ बोधक शब्दशक्ति होय. अर्थात् याहून विपरीत अप्रामाण्य समजावें. अप्रामाण्य हें एक मिथ्यावादीपणामुळें अगर दुसरें कारणगत दोषामुळें येत असतें, व ते दोष पुरुषावलंबी असतात. अपौरुषेय वेदांत तर पुरुषबुद्धीचा स्पर्श नसल्यामुळें हे दोष मुळींच असणें शक्य नाहीं. वेद हे स्वतःप्रमाण आहेत, म्हणजे त्यांना प्रमाण होण्याकरतां दुसऱ्या प्रमाणाची अपेक्षा लागत नाहीं.

## वेदांचें नित्यत्व

जसे वेद स्वतःप्रमाण आहेत, तसे ते नित्यही आहेत. सृष्टीच्या आदिपासून तो अंतापर्यंतचा जो काल तो व्यवहारकाल होय, व व्यवहारकालांत जें भूत, भविष्य व वर्तमान या तिन्ही कालांत विद्यमान असतें, तें नित्य म्हणून समजलें जातें. याच न्यायानें वेद हे त्रिकालाबाधित होऊन व्यवहारकालांत वर्तमान असल्यानें नित्य होत. हें सायणचार्यांनीं आपल्या ऐतरेयब्राह्मणभाष्याच्या उपोद्घातांत स्पष्ट दिलें आहे. वस्तुतः मीमांसक सृष्टीच मुळीं बीजांकुर न्यायानें अनादि मानतात तेव्हां या सृष्टीचे धारक व प्रवर्तक जे वेद तेही अखंड प्रवाहाप्रमाणें नित्यच आहेत, हें निराळें सांगा-

वश्यकता जरुरी आहे असें नाहीं.

सारांश ज्याप्रमाणें व्यवहारांत कोठें तरी प्रमाणाची परम सीमा गृहीत धरल्यावांचून विवादास्पद वस्तूचा निर्णय लागत नाहीं, त्याचप्रमाणें हिंदु धर्मशास्त्राच्या निर्णयाची अंतिम सीमा वेद हींच होय. वेदानें दिलेल्या निर्णयावर पुनः प्रश्नच संभवत नाहीं. कारण त्याच्या निर्णयांत भ्रम, करुणा, विप्रलिप्सा, अपाटव इत्यादि दोषांचा लेशही नसतो.

वेद या शब्दानें सामान्यतः ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद या चारही वेदांचा जसा बोध होतो तसाच विशेषतः ' मंत्रब्राह्मणयोर्वेदनामधेयम् ' या आपस्तंब–कात्यायनांच्या सूत्रावरून त्या त्या वेदांतील अंतर्गत भेद जे मंत्रभाग व ब्राह्मण म्हणजे संहिता व ब्राह्मण यांचाही बोध होतो. म्हणजे प्रत्येक वेदांत संहिता व ब्राह्मण असे दोन विभाग असतात. पैकीं प्रथम संहिताविभागाचा विचार पुढील प्रकरणांत करूं.



## प्रकरण २ रें

# संहिता

संहिता म्हणजे काय हें पाणिनीनें व यास्कानें आपल्या पुढील सूत्रांत उत्तम प्रकारें समजाविलें आहे. ' परः सन्निकर्षः संहिता ' पा. सूत्र १ - ४ - १०९ नि. सू. १ - ६ - ११. या सूत्राचा अर्थ, स्वरांचा व स्वर संमिश्र व्यंजनांचा परस्पर स्वाभाविक अर्धमात्रेपेक्षां अधिक कालाच्या व्यवधानानें उच्चार करणें याचेंच नांव संहिता असा आहे. या नंतरच्या सूत्रांत यास्काचार्यांनीं संहितेचें स्वरूप निराळेंच सांगितलें आहे. तें सूत्र असें ' पदप्रकृतिः संहिता ' नि. सू. १ - ६ - १२. हेंच सूत्र ऋक्प्रातिशाख्यांत जसेंच्या तसें आलें आहे. या सूत्राचा अर्थ भाष्यकारांनीं, दोन तऱ्हेची व्युत्पत्ति करून दोन प्रकारें वर्णन केला आहे. पहिला अर्थ ' पदानां संधीयमानानां प्रकृतिः संहिता ' असा तत्पुरुष समास करून परस्पर संधिभावाला प्राप्त होणाऱ्या अनेक पदांचें एकत्रीकरण करण्यास जी प्रकृतिभूत (मूलकारण) आहे ती संहिता असा होय. म्हणजे संहिता ही प्रकृति व पदें ही तिची विकृति आहे. दुसरा अर्थ ' पदान्येव प्रकृतिर्यस्याः सा ' असा बहुव्रीहि समास करून पदेंच आहेत प्रकृति जिची ती संहिता असा होय. म्हणजे पदें ही प्रकृति व संहिता ही त्यांची विकृति होय.

या संहिता शब्दाची व्याख्या इतिहास पद्धतीनें विचार करणारे लोक निराळ्या तऱ्हेनें करितात. त्यांचें निराळें म्हणणें असें कीं, निरनिराळे मंत्र किंवा निरनिराळीं सूक्तें हीं ज्या अर्थीं निरनिराळ्या ऋषींच्या नांवावर आढळतात त्या अर्थीं तीं त्यांनीं केलेलीं किंवा पाहिलेलीं असून त्यांचे ते मंत्र व तीं सूक्तें पृथक् पृथकच होतीं. पुढें बऱ्याच कालानंतर तीं सर्व एकत्र करून जो ग्रंथ केला त्यासच संहिता हें नांव दिलें असावें. हें म्हणणें संहिता शब्दच दाखवित आहे. कारण ' संह्न्यन्ते एकत्रीक्रियन्ते मंत्राः सूक्तानि वा अस्यां सा संहिता ' अशी संहिता शब्दाची व्युत्पत्ति आहे. परंतु हें त्यांचें म्हणणें स्वकपोलकल्पित आहे. कारण असें पाहा कीं, मंत्र किंवा सूक्तें जर निरनिराळ्या ऋषींनीं तयार केलीं किंवा पाहिलीं व मागाहून तीं संहिता या

नांवाखालीं एकत्रित केली, तर त्या एकत्रित करणाऱ्या विशिष्ट व्यक्तीचें नांव व एकत्रित करण्याचा काल यांचा कोठें तरी निर्देश असावयास पाहिजे होता किंवा अविच्छिन्न परंपरेनें तशी दृढ माहिती असावयास पाहिजे होती. परंतु या दोन्ही गोष्टींचा अभावच आहे. बरें त्या त्या शाखाप्रवर्तक ऋषींनीं हें एकत्रीकरण केलें म्हणावें तर तेंही संभवत नाहीं. कारण मंत्रकर्ते व सूक्त-कर्ते ऋषि हे दुसऱ्या ऋषींस आपल्या मंत्रांच्या व सूक्तांच्या एकत्रीकरणास आपलें नांव सोडून दुसऱ्या ऋषीचें नांव ठेवूं देतील हें कदापिही संभवनीय नाहीं, कारण तसें घडणें हें मनुष्यस्वभावाविरुद्ध आहे. उदाहरणार्थ, माध्यं-दिन संहितेंत माध्यंदिन ऋषींचे नांवावर एकही मंत्र नसून त्या संहितेला माध्यं-दिन संहिता ही प्रसिद्धि केवळ प्रवचन—अध्यापन यांच्या अतिशयपणामुळेंच मिळाली आहे. हीच गोष्ट इतर संहितांची होय. दुसरें असें, भिन्न भिन्न ऋषीं-कडून भावि एकीकरणास अनुकूल अशी पुनरुक्ति, न्यूनाधिक्य, अन्यथा-भाव, परस्परविरुद्धता इत्यादि भिन्न भिन्न कर्तृत्वामुळें व कालामुळें नियत घडणारे दोष टाळून क्रमानें व प्रकरणशः विशिष्ट आनुपूर्वीनें व अर्थानें मंत्रांची अगर सूक्तांची रचना होणें अगर आविर्भाव होणें सहजगत्या संभव-नीय आहे काय ? किंवा प्रयत्नानें तरी संभवनीय आहे काय ? याचा मर्मज्ञ वाचकांनीं एकवार जरूर आपले मनाशीं विचार करावा. सहजगत्या तर मुळींच संभवनीय नाहीं, परंतु प्रयत्ना अंतीं सुद्धां होणें शक्य नाहीं, असें आम्ही निश्चयानें सांगू शकतों. मंत्राचे किंवा सूक्तांचे ऋषि हे कर्ते नसून द्रष्टे आहेत असें 'ऋषिर्दर्शनात्' २–३–२ या निरुक्तसूत्रांत यास्काचार्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे, व तें म्हणणेंच बरोबर आहे. कारण अपौरुषेय वेदांचे घटक अवयव जे मंत्र किंवा सूक्तें ह्यांचे ठिकाणीं कर्तृत्व संभवणें शक्य नाहीं. ऋषींचें द्रष्टृत्व सुद्धां मंत्राच्या किंवा सूक्तांच्या (मूळ) विनियोगांत [प्रयोजनांत] म्हणजे प्रयोज्य-प्रयोजक व कार्यकारण भावांत व त्यांतून उत्पन्न होणाऱ्या फलनिष्पत्तींत आहे, हें त्या त्या मंत्रांच्या किंवा सूक्तांच्या ऋषि, छंद, देवता व विनियोग ह्यांच्या परस्पर संबंधाकडे सूक्ष्म दृष्टीनें मननपूर्वक अवलोकन केलें असतां स्पष्ट कळून येईल. हें आमचें म्हणणें "तदेतत्सत्यं मंत्रेषु कर्माणि कवयो यान्य-पश्यंस्तानि त्रेतायां बहुधा संततानि" इति ॥ मुंडकोपनिषद् २।१ या मंत्रा-वरून अत्यंत सुस्पष्ट व सप्रमाण आहे हें सहज ध्यानीं येईल. इतिहासज्ञ लोक

करीत असलेली ' संहन्यन्ते एकत्रीक्रियन्ते मंत्राः सूक्तानि वा अस्यां सा संहिता' ही संहिता शब्दाची व्युत्पत्ति प्रकारांतरानेंही मंत्र किंवा सूक्त या शब्दांचे ऐवजीं ' पदानि ' हा शब्द ठेवून होण्यासारखी आहे. अर्थातच हें कारण अत्यंत दुर्बल असेंच आहे. तात्पर्य येथपर्यंतच्या विवरणावरून ऐतिहासिकांचें म्हणणें कसें युक्तियुक्त नाहीं हें लक्षांत आलें असेलच. तेव्हां संहिता शब्दाच्या कल्पित व्याख्या गृहीत धरण्यापेक्षां पूर्वाचार्यांनीं दाखविलेल्या सिद्ध व्याख्या घेऊनच संहिताभागाच्या अवशिष्ट राहिलेल्या विचाराकडे वळूं.

ही संहिता अंतर्गत भेदानें पुनः तीन प्रकारची आहे. एक ऋक्संहिता, एक यजुःसंहिता व एक सामसंहिता. कात्यायनानें प्रातिशाख्यांतील ' एकपद-द्विपदत्रिपदचतुःपदानेकपदाः पादाः ' — ' वर्णानामेकः प्राणयोगः संहिता ' अ. १ सू. १५७ — १५८ या दोन सूत्रांत क्रमानें ऋग्यजुःसामसंहितेचें लक्षण सांगितलें आहे. कांहीं छंदोबद्ध मंत्र एकपदात्मक चरणांचे, कांहीं द्विपदचरणांचे, कांहीं त्रिपदचरणांचे, कांहीं चतुःपदचरणांचे, तर कांहीं अनेकपदचरणांचे आहेत. म्हणजे ऋक्संहिता किंवा ऋङ्मंत्र म्हणतांना चरणाचे शेवटीं संहिता करावी, अर्थात् विराम घ्यावा; हा पहिल्या सूत्राचा अर्थ होय. यजुःसंहिता म्हणते वेळीं अर्थात् कंडिकांत यजुर्मंत्र म्हणतांना एका श्वासोच्छ्वासांत जितक्या पदांचा उच्चार होणें शक्य असेल, तितक्याच पदांचा उच्चार करून संहिता करावी, अर्थात् विराम घ्यावा. सामसंहिता गानरूप असल्यानें गानाच्या अनुरोधानेंच विराम घ्यावा. या तीनही प्रकारच्या संहिता चारही वेदाच्या मंत्रभागांत संभवतात, कारण वेदस्वरूप निष्पादक ऋक्, यजुः व साम हे तीनच अवयव आहेत, व या तीन अवयवांहूनच ' तयप् ' प्रत्यय होऊन वेदवाचक त्रयी हा शब्द बनला आहे. यावरून ' ज्या अर्थीं वेदाला त्रयी असें म्हणतात त्या अर्थीं ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद, हे तीनच वेद पूर्वी होते. आथर्वणवेद हा मागाहून तयार झाला असावा असें जें अनुमान ऐतिहासिक लोक काढतात तें भ्रांतिमूलक आहे हें स्पष्ट झालें आहे.

पुन्हां ही संहिता तीन प्रकारची आहे. प्रकृतिसंहिता, योगासंहिता व योगरूढासंहिता. प्रकृतिसंहिता म्हणजे मूळ अखंड मंत्रात्मक संहिता, योगासंहिता म्हणजे मूळ संहितेचा पदपाठ व योगरूढासंहिता म्हणजे क्रमपाठ. याच क्रमपाठाला आर्षीसंहिता व विकृतिसंहिता या नांवांनीं संबोधिलेलें आढळतें.

शुक्लयजुर्वेदाच्या ह्या संहिता कण्वमाध्यंदिनादि शाखाभेदानें १५ आहेत. पैकीं कण्व व माध्यंदिन यांच्या संहिता आज प्रत्यक्ष विद्यमान असून इतर शाखांच्या संहितांचे उल्लेख ठिकठिकाणीं आढळतात. त्यांना अनुसरून प्रयत्न केला असतां त्या अनुपलब्ध शाखा-संहिताही उपलब्ध होऊं शकतील हें आम्हीं शाखाविवरण प्रकरणीं दाखविलेंच आहे. एकंदर शुक्ल-यजुर्वेदाचा मंत्रभाग ऋङ्मंत्र ( छंदोबद्ध मंत्र ) १९००, यजुर्मंत्र [ गद्यमंत्र ] ८८८० व ८ अक्षरें इतका आहे, व कंडिकामंत्र १९७५ आहेत. क्वचित् ऋङ्मंत्रापैकींच मंत्र आधानादि प्रकरणवशात् सामस्वरूपानें गानात्मक असे आले आहेत. या मंत्रभागाचें सामान्यतः स्वरूप व अनुक्रम पुढीलप्रमाणें आहे.

या संहितांचे अंतर्विभाग अध्यायात्मक असून ते ४० आहेत व त्यांच्यांतही अनुवाकात्मक पोटविभाग असून ते अनुवाक ३०३ आहेत. अध्याय १ते२५ पर्यंतचा मंत्रभाग केवलसंज्ञक होय व हा सर्व भाग कर्मामध्यें विनियुक्त झालेला आहे. अध्याय २६ ते ३५ पर्यंतचा३५ अनुवाकात्मक मंत्रभाग खिलसंज्ञक होय. खिल म्हणजे परिशेष, अर्थात् पूर्वी केवलविभागांत सांगितलेल्या कर्मांचे पारिशेष होत. हे खिलमंत्र प्रायः कर्मकांडांत बहुंशानें विनियुक्तच असतात. अध्याय ३६ ते ४० पर्यंतचा मंत्रभाग शुक्रियसंज्ञक होय. याप्रमाणें मंत्रभागाला विशिष्ट अशा तीन संज्ञा आहेत. या शिवाय आणखी पोटविभाग असून त्यांनाही विशिष्ट संज्ञा आहेत; त्या पुढीलप्रमाणें.

अध्याय १ मधील, १ ते ५ पर्यंतच्या कंडिकामंत्रांना शाखामंत्र ही संज्ञा आहे. ६ ते ३१ पर्यंतच्या मंत्रांना व अध्याय दोन मधील १ ते २८ पर्यंतच्या कंडिकामंत्रांना पौरोडाशिकमंत्र अर्थात् दर्शपूर्णमाससंबंधीं मंत्र अशी संज्ञा आहे. अध्याय २ मधील २९ ते ३४ पर्यंतच्या मंत्रांना पितृयज्ञिय मंत्र ही संज्ञा आहे. अ. ३ मधील १ ते ८ कंडिकामंत्रांना अग्न्याधेय मंत्र म्हणतात. ९ ते ४३ पर्यंतच्या मंत्रांना अग्निहोत्र मंत्र असें म्हणतात. यानंतर कांहीं संहितांतून दाक्षायणगुणक दर्शपूर्णमास मंत्र व आग्रयण मंत्र आले आहेत, असें कात्यायन श्रौतसूत्राच्या अनुक्रमावरून व प्रतिज्ञापरिशिष्टांत दिलेल्या श्री संहितेच्या विषयानुक्रमावरून दिसतें. अ. ३ मधील ४४ ते ६३ पर्यंतचे मंत्र-ऐष्टिक चातुर्मास्य मंत्र होत. यानंतर पुन्हां कांहीं संहितांतून सपाशुक चातुर्मास्य मंत्र, मित्रविंदेष्टि मंत्र व निरूढपशुबंध मंत्र आले आहेत. अ.४-५-६-७व८च्या

अध्यायाच्या ३७व्या कंडिकेपर्यंतच्या मंत्रांना सौमिक अशी संज्ञा असून त्यांत कांहीं ग्रहसंबंधीं मंत्र आले आहेत. यानंतर पुनः कांहीं संहितांतून याजमान मंत्र व हविःसंबंधीं मंत्र आले आहेत. अध्याय८मधील २८-२९-३०-३१व३२ या पांच मंत्रांना अध्वापद्या मंत्र ही संज्ञा आहे. ३३ ते ३७ पर्यंतच्या मंत्रांना षोडशी मंत्र अशी संज्ञा आहे. ३८ ते ५० पर्यंतच्या तेरा मंत्रांना अहीन मंत्र असें म्हणतात. ५१-५२व५३ या तीन मंत्रांना सात्रिक मंत्र असें म्हणतात. ५४ ते ६३ या दहा मंत्रांना कालप्रमेय ( प्रायश्चित्त ) मंत्र अशी संज्ञा आहे. अध्याय ९व१० मध्यें वाजपेय, राजसूय व राजसूयशेष चरकसौत्रामणियाग यासंबंधीं मंत्र आले आहेत. या दोन अध्यायांपैकीं नवव्या अध्यायास मंडलाध्याय अशी संज्ञा आहे. ‘ देव सवितः प्रसुव यज्ञम् ’ या मंत्राच्या पूर्वार्धानें सूर्यमंडलाधिष्ठित पुरुषाची स्तुति करून उत्तरार्धापासून पुढें सूर्यमंडलाची स्तुति केली आहे हें उवटमहीधरभाष्यावरून सहज लक्षांत येईल. कांहीं लोक ‘यदेतन्मंडलं तपति’ या अग्निरहस्यांतील ब्राह्मणालाच मंडलाध्याय म्हणतात; परंतु तें म्हणणें चूक आहे. कारण एक तर त्याचे ठिकाणीं अध्यायत्व नाहीं व दुसरें ब्राह्मण असल्यानें कर्मामध्यें विनियोग नाहीं. या गोष्टीचा विद्वान् गृहस्थांनीं विचार करणें अत्यंत जरूर आहे. अध्याय ११ ते १८ पर्यंत चयनयाग संबंधीं मंत्र आले आहेत. पैकीं १६ व्या अध्यायास शतरुद्रिय अशी संज्ञा आहे. अध्याय १९-२०-२१ मध्यें सौत्रामणियाग व तत्संबंधीं हौत्र मंत्र आले आहेत. अध्याय २२-२३-२४व२५ मध्यें अश्वमेध यागासंबंधीं मंत्र आले आहेत. येथपर्यंत केवलभागांतील मंत्रांचें दिग्दर्शन केलें.

खिलभागांतील अध्याय २६-२७-२८व२९ मध्यें क्रमानें चयन, सौत्रामणि व अश्वमेध या यागांसंबंधीं अवशिष्ट मंत्र आले असून हे ११ अनुवाक आहेत. यांना पारायणबंध अशी संज्ञा आहे. अध्याय ३०व३१ यांत पुरुषमेध यागाचे मंत्र आले आहेत. पैकीं तिसाव्या अध्यायाला श्लोकाध्याय असें म्हणतात. श्लोक म्हणजे ब्राह्मणोत्पन्न किंवा ब्राह्मणसदृश मंत्र समजावे. अध्याय ३२ व ३३ व्याचे ५५ पर्यंतचे मंत्र हे सर्वमेधयागसंबंधीं मंत्र होत. ५६ व्या मंत्रापासूनचा ३३ वा अध्याय व ३४ वा अध्याय यांतील मंत्र अनारभ्याधीत म्हणजे कोठेंही विनियोग न केलेले असे आहेत. अध्याय ३५ मध्यें पितृमेध यागाचे मंत्र आले आहेत. अध्याय ३६ते४० पर्यंतच्या शुक्रिय भागांतील

अ. ३६ यास शांत्यध्याय अशी संज्ञा असून त्याचा विनियोग शांतिकरणाकडे केलेला आहे. अ. ३७–३८ व ३९ यांत सोमयागाचा एक विशिष्ट भाग जो प्रवर्ग्य किंवा घर्म म्हणून आहे, त्याचे संबंधीं मंत्र व चयन व अश्वमेध संबंधीं मंत्र आले आहेत. येथपर्यंत कर्मकांडाचें प्रतिपादन केलें असून पुढें अ. ४० यांत ज्ञानकांडाचें प्रतिपादन सूत्ररूपानें आलें आहे, तें फार महत्त्वाचें आहे. म्हणूनच या अध्यायाला उपनिषद् ही संज्ञा आहे.

केवल भागांतील अ. ८ चा ' आजिघ्र कलशं ' हा मंत्र, शतरुद्रिय मंत्र व अश्वमेध मंत्र खेरीज करून बाकीचे मंत्र उदयानंतर पण भोजनाचे पूर्वी म्हणावे असा नियम आहे. त्यामुळें त्यांना प्राग्भोजनीय असेंही म्हणतात. खिल भागांतील पहिले १२ पारायणबंध नांवाचे अनुवाक रात्रीं म्हणावयाचे नाहींत असा नियम आहे. त्यामुळें त्यांना दिवाकीर्त्य असें म्हणतात. तसेंच समग्र शुक्रिय भाग अर्थात् ३६ते४० अध्याय यास दिवाकीर्त्य म्हणतात. म्हणून ते रात्रीं म्हणावयाचे नाहींत असा नियम आहे. या प्रमाणें×शुक्ल यजुर्वेदाच्या पंधराही संहितांतून सामान्यतः क्रमानें विषय आले आहेत. ते बव्हंशानें अध्वर्यु संबद्ध असल्यानें व क्वचित् हौत्र संबद्ध असल्यानें या वेदास छत्रिन्यायानें अध्वर्युवेद असेंही म्हणतात.

ह्या मंत्रांचे विशिष्ट कार्यपरत्वानें चार प्रकार सांगितले आहेत. १ करण मंत्र २ क्रियमाणानुवादि मंत्र ३ अनुमंत्रण मंत्र व ४ जपमंत्र. हे चारही प्रकार कर्मोपयुक्त असेच आहेत.



---

× ब्रह्ममूलो यजुराख्यवेदविटपी जीयात्स माध्यंदिनी ।
शाखा यत्र युगेंदु ( १४ ) कांडसहिता यत्रास्ति सा संहिता ॥
यत्राभ्राब्धि [ ४० ] लता भवंति शरशैलांकेंदु ( १९७५ ) भी ऋग्दलैः ।
पंचद्वीषुनभोंक [ ९०५२५ ] वर्णमधुपैः स्वाग्न्यर्कगुंगुंजितैः ॥
इति यजुर्वेदकल्पतरौ ॥

प्रकरण ३ रें

# संहितेवरील भाष्यकार

## माध्यंदिन संहिता

या संहितेवर उवटप्रभृति अनेक भाष्यकार होऊन गेले. शुक्लयजुर्वेदीय माध्यंदिन संहितेवरील सुप्रसिद्ध भाष्यकार उवट हा होय.

### उवट

उवट हा राजा भोज याचा समकालीन असून इ. सनाच्या ११ व्या शतकांत होऊन गेला. तो स्वतः आपल्या भाष्याचे शेवटीं लिहितो कीं, :—

आनंदपुरवास्तव्यवज्रटाख्यस्य सूनुना ।
उवटेन कृतं भाष्यं पदवाक्यैः सुनिश्चितैः ॥
ऋष्यादींश्च नमस्कृत्य अवन्त्यामुवटो वसन् ।
मंत्राणां कृतवान् भाष्यं महीं भोजे प्रशासति ॥

अर्थात् आनंदपुरांत [ वडनगरांत ] राहणारा वज्रटाचा पुत्र उवट यानें निःसंदिग्ध पदवाक्यांचे योगानें ऋषि वगैरेंना नमस्कार करून अवंति [ उज्जयनी ] नगरींत राहून राजा भोज राज्य करीत असतां मंत्रभाष्य केलें.

मंत्रभाष्यमिदं क्लृप्तं भोजे पृथ्वीं प्रशासति ।
मंत्रभाष्यमिदं चक्रे भोजे राज्यं प्रशासति ।
उवटेन कृतं भाष्यमुज्जयिन्यां स्थितेन तु ।

इत्यादि स्वल्प पाठभेदांनीं वरील श्लोक हस्तलिखित व मुद्रित प्रतींतून आढळतात. उवट हा नागर ब्राह्मण असून आनंदपुरचा अर्थात् वडनगरचा निवासी होता व पुढें राजाश्रयानें उज्जयिनीस आला. भोज राजाचा राज्यकाल संवत् १०७५ ते १११७ पर्यंतचा मानला जातो. अर्थात् याच कालांत उवटानें भाष्य लिहिलें असावें, असें पुष्कळांनीं अनुमान केलें आहे. परंतु औरंगाबाद येथें गायत्री–मंदिरांत एक पुस्तकसंग्रह

असून त्यांत माध्यंदिनसंहितेवरील उवटाचें संपूर्ण भाष्य हस्तलिखित आहे. त्याचे शेवटीं पुढील श्लोक आहेत.

' कपंचरसशून्ये के गते विक्रमभूपतौ ।
नभस्यसितपंचम्यां मंत्रभाष्यमलेखि सः ॥ १ ॥
संवच्छून्यरसश्च बाणकयुते वर्षेऽधिपे काभिधे ।
प्रारब्धे मुनिसेवितां दिशमिनौ मासे नभस्ये सति ॥
पक्षे वै सितसंज्ञके दिनपतेः पुत्रे तदा वासरे ।
भे स्वात्यृक्षेलीलिखदातितरां मंत्रभाष्यं द्विजोऽसौ ॥ २ ॥

या श्लोकांचा अर्थ बरोबर लागत नाहीं त्याचा विचार अवश्य करावा. विद्वानांनीं याचा अधिक तपास केल्यास उवटाचा काल निश्चित होईल. याच उवटानें ऋक्प्रातिशाख्यावर व यजुःप्रातिशाख्यावर आणि बृहृचसर्वानुक्रमावर भाष्य लिहिलें आहे. उवट भाष्याचा शत्रुघ्न व महीधर प्रभृति भाष्यकारांनीं आपापलीं भाष्यें लिहितांना बराच उपयोग केलेला दिसतो. याच्या भाष्याचें नांव मंत्रार्थप्रकाश असें आहे.

## महीधर

हाही नागर ब्राह्मण असून काशीस रहात असे. यानें माध्यंदिन-संहितेवर वेददीप नांवाचें भाष्य लिहिलें आहे.

प्रणम्य लक्ष्मीं नृहरिं गणेशं भाष्यं विलोक्यौवटमाधवीयम् ।
यजुर्मनूनां विलिखामि चार्थं परोपकाराय निजेक्षणाय ॥

उवट आणि माधव यांचें भाष्य पाहून मी यजुर्मन्त्रांचा अर्थ लिहितों. अर्थात् माधव म्हणजे कण्व संहितेवरील भाष्यकार सायण-माधव हाच होय. हें महीधराचें भाष्य म्हटलें म्हणजे उवट व सायणाचार्य यांच्या भाष्यांचें स्फुट भाषेंत स्पष्टीकरणच आहे. याच महीधरानें मंत्रशास्त्रांतील प्रसिद्ध ग्रंथ मंत्रमहोदधि हा केला आहे.

अहिच्छत्रद्विजच्छत्रं वत्सगोत्रसमुद्भवः ।
आसीद्रत्नाकरो नाम विद्वान्ख्यातो धरातले ॥
तत्तनूजो रामभक्तः फनूभट्टाभिधोऽभवत् ।
महीधरस्तदुत्पन्नः संसारासारतां वदन् ॥
निजदेशं परित्यज्य गतो वाराणसीं पुरीम् ।

सेवमानो नरहरिं तंत्रग्रंथमिमं व्यधात् ॥
अब्दे विक्रमतो जाते बाणवेदनृपैर्मिते [ १६४५ ] ।
ज्येष्ठाष्टम्यां शिवस्याग्रे पूर्णो मंत्रमहोदधिः ॥

मंत्रमहोदधि तरंग २५

ह्या मंत्रमहोदधीच्या अंतिम ग्रंथालंकारावरून महीधर हा अहिच्छत्र नगरांतील [ सांप्रतचें अनहिलपट्टन ] राहणारा असून वत्स गोत्रोत्पन्न रत्नाकराचा पौत्र व रामभक्त फनूभट्टाचा पुत्र होय. यानें स्वदेश सोडून काशीस येऊन राहिल्यानंतर विक्रमसंवत् १६४५ ज्येष्ठ शुद्ध अष्टमीला मंत्रमहोदधि नांवाचा ग्रंथ पुरा केला. अर्थात् वेददीप नांवाचें भाष्यही याच काळांत लिहिलें असावें, असें वाटतें.

## रावणभट्ट

यानेंही माध्यंदिन संहितेवर भाष्य केलें असल्याचा उल्लेख श्रीक्षेत्र नासिकनिवासी पद्मनाभ दीक्षितकृत रुद्रप्रयोगदर्पणांत आला आहे. रावणभट्ट हा बहुतकरून विक्रमसंवतच्या १६ व्या शताब्दींत झाला असावा. यानें ऋग्वेदावरही भाष्य केल्याचें आढळून येतें. असें सूर्यपंडितानें आपल्या गीतेवरील ' परमार्थप्रपा ' नांवाच्या टीकेंत अ. ११ श्लोक ३३ येथें ' रावणभाष्ये तु अध्यात्मरीत्या अभ्यंतरसंग्रामविषयो दर्शितः । उवटभाष्ये तूभयमपि ' असें म्हटल्यावरून वाटतें. कारण ज्या मंत्रांविषयीं त्यानें म्हटलें आहे ते मंत्र ऋग्वेदसंहितेंतील आहेत. उव्वटाचा उल्लेख सर्वानुक्रमभाष्यासंबंधीचा असावा असें दिसतें.

## गौरधर

सुप्रसिद्ध पं. गौरधर यानें माध्यंदिन संहितेवर वेदविलास नांवाचें ऋजुव्याख्यानरूप भाष्य लिहिलें आहे. गौरधर हा काश्मीर देशाचा राहणारा असावा. स्तुतिकुसुमांजलीचा कर्ता व मालतीमाधव नाटकावरील टीकेचा कर्ता सुप्रसिद्ध पं. जगद्धर त्याचा हा पितामह होय. यानें भाष्य केल्याचा उल्लेख जगद्धराच्या स्तुतिकुसुमांजलीच्या शेवटील श्लोकांतील उल्लेखावरून स्पष्ट होत आहे.

पुरा पुरारेः पदधूलिधूसरः सरस्वतीस्वैरविहारभूरभूत् ।
विशालवंशश्रुतवृत्तिविश्रुतो विपश्चितां गौरधरः किलाग्रणीः ॥१॥

अनंतसिद्धांतपथांतगामिनः समस्तशास्त्रार्णवपारदृश्वनः ॥
ऋजुर्यजुर्वेदपदार्थवर्णना व्यनक्ति यस्याद्भूतविश्रुतंश्रुतम् ॥ २ ॥

या श्लोकावरील टीकाकार रत्नकंठ म्हणतो, ' तादृशस्य गौरधरस्य ऋजुर्निर्मला निर्दोषा च यजुर्वेदपदानामर्थवर्णना भाष्यपद्धतिर्वेदविलासनाम्नी यस्याद्भुतं विश्रुतं प्रसिद्धं श्रुतं व्यनक्ति प्रकटयति " यावरून गौरधरानें माध्यंदिनसंहितेवर **वेदविलास** नांवाचें भाष्य लिहिलें हें स्पष्ट होत आहे. ह्या भाष्याला **ऋजुभाष्य** असेंही नांव आहे. या भाष्याचे चार अध्याय २९ - ३१ - ३८ व ४० हे बडोदा लायब्ररींत विद्यमान आहेत. जगद्धर इ. स. १३५२ च्या सुमारास झाला आहे असें मानण्यांत येतें. त्यावरून गौरधर हा जगद्धराच्या ६० वर्षें तरी पूर्वीं झाला असावा.

## अनंताचार्य

वडनगरनिवासी लक्ष्मीधराचा पुत्र अनंताचार्य यानें माध्यंदिन संहितेवर **वेदार्थदीपिका** नांवाचें भाष्य लिहिलें आहे. तसेंच स्वपितृकृत भगवन्नामकौमुदी ग्रंथावर प्रकाश नांवाची टीका व मीमांसेंत वेदार्थचंद्रिका नांवाचा ग्रंथ असे आणखी दोन ग्रंथ तयार केले आहेत. अनंताचार्य हा इ. स. १० व्या शतकांत झाला आहे, असें गुजराथी साहित्य परिषद रिपोर्ट पान १४१ मध्यें म्हटलें आहे.

## शत्रुघ्न

यानेंही माध्यंदिन संहितेवर **मंत्रार्थदीपिका** नांवाचें भाष्य लिहिलें आहे.

उवटे मंत्रव्याख्या गुणविष्णौ ब्राह्मणीयसर्वस्वे ।
वेदविलासिन्यामपि कौशलमीक्षत तथापि मे सद्भिः ॥

उवटानें केलेली मंत्रव्याख्या गुणविष्णूचें छंदोगभाष्य, हलायुधाचें ब्राह्मणसर्वस्व व गौरधराचें वेदविलासभाष्य पाहून मी ही मंत्रार्थदीपिका लिहितों. शत्रुघ्नाचा काल इ. स. १५२० ते १५५० च्या सुमारास असावा. कारण तो आपल्या ग्रंथांत म्हणतो कीं,

आदेशादथराज्ञस्तस्य श्रीधर्मचंद्रस्य ।

महाराज श्री धर्मचंद्राच्या आज्ञेवरून हें भाष्य मी लिहीत आहे. धर्मचंद्र हा त्रिगर्त म्हणजे कांगडा देशाचा राजा होता.

## भवदेव

यानेंही माध्यंदिन संहितेवर भाष्य केलें आहे. ह्या भाष्याचा कांहीं भाग काशी येथील क्वीन्स कॉलेजच्या पुस्तकालयाच्या संग्रहीं आहे. भवदेव हा मैथिल होता. हा कृष्णदेवाचा पुत्र असून भवदेवठक्कुर याचा शिष्य होता. याचा काल निश्चित सांगतां येत नाहीं; तथापि हा उवटानंतरचा आहे हें निश्चित. कारण ह्यानेंच षडंगरुद्राचें जें भाष्य स्वतंत्रपणें केलें आहे त्याच्या आरंभीं तो म्हणतो कीं,

भवदेवगुरोर्नत्वा पदपंकेरुहद्वयम् ।
भवदेवः षडंगस्य व्याख्यां प्रकुरुतेऽधुना ॥
उवटादिभिरुत्कृष्टैः पंडितैः स्वगुरुक्रमात् ।
या व्याख्या कल्पिता प्रायस्तामेव कल्पयाम्यहम् ॥

भवदेवासंबंधीं जें इतिवृत्त आम्हीं दिलें आहे तें त्याच्या सातव्या व एकविसाव्या अध्यायाच्या समाप्तीच्या लेखावरून दिलें आहे. तो लेख असा कीं, :—

इति मैथिलसन्मिश्रश्रीकृष्णदेवतनयमहामहोपाध्यायसठक्कुरश्रीभवदेव-प्रियशिष्यमहामहोपाध्यायाभिनवाचार्यसन्मिश्रभवदेवकृतायां संहिताव्याख्या-रत्नमालायां सप्तमाध्यायव्याख्यारत्नं ॥

.................... श्रौतीं व्याख्यां कांचिदभ्यातनोमि । एवं श्रीभवदेवपंडितकविर्गंगातीरे पट्टने व्याख्यानं कुरुते ॥

## शौनक

माध्यंदिन संहितेच्या ३१व्या अध्यायावर शौनकाचें भाष्य असून, निर्णय-सागर प्रेसमध्यें छापलेल्या उवटभाष्यांत ३१ व्या अध्यायावरील उवटभाष्य न मिळाल्यामुळें त्याचे ऐवजीं संगृहीत केलें आहे. ( ३० व ३१ या दोनही अध्यायावरील उवटभाष्य माझे संग्रहीं आहे. ) त्यावरून शौनकाचें सर्व संहितेवर भाष्य असावें असें अनुमान प्रो. भगवद्दत्त लाहोर यांनीं काढिलें आहे. त्याची सत्यता शौनकाचे इतर अध्यायावरील भाष्याच्या उपलब्धीवर अवलंबून आहे.

## हरिस्वामि

जम्बूसर येथील रघुनाथ मंदिराच्या पुस्तकालयाच्या सूचीपत्रांतील

४५०९ अनुक्रम नंबरचा ग्रंथ रुद्राध्यायाचा पदपाठ हा असून तो हरिस्वामीच्या मतानुसारी आहे, असें म्हटलें आहे. एवढ्यावरून हरिस्वामीनेंसुद्धां माध्यंदिन संहितेवर भाष्य केलें असावें असें अनुमान प्रो. भगवद्दत्त लांहोर यांनीं काढिलें आहे. परंतु तें बरोबर आहे असें आम्हांस वाटत नाहीं. कारण हरिस्वामीनें केलेल्या संहिताभाष्याचा उल्लेख कोठेंच आला नाहीं. रुद्राध्यायाचा पदपाठ हरिस्वामीचे मतानुसारी म्हणजे शतपथाचे भाष्य करते वेळीं शतरुद्रियावर जें भाष्य हरिस्वामीनें केलें त्याचे अनुसारी असण्याचा अधिक संभव असल्यानें हरिस्वामीनें माध्यंदिनसंहितेवरही भाष्य केलें असावें हें म्हणणें युक्तियुक्त वाटत नाहीं.

## म. म. पाठक शास्त्री

श्री. श्रीधरशास्त्री पाठक धुळें यांनींही माध्यंदिनसंहितेवर उवटभाष्यानुसारी **बालबोधिनी** नांवाची एक संस्कृत व्याख्या लिहिल्याचें समजतें. यांनींही बरेच ग्रंथ केले आहेत.

## कण्वसंहितेवरील भाष्यकार

## सायणाचार्य

महाराज बुक्क याच्या आश्रयानें राहणारा चारही वेदांचा भाष्यकर्ता सुप्रसिद्ध सायणाचार्य यानें कण्वसंहितेच्या पूर्वार्धावरच भाष्य केलें आहे. बाकीचें उत्तरार्धावरचें भाष्य आजला उपलब्ध नाहीं. ❀ कण्वसंहितेवरील दुसरा भाष्यकार अनंत याचे मतें उत्तरार्धावर सायणाचार्यानें भाष्य केलेंच नाहीं. कारण तो पुढील श्लोकांत तसें स्पष्ट म्हणत आहे.

**व्याख्याता कण्वशाखीयसंहितापूर्वविंशतिः ।**
**माधवाचार्यवर्येण स्पष्टीकृत्य न चोत्तरा ॥**

सायणाचार्य हा संवत् १३७२ ते १४२५ चे कालांत झाला असावा.

---

❀ धुमसर राज्यांतर्गत प्रतापलक्ष्मणपुरवासि कण्व पं. चंद्रशेखरब्रह्मा सीनियर ओरिया पंडितबोर्ड हायस्कूल आस्का जि. गंजाम यांचे जवळ कण्व संहितेच्या उत्तरार्धावरील सायणाचार्याचें भाष्य संपूर्ण असून तें उत्कल लिपींतून आहे असें त्यांचें म्हणणें आहे.

## आनंदबोध

यानेंही कण्वसंहितेवर संपूर्ण भाष्य लिहिलें आहे. हें भाष्य **काण्व-वेदमंत्रभाष्य** ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. त्याचे पहिले ३० अध्याय पूना लायब्ररीमध्यें आहेत. २० ते ३९ पर्यंत अध्यायांचें भाष्य पंजाब युनिव्हर्सिटीच्या लायब्ररीमध्यें आहे. ४० व्या अध्यायाचें भाष्य आनंदाश्रमांत ईशोपनिषदाच्या अनेक भाष्यांबरोबर छापून प्रसिद्ध आहे. त्याचे शेवटीं खालील लेख आहे.

**" इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यवर्यश्रीवासुदेवपुरीपूज्यपादपरमकारुणिकासादितश्रीकृष्णभक्तिसाम्राज्यस्य श्रीमज्जातवेदभट्टोपाध्यायस्य सूनुना चतुर्वेदश्रीमदानंदबोधभट्टोपाध्यायेन विरचिते काण्ववेदमंत्रभाष्यसंग्रहे चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४० ॥ "**

यावरून आनंदबोधभट्टोपाध्याय हा चारी वेदांचा वेत्ता असून, याच्या पित्याचें नांव जातवेदभट्टोपाध्याय व गुरूचें नांव वासुदेवपुरी असें होतें असें दिसतें.

## अनंताचार्य

यानें कण्व संहितेच्या उत्तरार्धावर भाष्य लिहिलें आहे, हें त्याच्या भाष्यारंभींच्या खालील श्लोकावरून स्पष्ट होत आहे.

**व्याख्याता कण्वशाखीयसंहितापूर्वविंशतिः ॥**
**माधवाचार्यवर्येण स्पष्टीकृत्य न चोत्तरा ॥**
**अतस्तां व्याकरिष्येऽहमनंताचार्यनामकः ॥**

याच्या मातेचें नांव भागीरथी व पित्याचें नांव नागदेव असें होतें. हा काशीमध्यें रहात असे. हें खालील श्लोकावरून स्पष्ट आहे.

**अंबा भागीरथी यस्य नागदेवः पिता सुधीः ॥**
**काश्यां वासः सदास्य चित्तं यस्य रमाप्रिये ॥**

याच्या भाष्याचें नांव दीपिका किंवा **भावार्थदीपिका** असें आहे असें उपक्रमांतील श्लोकावरून दिसून येतें.

**अनेकग्रंथमालोच्य दीपिका क्रियते मया ॥**
**बहूनि संति भाष्याणि प्रणीतानि हि सूरिभिः ॥**
**न पांडित्याभिमानेन न च वित्तस्य लिप्सया ॥**
**दीपिका रच्यते किंतु लक्ष्मीकांतस्य तुष्टये ॥**

अनंताचार्य केव्हां केव्हां आपल्या भाष्यास वेददीप असेंही म्हणत असावा असें दिसतें, कारण त्यानें ठिकठिकाणीं म्हटलें आहे.—

अमुना वेददीपेन मया नीराजितो हरिः ।

यानें आणखीही बरेच ग्रंथ निर्माण केले आहेत. १ कण्वशतपथ-भाष्य, २ कण्वकंठाभरण, ३ पदार्थप्रकाश नवाचें कात्यायनप्रातिशाख्यभाष्य, ४ भाषिकसूत्रभाष्य, वगैरे त्याचे ग्रंथ होत. हा बहुतकरून महीधराच्या समकालीन होऊन गेला असावा.

## हलायुध

यानें कण्वसंहितेवर ब्राह्मणसर्वस्व या नांवाचें भाष्य लिहिलें आहे. हा बालवयांतच राजपंडित पदाला प्राप्त झाला. राजा लक्ष्मणसेनदेव यानें त्यास धर्माधिकारीपद दिलें होतें. राजा लक्ष्मणसेनदेव हा संवत् १२३२ ते १२५६ चे कालांत झाला असल्यानें हलायुधाचा काल तोच ठरतो. हें ब्राह्मणसर्वस्वाच्या खालील श्लोकावरून स्पष्ट होत आहे.

बाल्ये ख्यापितराजपंडितपदं श्वेतार्चिबिम्बोज्ज्वल ।
च्छात्रोत्सिक्तमहामहत्तनुपदं दत्वा नवे यौवने ॥
यस्मै यौवनशेषयोग्यमखिलक्ष्मापालनारायणः ।
श्रीमांल्लक्ष्मणसेनदेवनृपतिर्धर्माधिकारं ददौ ॥

यानें मीमांसासर्वस्व, वैष्णवसर्वस्व, शैवसर्वस्व, पंडितसर्वस्व, असे ग्रंथ केले आहेत.

मीमांसासर्वस्वं वैष्णवसर्वस्वं यत्कृतशैवसर्वस्वं ।
पंडितसर्वस्वमसौ सर्वस्वं सर्वधराणाम् ॥



प्रकरण ४ थें

# रुद्रभाष्यकार

शुक्लयजुर्वेदीय षडंगरुद्रावर अनेक पंडितांनीं भाष्य केलें असून त्यांपैकीं कांहीं भाष्यें उपलब्ध आहेत. त्यांचा थोडासा परिचय येथें प्रसंगानें करून द्यावयाचा आहे.

## माध्यंदिनीय रुद्रभाष्यकार

### मयूरेश

यानें शालिवाहनशक १६३४ मध्यें आपलें अत्यंतगूढ असें रुद्रभाष्य रचिलें आहे. याची एक प्रत लाहोर युनिव्हर्सिटीच्या लायब्ररींत व दुसरी पुणें येथील पुस्तकालयांत आहे. त्या प्रतीच्या ३७८ पानावर या मयूरेशाला कैवल्येंद्राचा शिष्य म्हणून म्हटलें आहे.

युगगुणरसभूमिभूषिते शालिवाहे ।
विकृतिशरदि चैत्रे शुक्लपक्षे चतुर्थ्याम् ॥
मुनिमुनिकुलजातश्रीमयूरेशनामाऽ–
लिखदिदमतिगूढं रुद्रभाष्यं समीक्ष्य ॥

### राजहंससरस्वती

यानें शालिवाहनशके १६९३ मध्यें रुद्रावर भाष्य लिहिलें आहे. याची एक प्रत बडोदा पुस्तकालयांत आहे. माझेही संग्रहीं एक प्रत आहे. राजहंससरस्वती हा वेदांतांत निष्णात असून त्यानें अनेक गुरूजवळ अध्ययन पादन केलें असावें, असें त्यानें भाष्यारंभीं दिलेल्या श्लोकावरून दिसतें. भाष्य प्रायः महीधर भाष्यानुसारी आहे.

नारायणेंद्रपदाब्जं विद्येंद्रचरणांबुजम् ।
नृसिंहेंद्रपदाम्भोजं कैवल्येंद्रपदांबुजम् ॥
एतानि पद्मरत्नानि चत्वारि हृदयांबुजे ।
मामकीने प्रकाशन्तां भुक्तिमुक्तिप्रसिद्धये ॥

### भवदेव

सन्मिश्रभवदेव यानेंही षडंगरुद्रावर भाष्य केलें आहे. याचा

विशेष परिचय पूर्वी संहिताभाष्यकार म्हणून दिला आहे. या भाष्याची प्रत पंजाब युनिव्हर्सिटीच्या पुस्तकालयांत विद्यमान आहे.

## भवानीशंकर

यानेंही षडंगरुद्रावर भाष्य केलें असून त्याची प्रत बडोदा पुस्तकालयांत आहे.

## काण्वरुद्रभाष्यकार

कण्व व माध्यंदिन यांच्या रुद्रांत पुढीलप्रमाणें फरक आहे. माध्यंदिन शिवसंकल्प सहा मंत्रांचा तर कण्वांचा एकच मंत्राचा आहे. माध्यंदिनांचें "वयंसोम" हें महच्छिरसूक्त आठ मंत्रांचें तर कण्वांचे सात मंत्रांचें आहे. बाकी सर्व रुद्र सारखाच आहे.

## वेणीरायसाम्राज

यानें कण्वरुद्रावर भाष्य केलें असुन त्याची प्रत पूना पुस्तकालयांत आहे. वेणीराय हा कण्वशाखीय असून, त्याचे पित्याचें नांव नरहरि होतें. हा संवत् १७२३ च्या पूर्वी होऊन गेला आहे.

## हररात

हररातानें कूष्मांडप्रदीपिका नांवाचा एक व्याख्याग्रंथ लिहिला आहे. तो त्या व्याख्येच्या प्रारंभीं लिहितो कीं,

औवटं मंत्रभाष्यं च परीक्ष्य च पुनः पुनः ।
ग्रथ्यते हररातेन कूष्मांडस्य प्रदीपिका ॥

या ग्रंथाच्या दोन प्रती पंजाब युनिव्हर्सिटी पुस्तकालयांत आहेत. हा आपले व्याख्येंत रायमुकुट वगैरेंचा उल्लेख करीत असल्यानें संवत् १५०० नंतर झाला असावा. ही व्याख्या प्रायः कूष्मांडाची म्हणजे 'यद्देवा देवहेडनं' या तीन मंत्रांची असावी असें वाटतें. कारण, या तीन मंत्रांनाच कूष्मांड सूक्त ही संज्ञा आहे.



प्रकरण ५

# अष्टविकृति.

संहितेचा परिचय करून देतांना पदसंहिता व क्रमसंहिता यांचा निर्देश केला होता, तो केवल त्यांचें संहितात्व दाखविण्यापुरताच होय. आतां येथें त्यांचे प्रयोजन विकृति कालीं आहे, हें दाखवावयाचें आहे.

## पदपाठ

ऋग्वेदाचा पदपाठ जसा शाकल्यानें केला आहे असा उल्लेख आढळतो, तसा कण्वमाध्यंदिनांचा पदपाठ कोणी केला हें सांगतां येत नाहीं. कारण तसा उल्लेख कोठेंच आढळत नाहीं. या पदपाठाला योगा संहिता असेंही म्हणतात. पदसंहिता म्हणजे काय ? हें कात्यायनानें ' पदविच्छेदोऽसंहितः' या प्रातिशाख्य सूत्रानें सांगितलें आहे. संहितेला कारणभूत असलेलीं पदें निरनिराळीं म्हणणें याचेंच नांव पदसंहिता होय. एकंदर हीं पदें ३१५९७ आहेत. संहितेचें प्रयोजन यज्ञयाग, स्वाध्याय व नित्य, नैमित्तिक आणि काम्य कर्मानुष्ठान कालीं तत्तत्क्रियास्मारकत्व हें प्रसिद्धच आहे. पदपाठाचें (पदसंहिता) प्रयोजन स्वस्व अर्थाचा बोध करून देऊन तद्द्वारा वाक्यार्थ व मंत्रार्थ यांचा बोध करून देणें हें आहे. कारण, प्रत्येक क्रिया अर्थज्ञानपूर्वक केली पाहिजे. यास्कानें ' योऽर्थज्ञ इत्स सकलं भद्रमश्नुते ' जो अर्थ जाणतो तोच सर्व कल्याण प्राप्त करून घेतो, असें स्पष्ट म्हटलें आहे.

## क्रमपाठ

क्रमपाठालाच **योगरूढा संहिता** किंवा आर्षी संहिता असें म्हटलें आहे. हीच सर्व जटादि आठीं विकृतींची मूळ प्रकृति आहे. म्हणूनच 'क्रमपूर्वा मनिषिभिः, असें स्पष्ट प्रतिपादिलेलें दिसतें. ह्या क्रमपाठाचें प्रयोजन कात्यायनानें ' क्रमः स्मृतिप्रयोजनः ' प्रा. सू. अ. ४ । १८० या सूत्रानें सांगितलें आहे. संहिता व पदें यांच्यासंबंधीं दृढ स्मरण राहणें व दोन दोन पदांचे संधिकालीं वर्णसंहिता व उदात्तादि स्वरसंहिता यांचें ज्ञान करून देणें हें आहे. क्रम म्हणजे उत्तरोत्तर दोन दोन पदांचा संधि करून म्हणणें होय.

याशिवाय याज्ञवल्क्यशिक्षेंत संहितापाठाचें फल सूर्यलोक प्राप्ति,

पदपाठाचें फल चंद्रलोकप्राप्ति, क्रमपाठाचें फल सूक्ष्म अनामय अशा पदाची अर्थात् ब्रह्मभावाची प्राप्ति असेंही वर्णन आहे.

व्याकरणशास्त्रकारानें ' क्रमादिभ्यो वुन् ' या सूत्रानें क्रम व पद या शब्दांहून वुन् प्रत्यय करून पदक व क्रमक असें शब्द सिद्ध केले आहेत. ' पदमधीते पदकः ' ' क्रममधीते क्रमकः ' या सूत्रावरून पदपाठी पदक या नांवानें व क्रमपाठी क्रमक या नांवानें त्या कालीं संबोधिला जात असे, असें दिसून येतें.

## जटादि विकृति

या विकृति एकंदर ८ आहेत. व्याडीनें जटापटल म्हणून एक ग्रंथ केला आहे. त्यांत त्यांचें सलक्षण व सोदाहरण विवरण केलें आहे. त्यांत पुढीलप्रमाणें एक संग्राहक श्लोक आला आहे.

जटा माला शिखा रेखा ध्वजो दंडो रथो घनः ।
अष्टौ विकृतयः प्रोक्ताः क्रमपूर्वा महर्षिभिः ॥

१ जटा २ माला ३ शिखा ४ रेखा ५ ध्वज ६ दंड ७ रथ ८ घन अशा या क्रमपूर्वक म्हणावयाच्या आठ विकृति आहेत. त्यांच्यांत जटा व दंड या दोहोंना प्राधान्य आहे. कारण शिखा ही विकृति जटानुसारिणी व माला, रेखा, ध्वज व रथ ह्या विकृति दंडानुसारिणी होत. घन ही विकृति मात्र जटा व दंड या दोहोंना अनुसरणारी आहे. यापैकीं मालेचें पुष्पमाला व क्रममाला असे दोन भेद आहेत. तसेंच रथाचे ज्योत्स्नाकारांनीं तीन प्रकार [ भेद ] सांगितले आहेत. घनाचेही एक घन व एक घनवल्लभ असे दोन भेद सांगितले आहेत.

ह्या सर्व विकृतींत पांचच संधि मुख्य होत. त्या पांच संधींनींच सर्व विकृति झाल्या आहेत. वैदिक लोक हे पांच संधि केव्हां केव्हां स्वतंत्रपणें म्हणतात. त्या म्हणण्यास पंचसंधि असेंच म्हणतात. त्या पांच संधींचीं नांवें पुढीलप्रमाणें आहेत. :— १ अनुक्रम २ उत्क्रम ३ व्युत्क्रम ४ अभिक्रम ५ संक्रम.

या सर्व विकृतींच्या अध्ययन अध्यापनाचें फल आदित्यपुराणांत पुढीलप्रमाणें दिलें आहे.

जटादिविकृतीनां ये पारायणपरायणाः ।
महात्मानो द्विजश्रेष्ठास्ते ज्ञेयाः पंक्तिपावनाः ॥

जटाप्रभृति आठही विकृतींचें पारायण ( पठनपाठन ) करण्यामध्यें जे ब्राह्मण तत्पर असतात ते द्विजश्रेष्ठ होत व पंक्तिपावन करणारे होत. म्हणूनच ते महात्मे समजले पाहिजेत. याशिवाय वाराहपुराण, पाराशरस्मृति वगैरे ग्रंथांत विष्णुलोकप्राप्त्यादि पारलौकिक फलें सांगितलीं आहेत.

म्हणूनच फार पुरातन कालापासन आजपावेतों यज्ञयागादि महत् कृत्यांत व व्रतोद्यापनादि अल्प कृत्यांत, तसेंच विवाह उपनयनादि कृत्यांत वैदिक ब्राह्मणांना अत्यावश्यक म्हणून बोलाविण्याची पद्धति सुरू आहे. कारण, पूर्वी अन्नदोषाबद्दल फार सूक्ष्म विचार होत असे. सामुदायिक भोजनाचे प्रसंग जेथें प्राप्त होतात, तेथें त्या समुदायांत एकादा गूढ पापचारी मनुष्य असण्याचा पुष्कळ संभव असल्यानें त्याच्या संसर्गानें उत्पन्न होणाऱ्या प्रच्छन्न व अज्ञेय अन्नदोषांचें परिमार्जन होण्यासाठीं वर सांगितल्याप्रमाणें वैदिक ब्राह्मण पंक्तिपावनत्वासाठीं मुद्दाम बोलावीत. हल्लीं ती विचारसरणीच नष्ट झाली असून ह्या विद्येचा तितकासा आदर राहिला नाहीं. त्यामुळें ह्या विद्येंत पारंगत असलेले विद्वान् आजकाल हाताचे बोटावर मोजण्याइतकेच आढळतात, इकडे प्राच्य संस्कृतीचा अभिमान असणाऱ्या लोकधुरीणांनीं लक्ष पुरविणें जरूर आहे.

तसेंच ह्या वैदिक वर्गानें अविश्रांत परिश्रम करून आजपर्यंत वेदांचें संरक्षण अतिशय उत्तमपणें केलें आहे. त्यांच्या वेद कंठस्थ करण्याच्या पद्धतीनें आसेतुहिमाचल प्रदेशांत युगेंचीं युगें वेद हे प्रक्षिप्तता, पाठभेद वगैरेंचा प्रवेश न होतां एकरूपच राहिले ही त्यांची फार महत्वाची कामगिरी होय.



प्रकरण ६ वें

# ब्राह्मण ग्रंथ

## शतपथब्राह्मण

ब्राह्मण म्हणजे संहिताभागाचें प्रवचन होय. ‘ ब्रह्मण: वेदस्य मंत्रराशेः इदं नाम यज्ञक्रियादिरूपं प्रवचनं ब्राह्मणं ’ अशी ग्रंथवाची ब्राह्मण शद्वाची व्युत्पत्ति आहे. शतपथ ब्राह्मणाच्या सातव्या कांडांत ब्रह्म शद्व मंत्रवाचक दर्शविला आहे. ‘ ब्रह्म वै मंत्रः ’ १ - १ - ५. भाष्यकारांनीं ठिकठिकाणीं आपल्या भाष्यांतून ब्राह्मण शद्वाची व्याख्या वरील व्युत्पत्तीला अनुसरूनच केली आहे, हें त्यांच्या पुढें दिलेल्या भाष्यांच्या उताऱ्यांवरून सहज दिसेल. ‘ ब्राह्मणं नाम कर्मणस्तन्मंत्राणां च व्याख्यानग्रंथः ’ तै. सं. १ - ५ - १ इति भट्टभास्करः । ‘ तत्र शतपथब्राह्मणस्य मंत्रव्याख्यानरूपत्वाद् व्याख्येयमंत्रप्रतिपादकः संहिताग्रंथः पूर्वभावित्वात्प्रथमो भवति ’ कण्वसंहिता-भाष्ये सायणः । ‘ यद्यपि मंत्रब्राह्मणात्मको वेदस्तथापि ब्राह्मणस्य मंत्रव्याख्या-नरूपत्वान्मंत्रा एवादौ समाम्नाताः ’ तै. सं. भाष्ये सायणः । वाचस्पतिमिश्रांनीं केलेलें ब्राह्मणाचें लक्षणही वरील व्युत्पत्तीला अनुगुण असेंच आहे. नैरुक्त्यं यस्य मंत्रस्य विनियोगः प्रयोजनं । प्रतिष्ठानं विधिश्चैव ब्राह्मणं तदिहोच्यते ’ इति । मंत्राचें निर्वचन, विनियोग, प्रयोजन, कर्मस्मारकत्व, विधि वगैरे ज्या ग्रंथांत सांगितलें आहे त्यास ब्राह्मण म्हणावें. पूर्वमीमांसेच्या तिसऱ्या अध्यायांत जैमिनीनें ‘ तच्चोदकेषु मंत्राख्या । शेषे ब्राह्मणशद्वः ’ या दोन सूत्रांनीं मंत्राहून इतर जो वेदभाग त्यास ब्राह्मण म्हणावें, असें ठरविलें आहे.

### ब्राह्मण शद्वाचें ग्रंथवाचकत्व

ग्रंथवाची ब्राह्मण शद्वाचा प्रयोग प्रायः नपुंसकलिंगीच आढळतो. मेदिनी कोषांत णांत वर्गांत खालील प्रमाणें श्लोकार्ध आहे. ‘ ब्राह्मणं ब्रह्म-संघातें वेदभागे नपुंसकम् ’ इति । अर्थात् ब्रह्मसंघात ॐ म्हणजे मंत्रव्याख्यान

---

ॐ ब्रह्माणि नाम मन्त्राः संहन्यन्ते स्पष्टीक्रियन्ते व्याख्यायन्ते वा यस्मिन् तादृशे वेदभागे ब्राह्मणे इत्यर्थः ।

अशा वेदभागाचा वाचक ब्राह्मण शब्द नपुंसकलिंगी आहे. तसेंच ' दूरोहणं रोहति तस्योक्तं ब्राह्मणं ' ऐ. ब्रा. ६—२२ ' यद्गौरवीतं तस्योक्तं ब्राह्मणं ऐ. ब्रा. ८-२ ' यद्वाकोवाक्यं ब्राह्मणं तदेवैते नाप्नुवंन्ति ' शत. ब्रा. ४ - ६ - ९ - २० ' षष्टिश्च ह वै त्रीणि च शतानि संवत्सरस्याहोरात्रे इति च ब्राह्मणं समासेन ' ' सप्त च वै शतानि विंशतिश्च संवत्सरस्याहोरात्रा इति च ब्राह्मणं विभागेन विभागेन ' निरुक्त ४ - २७. या प्रमाणें ऐतरेय ब्राह्मण, शतपथ ब्राह्मण, निरुक्त वगैरे ग्रंथांतूनही ग्रंथवाची ब्राह्मण शब्द नपुंसकलिंगीच आला आहे. विष्णुधर्मोत्तरपुराण खंड ३ अध्याय ७ यांत मात्र ग्रंथवाची ब्राह्मण शब्द पुल्लिंगी दिला आहे. ' मंत्राः सब्राह्मणाः प्रोक्तास्तदर्थं ब्राह्मणं स्मृतं । कल्पना च तथा कल्पाः कल्पश्च ब्राह्मणस्तथा ' इति " मंत्रांबरोबरच ब्राह्मण सांगितले गेले आहेत. त्या मंत्रांचे व्याख्यानार्थच ब्राह्मणभाग आहे. कल्पना म्हणजे प्रयोगरचना व कल्प म्हणजे मंत्रांचा विनियोग या दोन्ही गोष्टी कल्पसूत्र व ब्राह्मणग्रंथ दाखवितात. " या श्लोकांत शेवटीं आलेलें ब्राह्मणपद पुल्लिंगी आहे. यास दुसरा पुरावा म्हणजे महाभारत उद्योगपर्व अ० १६ यांत पुढीलप्रमाणें श्लोक आला आहे. ' य इमे ब्राह्मणाः प्रोक्ता मंत्रा वै प्रोक्षणे गवां । एते प्रमाणं भवत उताहो नेति वासव ' इति । ' जे ब्राह्मण व मंत्र गाईच्या प्रोक्षणांत पढले गेले आहेत ते, हे इंद्रा, तुला प्रमाण आहेत किंवा नाहींत ? ' याही श्लोकांत ब्राह्मण शब्द पुल्लिंगीच आला आहे.

यावरून ग्रंथवाची ब्राह्मण शब्दाचा प्रयोग पुल्लिंगी व नपुंसकलिंगी असा उभयलिंगी आढळतो. त्यांतही विशेषतः नपुंसकलिंगीच अधिक आढळतो. याचें कारण आमचे मतें हेंच दिसतें कीं, पुल्लिंगी ब्राह्मण शब्द जसा ग्रंथवाचक तसाच ब्राह्मण जातिवाचकही आहे. त्यामुळें पुल्लिंगी ब्राह्मण शब्दाचा उच्चार करतांच दोन्ही अर्थ समोर उभे रहातात. तेव्हां नेमका एकच ग्रंथरूप अर्थ बोधित व्हावा म्हणूनच ग्रंथवाची ब्राह्मण शब्द नपुंसकलिंगीच रूढ केला गेला असावा.

## ब्राह्मण भागाचें वेदत्व

ब्राह्मण भागाचें वेदत्व अनादिकालापासून आजपर्यंत सर्ववादिसंमत आहे, हें पुढील सूत्रभाष्यकार, ऋषि, मुनि, आचार्य व पंडित

यांच्या उक्तींवरून स्पष्ट कळेल. ' मंत्रब्राह्मणयोर्वेदनामधेयम् ' आप. श्रौ. सू. २४।१।३१ सत्या. श्रौ. सू. १ । १ । ७ कात्या. पारि. प्रति. सूत्र १।१ ' मंत्रब्राह्मणं वेद इत्याचक्षते ' बौधा. गृह्यसूत्र २।६।३ बौधा. ध. सू. २।९।७ ' आम्नायः पुनर्मंत्राश्च ब्राह्मणानि च ' कौशि. सू. १।३ ' मंत्राश्च ब्राह्मणं च वेदः ' शबरः २।१।३३ ' मंत्रब्राह्मणयोर्वेदनामधेयम् । ' भट्टकुमारिलपादाः तंत्रवार्तिक १।३।१० ' वेदशब्देन ऋग्यजुःसामानि ब्राह्मणसहितान्युच्यंते ' मेधातिथिः मनु. २ । ६ ' वेदो मंत्रब्राह्मणाख्यो ग्रंथराशिः ' मस्करिः तै. सं. भा. १ । १ ' मंत्रब्राह्मणात्मको वेदः ' सायणाचार्यः तै. सं. भा. उपक्रमः १।१ ' ऋग्वेदादिगिरोच्यंते ऋग्यजुःसामलक्षणाः । अथर्वांगिरसस्तद्वन् मंत्रास्युर्ब्राह्मणोद्धृताः ॥ इतिहासादिसंभेदभिन्नं ब्राह्मणमेव तु । ब्राह्मत्र प्रसिद्धस्तु नेतिहासादिरिष्यते ॥ मंत्रब्राह्मणयोर्वेदनामधेयत्वकारणात् । ऋग्वेदादिगिरा तस्मान्मंत्रब्राह्मणयोर्ग्रहः ' सुरेश्वराचार्यः बृह. उप. भा. वार्तिक अ.२।४ ' तच्चोदकेषु मंत्राख्या शेषे ब्राह्मणशब्दः ' जैमिनिः अ.२।१।३३. या सर्व वचनांचें तात्पर्य असें आहे कीं, मंत्र व ब्राह्मण या दोन्ही भागाला ही वेद संज्ञा आहे. दोन्हीही वेदशब्दानें प्रसिद्ध असल्याचें सर्वविश्रुत आहे.

अलीकडे आर्यसमाजाचे अध्वर्यु दयानंदसरस्वती यांनीं आपल्या ऋग्वेदादि भाष्यभूमिकेच्या वेदसंज्ञाविचारविषयक प्रकरणांत ' मंत्रांनाच वेद संज्ञा आहे, ब्राह्मणग्रंथांना नाहीं, अशी आरोळी ठोकली असून तिचे समर्थनार्थ बरेच हेत्वाभास मांडले आहेत. त्या सर्व हेत्वाभासांचें निराकरण ' महामोहविद्रावण ' या ग्रंथकारानें फार उत्कृष्ट केलें आहे. सनातनधर्मप्रदीप या ग्रंथाच्या प्रमाणप्रकाश भागांत सदरील महामोहविद्रावण ग्रंथाचा उद्धार करून अत्यंत विस्तारानें व निःपक्षपातानें दयानंदांच्या सर्व हेत्वाभासांचें खंडन फारच मार्मिकपणें केलें आहे. त्याचा उतारा येथें विस्तारभयास्तव देत नाहीं. वाचकांनीं तो तेथें त्याच शब्दांत पहावा.

पुनः दयानंदांच्या हेत्वाभासांची री ओढण्याकरितांच कीं काय कोण जाणे, प्रो. भगवद्दत्त लाहोर यांनीं ' वैदिक वाङ्मयका इतिहास ' या नांवाचें भागद्वयात्मक एक पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें आहे. त्याचे दुसरे

भागांत ' क्या ब्राह्मण वेद है ' या मथळ्याखालीं एक स्वतंत्र प्रकरण लिहून बराच अट्टाहास केला आहे. त्यांच्या बारीकसारीक सर्व आक्षेपांचें खंडन येथें करीत बसण्यापेक्षां अन्यत्र अवसरानें करूं. तूर्त येथें त्यांच्या सर्व आक्षेपांस खालील एकच उत्तर पुरे.

" अस्य महतो भूतस्य निःश्वसितमेतद्यदृग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्वांगिरस इतिहासः पुराणं विद्या उपनिषदः श्लोकाः सूत्राण्यनुव्याख्यानानि व्याख्यानान्यस्यैवैतानि निःश्वसितानि । " बृह. उप. अ. २ ब्रा. ४ कं. १००. यावरील शंकराचार्यांचें भाष्य असें कीं, " इतिहास इत्युर्वशीपुरूरवसोः संवादादिरुर्वशीहाप्सरा इत्यादि ब्राह्मणमेव । पुराणमसद्वा इदमग्र आसीदित्यादिविद्यादेवजनविद्या सोऽयमित्याद्या । उपनिषदः प्रियमित्येतदुपासीतेत्याद्याः । श्लोका ब्राह्मणप्रभवा मंत्रास्तदेते श्लोका इत्यादयः । सूत्राणि वस्तुसंग्रहवाक्यानि वेदे यथाऽऽत्मेत्येवोपासीतेत्यादीनि । अनुव्याख्यानानि मंत्रविवरणानि व्याख्यानान्यर्थवादाः । अथवा वस्तुसंग्रहवाक्यविवरणान्यनुव्याख्यानानि यथा चतुर्थाध्याये आत्मेत्येवोपासीतेत्यस्य यथा वाऽन्योऽसावन्योऽहमस्मीति न सवेद यथा पशुरेवमित्यस्यायमेवाध्यायशेषः । मंत्रविवरणानि व्याख्यानानि । एवमष्टविधं ब्राह्मणं । एवं मंत्रब्राह्मणयोरेव ग्रहणं । नियतरचनावतो विद्यमानस्यैव वेदस्याभिव्यक्तिः । पुरुषनिःश्वासवन्न च पुरुषबुद्धिप्रयत्नपूर्वकः । अतः प्रमाणनिरपेक्ष एव स्वार्थे । तस्माद्यत्तेनोक्तं तत्तथैव प्रतिपत्तव्यं । आत्मनः श्रेय इच्छद्भिर्ज्ञानं वा कर्म वा ' इति ॥

या श्रुतींत संहिता व ब्राह्मण हे दोन्ही वेदविभाग परमेश्वराचे निःश्वसित आहेत असें म्हटलें आहे. ' अस्य महतो भूतस्य निःश्वसितं ' ' अस्यैवैतानि निःश्वसितानि ' ह्या उपक्रमोपसंहारावरून मध्यगामी अभ्यस्त इतिहास, पुराण, उपनिषद्, श्लोक वगैरे सर्व प्रकार वेदांतर्गतच समजले पाहिजेत. म्हणूनच शंकराचार्यांनीं आपल्या भाष्यांत या सर्व श्रुतींचें व्याख्यान ब्राह्मणपर करून शेवटीं ' एवमष्टविधं ब्राह्मणं ' ' एवं मंत्रब्राह्मणयोर्ग्रहणं ' असा भाष्याचा उपसंहार केला आहे व श्रुतींतील ' ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्वांगिरसः ' या ठिकाणच्या वेद शब्दांनीं मंत्र व ब्राह्मण या दोन्हींचेंहि

ग्रहण होतें, असा जो सिद्धांत मांडला तोच युक्त होय. तो साक्षात् श्रुतिप्रोक्त आहे. अर्थात् प्रोफेसरमहाशयांनीं स्वपक्षाचें समर्थन करण्याकरितां प्रमाणसर्वस्व म्हणून उद्धृत केलेली 'एवमिमे सर्वे वेदा निर्मिताः' इत्यादि गोपथश्रुति व उपरिनिर्दिष्ट बृहदारण्यकश्रुति, एक विषय प्रतिपादन करणारी असल्यामुळें समानार्थकच होत. शब्दोपात्त अर्थ व अनुमित अर्थ ह्या दोहोंत शब्दोपात्त अर्थच बलवत्तर असतो. या न्यायानें विचार करितां प्रोफेसर-महाशयांनीं गोपथश्रुतीवरून काढलेलें अनुमान बृहदारण्यकश्रुतीनें बाधित असल्यामुळें तें हेत्वाभासात्मक आहे, हें निराळें सांगण्याची जरूरी नाहीं. ह्याचप्रमाणें प्रोफेसरमहाशयांचे इतर सर्व आक्षेप अनुमानमूलक असून तीं अनुमानें बृहदारण्यादि प्रत्यक्ष श्रुतिविरुद्ध आहेत हें आम्ही 'स्थालीपुलक' न्यायानें दर्शविलें आहे. ह्या सर्व गोष्टी आमच्या सूत्रभाष्यकारांच्या व शास्त्रकारांच्य पुढें होत्या, म्हणूनच त्यांनीं आरंभीं सांगितल्याप्रमाणें मंत्रभागा-बरोबर ब्राह्मणभागाचेंही वेदत्व प्रतिज्ञापूर्वक प्रतिपादन केलें हें येथपर्यंतच्या सर्व विवरणावरून सहजच लक्षांत येईल.

तात्पर्यः— जशी मंत्रभागाला वेद ही संज्ञा आहे, तशीच वेद संज्ञा ब्राह्मणभागालाही आहे, हें निश्चित होय.

## ब्राह्मणाचे अवांतर भेद

हे ब्राह्मण ग्रंथ शुक्लयजुर्वेदीय पंधरा शाखांचे पंधरा आहेत, हें आम्ही पूर्वार्धात शाखाविवरण प्रकरणीं त्या त्या ब्राह्मणांतील वाक्यें उद्धृत करून दाखविलें आहेच. त्यापैकीं आज कण्व व माध्यंदिन या दोन शाखांचेच ब्राह्मणग्रंथ समग्र उपलब्ध आहेत. या सर्व ब्राह्मणांना '**शतपथ ब्राह्मण**' अशी संज्ञा आहे. शतपथ ही संज्ञा 'शतं पंथानो मार्गा नाम अध्याया यस्य स शतपथः' या व्युत्पत्तीवरून शंभर अध्यायात्मक असल्यामुळें त्यांना शतपथ अशी संज्ञा मिळाली आहे. असें एग्लिङ्गमहाशयानें आपल्या शतपथ ब्राह्मणाच्या भूमिकेंत म्हटलें आहे, व हें त्यांचें म्हणणें युक्तियुक्तही वाटतें. कारण 'शतपथवत्तांड्यभाल्लविनां ब्राह्मणस्वराः' या भाषिकसूत्रावरील भाष्यकारानें '**शतपथश्च शताध्यायैः**' असें स्पष्ट म्हटलें आहे. तसेंच कात्यायनानें तिसऱ्या प्रतिज्ञा परिशिष्टांत शतपथाच्या अंतर्गत अशीतिपथ षष्टिपथ पंचदशपथ असे विभाग सांगितले असून त्यांची उपपत्ति, असा

अर्थ ग्रहण केल्यावांचून लागत नाहीं. वरील अर्थ ग्रहण केला असतां ऐंशीव्या अध्यायापर्यंतच्या शतपथब्राम्हणाच्या पोटविभागाला अशीतिपथ ही संज्ञा व साठाव्या अध्यायापर्यंतच्या पोटविभागाला षष्टिपथ ही संज्ञा यथार्थ लागू पडते. षष्टिपथ या संज्ञेसंबंधानें ' क्रतूक्थादिसूत्रान्ताठ्ठक् ' पा. सू. ४ । २ । ६० या सूत्रावरील वार्तिकांत वार्तिककार कात्यायनानें म्हटलें आहे कीं, ' शतषष्टेः षिकन्पथः ' ' शतशब्दाच्छष्टिशब्दाच्च परो यः पथिन् शब्दस्तदन्तात् षिकन् वाच्यः ' शत शब्द व षष्टि शब्द या दोन्ही शब्दानंतर असलेल्या पथ शब्दाहून षिकन् प्रत्यय केला असतां ' शतपथमधीते शतपथिकः ' ' षष्टिपथमधीते षष्टिपथिकः ' असे शब्द सिद्ध होतात. प्रथमप्रभृति नवमकांडपर्यंतच भाग हा साठ अध्यायात्मक असल्यामुळें त्याला षष्टिपथ असें म्हणत, व तितकाच भाग विशेष रीतीनें अध्ययन व अध्यापन केला जात होता. कारण, माध्यंदिन शतपथांत नवम कांडापर्यंत अग्निचयनयाग सर्व बाजूनें परिपूर्ण होतो. जरी दहाव्या कांडांत चयनयागासंबंधीचे कांहीं विषय आले आहेत, तथापि ते प्रयोगाच्या दृष्टीनें मुख्य नाहीत. ज्ञानाच्या दृष्टीनें मात्र ते विशेष महत्वाचे होत. सौमिक भाग येथें पुरा होत असल्यानें ह्या षष्टिपथसंज्ञक विभागाची अध्ययन-अध्यापन-परंपरा विशेष रूढ असणें स्वाभाविक होय व हें ' विभक्ति-समीप० ' पा. सू. २ । १ । ६ या सूत्रांतील अंत शब्दाच्या उदाहरणांत ' अग्निग्रंथपर्यंतमधीते स साग्निः । अग्निशब्दश्चात्र तद्बोधके ग्रंथे वर्तते इति तद्व्याख्यातारः । ' दिलेल्या ह्या उदाहरणावरून स्पष्ट होत आहे. याच न्यायानें अशीतिपथ ही संज्ञा १ ते ८० अध्यायापर्यंतच्या भागाला मिळाली असली पाहिजे. कारण, येथपर्यंत प्रायः उत्तरक्रतु सर्व समाप्त होतात. तसेंच १ ते १५ अध्यायापर्यंतच्या कांडद्वयात्मक भागाला पंचदशपथ ही संज्ञा दिली आहे. येथपर्यंत हविर्यज्ञ [ ऐष्टिक ] प्रकरण पूर्ण होतें. यावरून प्राचीन कालीं पंधरा अध्यायापावेतों शतपथाचें अध्ययन करणारे पंचदशपथिक, साठ अध्यायापावेतों शतपथाचें अध्ययन करणारे षष्टिपथिक, ऐंशी अध्यायापावेतों शतपथाचें अध्ययन करणारे अशीतिपथिक व संपूर्ण शतपथाचें अध्ययन करणारे शतपथिक म्हटले जात असत असें दिसतें. सांप्रत ह्या पद्धतीनें शतपथ ब्राह्मणाची अध्ययन-अध्यापन-परंपरा सर्वांशानें भारतवर्षांतून नष्ट झाली आहे. नाशिक, बडोदें व मुल्हेर या तीन ठिकाणींच

शतपथ ब्राह्मणाची अध्ययन-अध्यापन-परंपरा दिसते. परंतु ती वरीलप्रमाणें नसून प्रपाठकात्मक आहे. निरनिराळ्या कांडांतील आठ प्रपाठक निवडून ठरविले आहेत तेवढेच कंठस्थ करावयाचे म्हणजे तो ब्राह्मणपाठी झाला, असें समजतात.

ह्या कण्वमाध्यंदिन शतपथ ब्राह्मणांचे कांड, अध्याय, प्रपाठक, ब्राह्मण, कंडिका अशा स्वरूपानेंही पोटविभाग आहेत. ते खालीं दिलेल्या दोन कोष्टकांवरून सहज दिसून येतील.

माध्यंदिन शतपथ ब्राह्मणांतील कांडांचीं नांवें.

१ हविर्यज्ञ.
२ एकपादिका.
३ अध्वर.
४ ग्रह.
५ सव.
६ उखासंभरण.
७ हस्तिघट.
८ चिति.
९ संचिति.
१० अग्निरहस्य.
११ अष्टाध्यायी.
१२ मध्यम
१३ अश्वमेध
१४ बृहदारण्यक.

कण्व शतपथ ब्राह्मणांतील कांडांचीं नांवें.

१ एकपात्
२ हविर्यज्ञ
३ उद्धारि.
४ अध्वर.
५ ग्रह.
६ वाजपेय.
७ राजसूय.
८ उखासंभरण.
९ हस्तिघट.
१० चिति.
११ साग्निचिति ( संचिति. )
१२ अग्निरहस्य.
१३ अष्टाध्यायी.
१४ मध्यम.
१५ अश्वमेध.
१६ प्रवर्ग्य.
१७ बृहदारण्यक.

यापैकीं १० । ११ । १२ । १३ । १४ या कांडांना महाभारतांत

निरनिराळीं नांवें दिलीं असल्याचें आढळून येतें. ' ततः षष्टिपथं कृत्स्नं सरहस्यं ससंग्रहं । चक्रे स पारिशेषं च सोत्तरं च प्रहर्षितः ' इति महाभारत-शांतिप. मोक्षध. अ. ४३ श्लो. १६. १ ते ९ कांडपर्यंतचा भाग षष्टिपथ-संज्ञक होय, हें आम्ही वर सांगितलें आहेच. १०वें कांड रहस्य नांवाचें, ११वें कांड संग्रह नांवाचें, १२ व १३ हीं दोन्हीं कांडें परिशेष, आणि १४वें कांड उत्तर या संज्ञेनें प्रसिद्ध आहेत. मध्यम कांडाच्या ' मध्यम ' या नांवावरून एग्लिङ् प्रभृतींनीं बरेच कुतर्क केले आहेत. त्यांचें म्हणणें असें कीं, माध्यंदिन हा शब्द मध्यम ह्या अर्थाचा वाचक असल्यानें ही शाखा फार पुरातन असली पाहिजे. माध्यंदिन शतपथ ब्राह्मणाच्या चौदा कांडापैकीं कांहीं कांडें अलीकडचीं असावींत. कारण, १२व्या कांडाला मध्यमकांड असें ज्या अर्थीं म्हणतात त्या अर्थीं १० ते १४ हीं पांचच कांडें त्या कालीं प्रधान असावींत व नंतर मागाहून त्यांना १ ते ९ हीं कांडें जोडलीं गेलीं असावींत. परंतु हें त्यांचें म्हणणें बरोबर नाहीं. कारण, महाभारतांत १ ते ९ हीं कांडें १० ते १४ या कांडासह झाल्याचें स्पष्ट म्हटलें आहे. तें नुकतेंच आम्हीं वर दाखविलें आहे. तसेंच माध्यंदिन हा शब्द मध्यम, या अर्थाचा वाचक संस्कृत वाङ्मयांत कोठेंही आला नाहीं. तर तो ज्याप्रमाणें ' कण्वेन महर्षिणा दृष्टा शाखा काण्वी ' कण्व महर्षीनें पाहिलेली शाखा काण्वी त्याचप्रमाणें ' मध्यंदिनेन मुनिना दृष्टा शाखा माध्यंदिनी ' मध्यंदिनमुनीनें पाहिलेली शाखा माध्यंदिनी । ह्या अर्थानेंच प्रयुक्त केलेला आढळतो. १२व्या कांडाला मध्यम ही संज्ञा त्यांतील प्रतिपाद्य सर्वसाधारण विषयामुळेंच मिळाली असली पाहिजे असें आम्हांस वाटतें.

शतपथ ब्राह्मणांत ६ ते ९ या चार कांडांत शांडिल्याचें नांव पुष्कळ वेळां आलें आहे, याज्ञवल्क्याचा उल्लेख कमी आला आहे. यावरून वेबर, एग्लिंग व तदनुवादी प्रो. भगवद्दत्त हे असें अनुमान करतात कीं, १०वें कांड व वरील चार कांडें शांडिल्याचीं असावींत, व दहाव्या कांडाला शांडिल्यकांड असें नांव असावें. परंतु हें त्यांचें अज्ञान आहे. कारण, ६ ते ९ कांडांत ठिकठिकाणीं शांडिल्याचार्यांच्या मताचा अनुवाद केला आहे, व १०व्या कांडांत शांडिल्य नामक विद्या सांगितली आहे. तेवढ्यावरून त्याचें कर्तृत्व किंवा त्या नांवाचें कांड होऊं शकत नाहीं.

## माध्यंदिन शतपथ ब्राह्मण

| कांड | अध्याय | प्रपाठक | ब्राह्मण | कंडिका |
|---|---|---|---|---|
| १ | ९ | ७ | ४० | ८३७ |
| २ | ६ | ५ | २४ | १०४ |
| ३ | ९ | ७ | ३७ | ८५९ |
| ४ | ६ | ५ | ३८ | ६४८ |
| ५ | ५ | ४ | २५ | ४७१ |
| ६ | ८ | ५ | २७ | ५३० |
| ७ | ५ | ४ | १२ | ३९८ |
| ८ | ७ | ४ | २७ | ४३७ |
| ९ | ५ | ४ | १५ | ४०२ |
| १० | ६ | ४ | ३० | ३६९ |
| ११ | ८ | ४ | ४२ | ४३७ |
| १२ | ९ | ४ | २९ | ४५९ |
| १३ | ८ | ४ | ४३ | ४३२ |
| १४ | ९ | ७ | ४६ | ७९६ |
| १४ | १०० | ६८ | ४३६ | ७१७९ |

## काण्व शतपथ ब्राह्मण

| कांड | अध्याय | ब्राह्मण | कंडिका |
|---|---|---|---|
| १ | ६ | २२ | ३७६ |
| २ | ८ | ३२ | ५३२ |
| ३ | २ | २२ | १२४ |
| ४ | ९ | ३६ | ६४९ |
| ५ | ८ | ३८ | ९७४ |
| ६ | २ | ७ | ७०० |
| ७ | ५ | १९ | २८९ |
| ८ | ८ | २७ | ५११ |
| ९ | ५ | १६ | २५७ |
| १० | ५ | २० | २४३ |
| ११ | ७ | २० | ४३७ |
| १२ | ६ | २८ | २८६ |
| १३ | ८ | ३१ | २४१ |
| १४ | ९ | २ | ३९२ |
| १५ | ८ | ४४ | ३०८ |
| १६ | २ | ८ | ११२ |
| १७ | ६ | ४७ | २९५ |
| १७ | १०४ | ४३५ | ६८०६ |

अक्षरसंख्या १९२००० श्लोकसंख्या २४०००

ब्रह्मयज्ञादि नित्य स्वाध्यायविधींत ह्यांचा अध्यायादि विभागांनेंच अध्ययनक्रम सूत्रकारांनीं सांगितला आहे. माध्यंदिन शतपथांत प्रपाठक विभाग दिला असून काण्व शतपथांत तो मुळींच नाहीं. यावरून प्रपाठकात्मक विभाग वैदिक लोकांनीं ग्रंथ कंटस्थ करण्याच्या दृष्टीनें कल्पिलेला असावा. ह्याशिवाय अंतर्गत ब्राह्मणांना त्यांच्यांतील प्रतिपाद्य विषयावरून सृष्टि ब्राह्मण, संभार ब्राह्मण, नक्षत्र ब्राह्मण, आधान ब्राह्मण, प्रयाज ब्राह्मण, अनुयाज ब्राह्मण, पत्नीसंयाज ब्राह्मण, इत्यादि संज्ञा भाष्यादिकालीं भाष्यकारांनीं व्यवहारार्थ दिल्या आहेत. त्या सर्व येथें विस्तारभयास्तव देणें शक्य नाहींत. जिज्ञासूंनीं त्या भाष्यादि स्थळींच पहाव्या. १४ व्या बृहदारण्यक कांडाचें विवरण उपनिषदाचें विवरणाचे वेळीं स्वतंत्रपणें करूं.

आतां कण्व व माध्यंदिन शतपथांतील फरक व विषयक्रम यांचा विचार करूं. त्यापैकीं माध्यंदिन शतपथाच्या १ ते ९ कांडांत एक पिंडपितृयज्ञ खेरीजकरून प्रायः संहितेच्याच क्रमानें विषय आले आहेत. संहितेंत पिंडपितृयज्ञ दर्शपूर्णमासानंतर दिला आहे तर ब्राह्मणांत तो आधानानंतर दिला आहे, इतकाच भेद आहे. बाकीच्या १० ते १४ कांडांतही विषयक्रम संहितेप्रमाणेंच दिसतो. कण्व माध्यंदिन या दोघांच्याही संहितांचा प्रारंभ दर्शपूर्णमास यागापासून आहे. ब्राह्मणांचा प्रारंभ मात्र भिन्न भिन्न आहे. माध्यंदिनांच्या शतपथाचा प्रारंभ दर्शपूर्णमासापासून असून कण्वांच्या शतपथाचा प्रारंभ आधानापासून आहे. म्हणजे माध्यंदिन शतपथाचें जें प्रथम कांड तें कण्व शतपथाचें दुसरें कांड व जें द्वितीय कांड तें पहिलें कांड, इतकाच फरक आहे. याशिवाय क्वचित् क्वचित् विषयांचा क्रम मागें पुढें आहे. तो पुढें दिलेल्या दोन्ही ब्राह्मणांच्या स्थूल विषयसूचीवरून सहज ध्यानांत येईल.

## माध्यंदिन शतपथ

| कांड | विषय |
|---|---|
| १ | दर्शपूर्णमासेष्टि. |
| २ | आधान, पुनराधान, अग्निहोत्र, उपस्थान, प्रवत्स्यदुपस्थान, आगतोपस्थानादि, पिंडपितृयज्ञ, आग्रयण, दाक्षायणयज्ञ, चातुर्मास्ययाग. |
| ३ | सोमयाग. दीक्षाभिषवपर्यंत. |

४ सोमयाग, सवनत्रयगतकर्म, षोडशीप्रभृति–सोमसंस्था, द्वादशाहयाग, त्रिरात्राहीन–दक्षणा, सत्रधर्म.

५ वाजपेय, राजसूय.

६ उखासंभरण, विष्णुक्रम, वात्सप्रोपस्थान, वनीवाहन [ प्रवास ].

७ चयन, गार्हपत्यचयन, निर्ऋतिचयन, अग्निक्षेत्रसंस्कार, दर्भस्तंबादि अपस्यासादनपर्यंत.

८ प्राणभृदादि चयनसमाप्ति.

९ शतरुद्रीय होमादि, धिष्ण्यचयन, पुनश्चिति, चित्युपस्थान.

१० चितिसंपत्ति, चयनयागस्तुति, चित्यपक्षपुच्छविचार, सप्तविधप्रभृति एकशतविधपर्यंत चित्याग्नि वेदिमान, सप्तविधादि एकशतविधसंपत्ति, चयन-कालादि विचार, चित्याग्नीची छंदांनीं अवयवसंपत्ति, संवत्सरादि मुहूर्तपर्यंत चयनसंपत्ति, यजुष्मती लोकंपृणा इत्यादिकांची संख्या, उपनिषद्रूपानें अग्नीची उपासना, मनःसृष्टि, लोकादि रूपानें अग्नीची उपासना, अग्नीचें सर्वतोमुखत्व, संप्रदायप्रवर्तक ऋषिवंशकथन, अग्निरहस्य.

११ आधानकाल, दर्शपूर्णमास व दाक्षायणयज्ञ यांच्या अनुष्ठानाचा अवधिकाल, दाक्षायणयज्ञ, पथिकृदिष्टि, अभ्युदितेष्टि, दर्शपूर्णमाससंबंधी अर्थवाद, प्रयाजानुयाजानुमंत्रण, इडा – स्विष्टकृत् – सूक्तवाक – शंयुवाक – पत्नीसंयाज – वेदालंभ – समिष्टयजु – प्रधानयाग, यांचेसंबंधीं अर्थवाद, अग्निहोत्रविषयक अर्थवाद, ब्रह्मचारीकर्तव्य, मित्रविंदेष्टि, हविःसमृद्धि, चातुर्मास्यविषयक अर्थवाद, पंचमहायज्ञ, स्वाध्यायप्रशंसा, प्रायश्चित्त, अंशु व अदाभ्यग्रह, अध्यात्मविद्या, पशुबंधप्रशंसा, हविर्यज्ञविध व सवनिध यांचें लक्षण, षड्ढोतार होम.

१२ दीक्षाक्रम, सत्र, पृष्ठ्याभिप्लव, स्वरसाम, विषुवन्महाव्रतप्रभृतींचें निरूपण, गवामयन, अग्निहोत्रप्रायश्चित्त, मृतकाग्निहोत्र, मृतकदाह.

१३ अश्वमेध, तद्गतप्रायश्चित्त, पुरुषमेध, सर्वमेध, दशरात्र, पितृमेध.

१४ प्रवर्ग्य [ घर्म ], महावीर, प्रवर्ग्योत्सादन, प्रवर्ग्यकर्तृक नियम, बृहदा-रण्यक (ब्रह्मविद्या), काम्यश्रीमंथ, पुत्रमंथ, वंशब्राह्मण.

## कण्व शतपथ

| कांड | विषय |
|---|---|
| १ | आधान, पुनराधान, अग्निहोत्र, आग्रयण, पिंडपितृयज्ञ, दाक्षायणयज्ञ, उपस्थान, प्रवत्स्यदुपस्थान, चातुर्मास्ययाग. |
| २ | दर्शपूर्णमासेष्टि. |
| ३ | अग्निहोत्रविषयक अर्थवाद, दर्शपूर्णमासविषयक अर्थवाद. |
| ४ | सोमयाग, दीक्षा, अभिषवप्रभृति. |
| ५ | सोमयाग, सवनत्रयगतकर्म, षोडशीप्रभृति सामसंस्था, द्वादशाहयाग, त्रिरात्राहीन दक्षणा, चतुस्त्रिंशद्धोम, सत्रधर्म. |
| ६ | वाजपेय. |
| ७ | राजसूय. |
| ८ | उखासंभरण. |
| ९–१२ | चयन. |
| १३ | आधानकाल, पथिकृदिष्टि, प्रयाजानुयाजानुमंत्रण, शंयुवाक, पत्नीसंयाज, ब्रह्मचर्य, दर्शपूर्णमासशेष, पशुबंध. |
| १४ | दीक्षाक्रम, पृष्ठ्याभिप्लवप्रभृति, सौत्रामणि, अग्निहोत्रप्रायश्चित्त, मृतकाग्निहोत्र. |
| १५ | अश्वमेध. |
| १६ | प्रवर्ग्य. |
| १७ | बृहदारण्यक. |

शतपथ ही संज्ञा जशी शुक्लयजुर्वेदांतर्गत पंचदश शाखांच्या ब्राह्मणग्रंथांना आहे, तशी ती सामवेदांतर्गत तांड्य व भाल्लवि यांच्या ब्राह्मणग्रंथांनाही आहे, असें पुढील भाषिकसूत्र व तद्भाष्य यावरून दिसून येतें. 'शतपथवत्तांडिविभाल्लविनां ब्राह्मणस्वराः' अत्र भाष्यं 'शतपथ इत्युपसंहाराद्यासु शाखासु शतपथोऽस्ति तास्वेव तदुपादिष्टस्वराः । ताश्च काण्वमाध्यंदिनाद्याः तांडिनो भाल्लविनश्च ।' इति. तसेंच कण्व शतपथाचे जरी १०४ अध्याय आहेत तरी त्यालाही शतपथ ही संज्ञा छत्रिन्यायानें रूढ आहे.

पुनः ह्या ब्राह्मणभागाचे कात्यायनानें प्रतिज्ञापरिशिष्टांत 'विधिर्निंदा प्रशंसाऽध्यात्ममधियज्ञमाधिदैवतमधिभूतमनुवचनं परप्रकृतिः पुराकल्पः सृष्टिरिति

त्या व तत्समानार्थक इतक्याच शाखांचें ज्ञान होईल. आतां ज्या शाखेंत मंत्रार्थ पूर्णपणें विवरण केला असेल, तसेंच अध्वर्युसंबंद्ध यज्ञकर्म शाखांतराच्या अपेक्षेवांचून पूर्ण निरूपण केलेलें असेल व परतत्त्व म्हणजे ब्रह्मविद्या ही करतलामलकवत् जेथें प्रतिपादन केलेली असेल, त्या शाखेचें तूं व्याख्यान कर. या राजाच्या आज्ञेप्रमाणें तपासकारितां हे सर्व गुण माध्यंदिन शतपथ ब्राह्मणांत आढळून आल्यामुळें मी त्याचें व्याख्यान करीत आहे. " सायणाचार्यांच्या उक्तिवरून इतर ब्राह्मण ग्रंथापेक्षां शतपथ ब्राह्मणालाच इतकें महत्त्व कां हें सहज स्पष्ट होत आहे. याबद्दल अधिक विस्तारानें सांगण्याची जरूरी आहे असें वाटत नाहीं.



प्रकरण ७ वें

# शतपथ ब्राह्मणावरील भाष्यकार

## माध्यंदिन शतपथ ब्राह्मण भाष्यकार
## हरिस्वामी

माध्यंदिन शतपथ ब्राह्मणावर हरिस्वामीनें भाष्य केलें आहे. त्यानें आपल्या भाष्यांत प्रत्येक अध्यायाचे शेवटीं पुढील श्लोक दिला आहे.

नागस्वामिसुतोऽवन्त्यां पाराशर्यो वसन् हरिः।
श्रुत्यर्थं दर्शयामास शक्तितः पौष्करीयकः॥
श्रीमतोऽवन्तिनाथस्य विक्रमार्कस्य भूपतेः।
धर्माध्यक्षो हरिस्वामी व्याख्यच्छातपथीं श्रुतिं॥

इति श्रीमदाचार्यहरिस्वामिनः कृतौ शतपथभाष्ये नवमोध्यायः समाप्तः

पाराशरगोत्रोत्पन्न व पुष्करणा-ब्राह्मण-कुलोत्पन्न नागस्वामीचा पुत्र हरिस्वामी अवंतीक्षेत्रांत [ सांप्रतचें उज्जयनीक्षेत्र ] राहून राजा विक्रमार्कांचे धर्माध्यक्ष पदावर आरूढ होऊन शतपथ श्रुतीचें व्याख्यान करता झाला. हरिस्वामीनें आपलें शतपथभाष्य संन्यासग्रहणानंतर केलें असावें असें खालील अध्यायसमाप्तीच्या श्लोकावरून व लेखावरून दिसतें.

भूभर्त्रा विक्रमार्केण क्लृप्तां कनकवेदिकां॥
दानायाध्यास्य कृतवान् श्रुत्यर्थविवृतिं हरिः॥

" इति श्रीसर्वविद्यानिधानकवींद्राचार्यसरस्वतीनां शुक्लयजुर्वेदीये माध्यंदिनशतपथब्राह्मणभाष्ये हविर्यज्ञं नाम प्रथमकांडं समाप्तम् " इति॥

कारण सर्व विद्या पारंगत कवींद्राचार्यसरस्वती हें नांव संन्यासाश्रमाचें द्योतक असल्याचें दिसतें. ह्याचा जन्मकाल जो विक्रमार्कांचा राज्यकाल तोच होय. अर्थात् हा विक्रमार्क राज्य करीत असतां म्हणजे १९०० वर्षांपूर्वी होऊन गेला असला पाहिजे. हरिस्वामीचें समग्र भाष्य आज उपलब्ध नाहीं. बर्लिन येथें वेबरनें छापलेल्या व कलकत्ता येथें सत्यव्रत सामाश्रमी यानें छापलेल्या व मुंबई येथें लक्ष्मी वेंकटेश प्रेस मध्यें छापलेल्या प्रतींतून सायणाचार्यांचें भाष्य संपूर्ण न मिळाल्यामुळें त्या ऐवजीं संगृहीत

केलेला कांहीं कांहीं भाग आढळतो.

## सायणाचार्य

महाराज हरिहर याच्या आज्ञेवरून सुप्रसिद्ध चारही वेदांचा भाष्यकर्ता सायणाचार्य यानेंही माध्यंदिन शतपथावर **वेदार्थप्रकाश** नांवाचें भाष्य केलें आहे. हें खालील अध्यायसमाप्तीच्या लेखावरून दिसून येईल.

" **इति श्रीमद्राजाधिराजपरमेश्वरवैदिकमार्गप्रवर्तकश्रीहरिहर-साम्राज्यधुरंधरेण सायणाचार्येण विरचिते माधवीये वेदार्थप्रकाशे माध्यंदिनशतपथब्राह्मणभाष्ये प्रथमकांडे षष्ठाध्यायः समाप्तः ॥** " इति

यानें आपलीं सर्व भाष्यें आपला ज्येष्ठ भ्राता माधवाचार्य याचे सांगण्यावरून लिहिलीं असावीं व त्याचेच आदरार्थ त्यांना माधवीय असें म्हटलें असावें असें ' **स प्राह नृपतिं राजन्सायणार्यो ममानुजः । सर्वं वेत्त्येष वेदानां व्याख्यातृत्वेन युज्यतां ॥ इत्युक्तो माधवार्येण वीरबुक्कमहीपतिः । अन्वगात्सायणाचार्यं वेदार्थस्य प्रकाशने ।** ' इति ( ऋ. भा. उपक्रम ) या श्लोकावरून वाटतें. तसेंच याचे गुरूचें नांव विद्यातीर्थ होतें हें पुढील श्लोकावरून स्पष्ट दिसतें.

**वेदार्थस्य प्रकाशेन तमोहार्दं निवारयन् ।**
**पुमर्थांश्चतुरो देयाद्विद्यातीर्थमहेश्वरः ॥**

तसेंच याचा जन्मकाल संवत् १३७२ ते १४२५ असला पाहिजे हें संहिताभाष्यकारांचें प्रकरणांत सांगितलें आहेच. हा विजयनगरचा रहाणारा होता हें सर्वांस माहित आहे. याशिवाय अधिक वृत्त त्यांच्या प्रसिद्ध झालेल्या स्वतंत्र चारित्रांत पहावें.

## पं. गणेशशास्त्री पाठक

पं. गणेशशास्त्री पाठक ह्यांनीं माध्यंदिन शतपथावर **स्वरप्रकाश** नांवाचें भाष्य केलें आहे. या भाष्याचें वैशिष्ट्य म्हटलें म्हणजे त्यांनीं १४ही कांडावर वैदिक शब्दांची प्रयोगसिद्धि व संहिता-स्वर, पद-स्वर व ब्राह्मण-स्वर अशी त्रिविध स्वरप्रक्रिया पाणिनि, कात्यायन, पतंजलि यांच्या ग्रंथांच्या आधारें व कातीय प्रातिशाख्य व भाषिकसूत्र यांच्या आधारें दिली आहे हें स्वरप्रकाशाच्या शेवटच्या श्लोकावरून स्पष्ट होत आहे.

**प्रयोगसिध्यै स्वरसाधनाय यत्कल्पितं क्वापि धिया बुधास्तत् ॥**

विरुध्यते चेदित्रमुनिप्रणीतशास्त्रेण सोढव्यमिदं तथापि ॥ १ ॥
छंदसि दृष्टानुविधिर्बाहुलकं व्यत्ययः परादिरिति ॥
संज्ञासु धातुरूपाणीत्यादिवचोभिरभ्यनुज्ञानात् ॥ २ ॥
यत्कृतमिह साहसमिदमखिलं क्षंतव्यमेव विद्वद्भिः ॥
अपुरोभागिभिरस्य च गुणग्रहणकौतुकान्वितैः सुजनैः ॥ ३ ॥
व्याख्यानपौनरुक्त्यं दूरस्थस्य स्मृतिप्रलंभाय ॥
त्यक्तं न गौरवभिया यावच्छक्यं च लाघवं व्यरचि ॥ ४ ॥
गुरुतया न चकार च भाष्यकृच्छतपथे स्वरलेखनमित्यदः ॥
व्यरचि तत्कृतिवीक्षणलब्धया निजधिया परिशिष्टमिदं मया ॥ ५ ॥

इतिश्रीपाठकोपनामकरंगनाथसुतगणेशसूरिविरचितं शतपथ-व्याख्यानं स्वरप्रकाशाख्यं संपूर्णम् ॥

पं. गणेशशास्त्री यांचे पित्याचें नांव रंगनाथ होतें. हे शांडिल्य गोत्राचे असून पाठक कुलोत्पन्न आहेत. हे मुळचे रहिवाशी पान्होळें येथील आहेत. हेच तिसऱ्या, यशवंतराव महाराजांच्या आश्रयानें धारेस राहाण्यास आले पुढें तिसऱ्या आनंदराव महाराजांचे कारकीर्दीत हे दानाध्यक्ष होते. यांनीं हा ग्रंथ सुमारें संवत् १९२५ ते १९४० चे दरम्यान लिहिला आहे. या भाष्याची संपूर्ण प्रत धारेस त्यांचे चि. पं. मुकुंदशास्त्री यांचे जवळ आहे.

## काण्व शतपथ ब्राह्मणावरील भाष्यकार

## नीलकण्ठ

सुप्रसिद्ध महाभारताचा टीकाकार चतुर्धरवंशभूषण गोविंदसूनु नीलकण्ठ यानें कण्वांच्या शतपथ ब्राह्मणावर भाष्य लिहिल्याचें महाभारत वनपर्व अ. १६३ श्लोक ११ यावरील ‘ सूर्यामासा विचरंतो दिवीति मंत्रवर्णात् । सूर्यामासौ सूर्याचंद्रमसावित्यर्थः । निपुणतरमुपपादितमेतदस्माभिः काण्वशतपथभाष्ये एकपादिकांडे ’ इति । ह्या त्याच्या लेखावरून दिसून येतें. हें भाष्य आज उपलब्ध नाहीं. याचा काल सुमारें ५०० वर्षांपूर्वीचा आहे.

अनुसरून ईशोपनिषदावर भाष्य केलें आहे. यांचें इतिवृत्त सर्वांस विदित आहेच. विशेष समग्र चरित्र पहावयाचें असल्यास शांकरादिग्विजय प्रभृति ग्रंथांत पहावें.

## आनंदगिरि

यानें श्रीमच्छंकराचार्यांच्या भाष्यावर टीका लिहिली आहे. याला कोठें कोठें आनंदज्ञान असें म्हटल्याचें दिसतें. हा श्रीशुद्धानंदभगवत्पूज्यपादांचा शिष्य असून यानें प्रायः आचार्यांच्या सर्व भाष्यग्रंथांवर टीका लिहिल्या आहेत. याची सर्वत्र आनंदगिरि या नांवानेंच विशेष प्रसिद्धि आहे.

## शंकरानंद

यानें ईशोपनिषदावर ईशावास्यदीपिका नांवाचें भाष्य केलें आहे. हें ज्ञानैकवादी असेंच आहे. हा सुप्रसिद्ध आत्मपुराणाचा कर्ता व श्रीमद् भगवद्गीतेवरील शंकरानंदी टीकेचा कर्ता असून श्रीविद्यारण्याचा गुरु होय. हा संवत् १३७२ च्या पूर्वी २५।३० वर्षें अगोदर होऊन गेला असावा.

## राघवेंद्रयति

याचें ईशोपनिषदावर एक स्वतंत्र भाष्य आहे. हेंही भाष्य ज्ञानैकवादी असेंच आहे. हें भाष्य म्हणजे शांकरभाष्योक्त अर्थाचा सारसंग्रह होय. हें त्यानें आपल्या भाष्याचे शेवटीं पुढील श्लोक दिला आहे यावरून स्पष्ट होत आहे.

ईशावास्योपनिषदो भाष्याद्युक्तार्थसंग्रहः ।
राघवेंद्रेण यतिना कृतोऽयं शिष्ययांचया ॥

## आनंदभट्टोपाध्याय व अनंताचार्य

यांचीं संपूर्ण संहितेवर भाष्यें असल्यानें ईशोपनिषदावर आहेत हें निराळें सांगणें नको.

ह्या दोन्ही भाष्यकारांचें इतिवृत्त संहिताप्रकरणांत दिलें आहेच. प्रायः हीं सर्व भाष्यें आनंदाश्रमांत छापलीं गेलीं आहेत. याशिवाय हलायुध-प्रभृति जे कण्वसंहिताभाष्यकार आहेत त्यांचींही भाष्यें ईशोपनिषदावर आहेत. तीं त्या त्या संहिताभाष्यांतून प्रसिद्ध आहेत. निराळीं उपलब्ध दिसत नाहींत. तसेंच या ईशोपनिषदावर रामानुज, वल्लभ, मध्व, वगैरे निरनिराळे सांप्रदायिक आचार्य व तच्छिष्यप्रशिष्य यांचीं भाष्यें टीका वगैरे आहेत. त्या सर्वांचा

उल्लेख विस्तारभयास्तव येथें करणें शक्य नाहीं.

## बृहदारण्यकोपनिषद्

ह्याही उपनिषदाचे एक माध्यंदिनपाठ व एक कण्वपाठ असे दोन पाठ आहेत. बृहदारण्यकोपनिषदांत एक आगमप्रधान मधुकांड, दुसरें उपपत्तिप्रधान याज्ञवल्क्य कांड व तिसरें दोन्हींचा शेष असें खिलकांड अशीं कांडें आहेत. एकेक्या कांडांत दोन दोन असे ६ अध्याय आहेत. अर्थतः व ग्रंथतः मोठें आहे ह्मणून व ब्रह्मविद्येचें फार विस्तारानें वर्णन केलें आहे ह्मणून बृहत् ( मोठें ), अरण्यामध्यें पठनास योग्य ह्मणून आरण्यक आणि ब्रह्मविद्याद्वारा ब्रह्मभाव प्राप्त करून देणारें म्हणून उपनिषद् म्हटलें गेलें आहे.

## द्विवेदी गंग

यानें माध्यंदिन पाठाला अनुसरून बृहदारण्यकावर व्याख्या केली आहे. याच्या व्याख्येचें नांव मुख्यार्थप्रकाशिका असें आहे. हा विद्वज्जनतिलक या उपपदानें मंडित होता. याच्या पित्याचें नांव श्रीनारायण असें होतें. हें सर्व 'इति श्रीविद्वज्जनातिलकद्विवेदश्रीनारायणसूनुना द्विवेदगंगेन विरचिता माध्यंदिनारण्यकव्याख्या मुख्यार्थप्रकाशिका संपूर्णा इति'। या भाष्याचे शेवटील लेखावरून स्पष्ट आहे. रा. पावगींचे मतें हा गुजराथी ब्राह्मण होता. ह्याचें भाष्य बर्लिन येथें छापलेल्या सभाष्य शतपथ ब्राह्मणाच्या पुस्तकांत संगृहीत केलें आहे.

## हरिस्वामी

यानें भाष्य केलें असावें असें वाटतें- कारण त्यानें संपूर्ण शतपथावर भाष्य केलें आहे. परंतु आज तें उपलब्ध नाहीं.

## सायणाचार्य

यानेंही भाष्य केलें असावें असें वाटतें कारण यानें देखील संपूर्ण शतपथावर भाष्य केलें आहे; परंतु आज तें उपलब्ध नाहीं. सायणाचार्यानें बृहदारण्यकावर भाष्यच केलें नाहीं, कारण " श्री शंकराचार्यांनीं बृहदारण्यकावर भाष्य केलें आहे म्हणून मी तें करीत नाहीं. " असें सायणाचार्यांचें म्हणणें आहे असा लोकप्रवाद ऐकूं येतो. परंतु तसा उल्लेख आम्हांस कोठेंच आढळला नाहीं. तसा उल्लेख आढळेपर्यंत त्यावर विश्वास ठेवतां येत नाहीं.

## श्रीमच्छंकराचार्य

यावरही श्रीमदाद्यशंकराचार्यांचें भाष्य आहे. हें सुप्रसिद्धच आहे.

दशोपानिषदाचे भाष्य करण्यालाॅं प्रारंभ आचार्यांनीं बृहदारण्यकापासूनच केला आहे. याचें निदर्शक म्हणजे इतर कोणत्याही उपनिषद्भाष्याचे आरंभीं मंगल नसून तें फक्त बृहदारण्यक भाष्याचे आरंभींच आहे, हें होय. हें भाष्य कण्वपाठानुसारी आहे.

## आनंदगिरि

बृहदारण्यकाच्या शांकरभाष्यावरही आनंदगिरीची टीका सुप्रसिद्धच आहे.

## सुरेश्वराचार्य

शांकरभाष्यावर श्रीमदाद्यशंकराचार्यांचे शिष्य सुरेश्वराचार्य यांची वार्तिक नांवाची कारिकाबद्ध व्याख्या आहे. वार्तिकग्रंथ १२०००आहे. हा सुरेश्वराचार्य म्हणजे माहिष्मती(महेश्वर) नगरींत राहणारा मंडनमिश्र होय. यानें शंकराचार्यांबरोबर आपली भार्या शारदा इच्यासह वाद केला व शेवटीं त्यांचें शिष्यत्व पत्करून संन्यास ग्रहण केला. याचेच पासून शंकराचार्यांची पीठसंस्था सुरू झाली. अर्थात् हा सुमारें १२०० वर्षांपूर्वी होऊन गेला. याचें विशेष इतिवृत्त शांकरदिग्विजयादि ग्रंथांत पहावें. कांहींच्या मतें हा कण्वशाखी होता, तर कांहींच्या मतें हा माध्यंदिनशाखी होता. अद्याप निश्चित असें कांहीं प्रमाण उपलब्ध नाहीं. सुरेश्वराचार्यांच्या वार्तिकावर आनंदगिरीची **शास्त्रप्रकाशिका** नांवाची टीका व आनंदपूर्णाची **न्यायकल्पलतिका** नांवाची टीका आहे. तशीच एक **वार्तिकसार** नांवाचीही टीका आहे.

## भर्तृप्रपंच

बृहदारण्यकावर भर्तृप्रपंचाचेंही एक भाष्य आहे. कारण, ' तस्या इयमल्पग्रंथावृत्तिरारभ्यते ' या बृहदारण्याच्या उपक्रमांतील शांकरभाष्यावर आनंदगिरीनें म्हटलें आहे कीं, ' तस्या इति । भर्तृप्रपंचभाष्याद्विशेषांतरमाह । अल्पग्रंथेति । ' अर्थात् भर्तृप्रपंचभाष्य अतिशय विस्तृत असलें पाहिजे व हें शांकरभाष्य त्यापेक्षां संक्षिप्त असलें पाहिजे. तथापि अर्थदृष्ट्या संक्षिप्त नसून केवळ शब्दतःच आहे. हाच तो विशेष होय. भर्तृप्रपंच हा अर्थातच शंकराचार्यांच्या पूर्वी होऊन गेला आहे. कात्यायनसूत्र व पारस्करसूत्र यांचा भाष्यकार भर्तृयज्ञ व हा भर्तृप्रपंच ही एकच व्यक्ति असावी असें वाटतें.

अधिक विवरण सूत्रभाष्यकार या प्रकरणांत भर्तृयज्ञ भाष्यकाराचे विवरण-प्रसंगीं पहा.

## दिगंबरानुचर

यानेंही बृहदारण्यकावर **बृहदारण्यकार्थप्रकाश** नांवाची व्याख्या लिहिली आहे. याची इतर माहिती उपलब्ध नाहीं ही व्याख्या आमचे संग्रहीं आहे.

## नित्यानंदाश्रममुनि

यानेंही बृहदारण्यकोपानिषदावर **मिताक्षरा** नांवाची व्याख्या, भाष्य, वार्तिक व त्यावरील टीका यांच्या सहाय्यानें लिहिली आहे. हा श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य श्रीपुरुषोत्तमाश्रमांचा शिष्य होय. हें खालील श्लोक व लेख यावरून स्पष्ट आहे.

भाष्यवार्तिकतट्टीकामंथन्याऽरण्यकं दधि ।
विमथ्य बुद्धिरज्ज्वेदं नवनीतं समुद्धृतम् ॥

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीपुरुषोत्तमाश्रम-पूज्यपादशिष्यनित्यानंदाश्रममुनिविरचितायां बृहदारण्यकव्याख्यायां मिताक्षरायां षष्ठोध्यायः समाप्तः " इति ।

## उपनिषद्भाष्य

उपनिषद्भाष्य या नांवाची एक व्याख्या बृहदारण्यकावर आहे. कर्त्यांचें नांव उपलब्ध दिसत नाहीं. ही व्याख्या म्हणजे श्रीमद्भागवतावरील चूर्णिका व्याख्येसारखी आहे. हिची हस्तलिखित प्रत आमचे संग्रहीं आहे.

याशिवाय खालील भाष्य व टीका बृहदारण्यकावर झाल्या आहेत. त्यांचे लेख प्रत्यक्ष पाहण्यास न मिळाल्यामुळें अधिक माहिती देतां आली नाहीं. म्हणून केवळ नाममात्र उल्लेख करीत आहोंत.

१ सिद्धांतदीपिका
२ आनंदतीर्थांची शांकरभाष्यटीका
३ आनंदतीर्थांचें भाष्य
४ रघूत्तमकृत परब्रह्मप्रकाशिका
५ व्यासतीर्थांचें भाष्य
६ गंगाधरेंद्रकृत दीपिका

निर्विकल्प समाधिसाधनानें ब्रह्मभाव धारण करावा अशा सिद्धांताचा आत्मविचार मांडला आहे

## त्रिशिखि ब्राह्मण

हें उपनिषद् त्रिशिखिब्राह्मण या नांवाच्या ऋषीनें आदित्य लोकांत जाऊन आदित्यापासून मिळविलेलें आहे. याचे १६४ मंत्र असून त्यांत अष्टांगयोगाचे विस्तृत व मार्मिक विवरण आहे.

## मंडल ब्राह्मण

हें उपनिषद् याज्ञवल्क्यानें आदित्यलोकांत जाऊन आदित्यापासून मिळविलें आहे. याचे ५ ब्राह्मण असून त्यांच्यांत योगमार्गानें ब्रह्मप्राप्तीचा विचार सांगितला आहे.

## अद्वयतारक

यांत अद्वयब्रह्म, देहगत नाड्या, तारक, गुरुलक्षण, गुरुमहिमा इत्यादि विषयांचा विचार केला आहे.

## पैंगल

हें उपनिषद् पैंगलानें १२ वर्षें शुश्रूषा करून याज्ञवल्क्याकडून मिळविलें आहे. याचे ४ अध्याय आहेत. यांत कैवल्य, परमात्म्याची जीवदशा, महावाक्याचें विवरण, ज्ञान्यांचें कर्म व स्थिति इत्यादिकांचा विचार केला आहे. ठिकठिकाणीं कण्वोपनिषदाचा उल्लेख येतो. प्रायः हेंच कण्वोपनिषद् म्हणूनही प्रसिद्ध असावें, कारण पैंगल हें कण्वमुनीचें दुसरें नांव आहे. सिद्धांतकौमुदींत ' पिंगलाकरसाः कण्वाः ' असा उल्लेख आढळतो.

## भिक्षु

यांत भिक्षूचे कुटीचक, बहूदक, हंस व परमहंस हे चारही प्रकार सलक्षण सांगितले आहेत.

## तुरीयातीत

हें उपनिषद् पितामहानें आदिनारायणापासून मिळविलें आहे. यांत तुरीयावस्थेहून अतीत झालेल्या अवधूतांचा मार्ग व स्थिति यांचा विचार केला आहे.

## अध्यात्म

याचे एकंदर ७० मंत्र आहेत. यांत अंतर्यामिपुरुष वगैरे भेद

वास्तविक आहेत किंवा नाहींत याचा विचार केला आहे. ही उपनिषद्विद्या अपांतरतम, ब्रह्मा, घोरांगिरस, रैक्क व राम या क्रमानें प्रसिद्धीस गेली आहे, असें वर्णन शेवटीं आलें आहे.

## तारसार

हें उपनिषद् बृहस्पति व भरद्वाज यांनीं याज्ञवल्क्याकडून प्राप्त करून घेतलें आहे. याचे ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद असे तीन पाद आहेत. यांत अविमुक्त (काशी) क्षेत्र माहिमा, तारक मंत्र, श्रीरामपंचायतनात्मक मंत्र वगैरेंचें विवरण केलें आहे.

## याज्ञवल्क्य

हें उपनिषद् वैदेहजनक व अत्रि या उभयतांनीं याज्ञवल्क्यापासून प्राप्त करून घेतलें आहे. यांत संन्यास, संन्यासग्रहणापूर्वीची इतिकर्तव्यता व वैराग्योत्पादक संसारयात्रेचें वर्णन इत्यादि विषय प्रतिपादिले आहेत.

## शाट्य यनी

या उपनिषदाचे ३७ मंत्र आहेत. यांत परिव्राजकांचे ४ प्रकार, त्यांचे धर्म, संन्यासमहिमा गुरुमहिमा वगैरे विषयांचें विवेचन केलें आहे.

## मुक्तिका

हें उपनिषद् रामानें मारुतीस त्याचे विचारण्यावरून सांगितलें आहे. याचे २ अध्याय आहेत. पैकीं पहिल्या अध्यायांत ४९ श्लोक व ५ खंड व दुसऱ्या अध्यायांत फक्त ७६ श्लोक आहेत. यांत वेदांचे विभाग व शाखा, सालोक्य, सारूप्य, सामीप्य व सायुज्य ह्या चारही मुक्तींचें सलक्षण विवरण, दशोपनिषदें, द्वात्रिंशदुपनिषदें, अष्टोत्तरशतोपनिषदें त्यांचीं नांवें व शांति, त्यांचा महिमा, बद्धमुक्त दशा इत्यादि विषयांचें विवेचन आलें आहे.

## कैवल्योपनिषद्

हेंही उपनिषद् शुक्लयजुर्वेदगतच असावें असें वाटतें. कारण, हें कैवल्यशाखेचें उपनिषद् असें महाभारतांत म्हटलें आहे. तेथें 'यः श्रद्धया युतो नित्यं शतरुद्रियमभ्यसेत् । अग्निदाहात्सुरापानादकृत्याचरणात्तथा ॥ मुच्यते ब्रह्महत्याया इति कैवल्यशाखिनः इति ॥ हा जो अनुवाद केला आहे तो कैवल्योपनिषदांतील शतरुद्रियाचाच असून तें कैवल्यशाखेचें आहे असें

स्पष्ट म्हटलें आहे. शिवाय ही कैवल्यशाखा यजुर्वेदगत आहे याबद्दल मुळींच संशय नाहीं. कारण, यजुर्वेदावांचून शतरुद्रिय दुसरा कोठेंच सांगितलेला नाहीं. कैवल्यशाखेचा उल्लेख कृष्णयजूच्या ८६ शाखांत कोठेंच नाहीं. शुक्लयजूंत मात्र जी कपोल म्हणून शाखा आहे, तिलाच दुसरें नांव 'केवल' असल्याचें प्रसिद्ध आहे. यावरून हें उपनिषद् शुक्लयजुर्वेदाचेंच असावें असें वाटतें. निर्णयसागर प्रेसनें छापलेल्या अष्टाविंशति व अष्टोत्तरशत उपनिषदांत मुक्तिकोपनिषदाला अनुसरून ह्या उपनिषदाची गणना 'सहनाववतु' ही शांति देऊन कृष्णयजुर्वेदांत केली आहे. या गोष्टीचा वैदिक इतिहासज्ञांनीं निश्चित निर्णय करणें जरूर आहे.

हें उपनिषद् आश्वलायनानें पितामहापासून ( ब्रह्मदेवापासून ) मिळविलें आहे. याचे २ च खंड आहेत. त्यांत ब्रह्मविद्या, शतरुद्रियाच्या जपाचें महत्त्व, संन्यास वगैरे विषयांचें विवरण केलें आहे. या उपनिषदावर शंकरानंदाची दीपिका या नांवाची टीका आहे. ही टीका आमचे संग्रहीं आहे.



## प्रकरण ९ वें

# कल्पसूत्र-ग्रंथ

पूर्वीच्या प्रकरणांत शतपथब्राह्मण व त्यावरील भाष्यकार यांचा आपण परिचय करून घेतला. आतां यापुढील दोन प्रकरणांत सूत्रग्रंथ व त्यांचे भाष्यकार यांचा परिचय करून द्यावयाचा आहे.

कल्पसूत्र-ग्रंथ म्हणजे प्रयोगविधि यथार्थ समजावून सांगणारे ग्रंथ होत. ते अत्यंत संक्षिप्त असतात. सूत्र शब्दाचा अर्थ शास्त्रकारांनीं पुढीलप्रमाणें दिला आहे. ' अल्पाक्षरमसंदिग्धं सारवद्विश्वतोमुखं । अस्तोभमनवद्यं च सूत्रं सूत्रविदो विदुः ' इति । अक्षरें थोडीं. परंतु संदेहरहित, सारवत्तर, सर्व विषयांचे स्पष्टीकरणानें युक्त, विस्तार नसलेल्या व निर्दोष अशा ग्रंथास सूत्र म्हणतात. या कल्पसूत्र-ग्रंथांचा कोठें नुसत्या ' सूत्र ' शब्दानें व्यवहार केला जातो, कोठें केवल ' कल्प ' शब्दानें व्यवहार केला जातो तर कोठें ' कल्पसूत्र ' या जोड शब्दांनीं व्यवहार होतो. हें खालील तंत्रवार्तिकांच्या कल्पसूत्राधिकरणांतील कुमारिलभट्टांच्या कारिकावरून स्पष्ट लक्षांत येईल.

' सिद्धरूपः प्रयोगो यैः कर्मणामनुगम्यते ।
ते कल्पा लक्षणार्थानि सूत्राणीति प्रचक्षते ॥
कल्पनाद्धि प्रयोगाणां कल्पोऽनुष्ठानसाधनम् ।
सूत्रं तु सूचनात्तेषां स्वयं कल्प्यप्रयोगकम् ॥
कल्पाः पठितसिद्धा हि प्रयोगाणां प्रतिक्रतु ।
बौधायनीयवाराहमाशकादिप्रबंधवत् ॥
स्वसंज्ञापरिभाषाभिर्यदुत्सर्गापवादनम् ।
हेतुदृष्टांतवत्सूत्रं तल्लक्ष्यव्यापि लक्षणम् ॥
आश्वलायनकं सूत्रं वैजवापिकृतं तथा ॥
द्राह्यायनीयलाटीयकात्यायनकृतानि च ॥ ' इति ।

ज्यावरून सिद्ध प्रयोगाचें ज्ञान होतें तो कल्प व जीं लक्षणप्रदर्शक तीं सूत्रें. सिद्धप्रयोगबोधक म्हणून कल्प हा अनुष्ठानाचें साधन आहे. सूत्रांत प्रयोगांची सूचना असते व त्यांत प्रयोगांची कल्पना करावी लागते. कल्प हे

पठितसिद्ध आहेत. म्हणजे त्यांनीं जसें पठन केलें तसेंच प्रयोगाचें अनुष्ठान प्रत्येक यज्ञांत झालें पाहिजे. उदाहरणार्थः– बौधायनीय, वाराह, मानव वगैरे सूत्रें. सूत्रांचे सर्व उदाहरणांस लागू पडणारें लक्षण असें कीं त्या त्या सूत्रकारांनीं स्वतःच्या संज्ञा व परिभाषाद्वारा उत्सर्गापवाद, हेतु आणि दृष्टांत सांगावयाचे. सूत्रांचीं उदाहरणेंः– आश्वलायनीय, वैजवापीय, द्राह्यायणीय, लाट्यायनीय, कात्यायनीय इत्यादि होत. जैमिनीनें या सूत्रांना प्रयोगशास्त्र असें म्हटलें आहे. ' प्रयोगशास्त्रमिति चेन्नासन्नियमात् । ' जै. सू. १ । ३।१०. कारण ब्राह्मणांतून आलेले उत्पत्तिविधि, विनियोगविधि, अधिकारविधि, प्रयोगविधि व त्यांचे वाक्यशेष यांतील प्रयोगविधीखेरीज सर्व प्रकार वर्ज्य करून केवल प्रयोगविधींची सुसंबद्ध मांडणी तीच हीं सूत्रें होत. ' विधीयत इति विधिः । प्रयोगानां विधिः प्रयोगविधिः । प्रकृष्टा युक्तिः योजनं योगः प्रयोगः अशा प्रकारें म. म. पाठकशास्त्री यांनीं प्रयोगविधि शब्दाची व्युत्पत्ति करून उक्त अर्थाची संगति लावली आहे. वासुदेवाध्वरीनें अध्वरमीमांसा कुतूहलवृत्तींत ' प्रयोगस्य क्रत्वनुष्ठानस्य बोधकं शास्त्रं प्रयोगशास्त्रं बौधायनापस्तंबादि कल्पसूत्रजालम् । ' याप्रमाणें कल्पसूत्रांचा प्रयोगशास्त्र म्हणून स्पष्ट निर्देश केला आहे. तसेंच 'अथैतस्य समाम्नायस्य विताने योगापत्तिं वक्ष्यामः ' १।१।१ या आश्वलायन श्रौतसूत्रावर व्याख्या करतांना नारायणानेंसुद्धां ' यानि प्रत्याम्नायं प्रयोगशास्त्राणि स्मर्यंते ' असा स्पष्ट निर्देश केला आहे.

## कल्पसूत्रांचे तीन प्रकार

आतां या कल्पसूत्रांची सूत्रकारांनीं तीन प्रकारानें रचना केली आहे. १ श्रौतसूत्र २ गृह्यसूत्र ३ धर्मसूत्र. म. म. पाठकशास्त्री यांनीं शुल्बसूत्र म्हणून एक चवथा प्रकार केला आहे; परंतु शुल्बसूत्र हा स्वतंत्र प्रकार होऊं शकत नाहीं. कारण, शुल्बसूत्र हें कात्यायनश्रौतसूत्राचाच शेष आहे. हें पुढील ' परिशिष्ट प्रकरणांत ' स्पष्टपणें कळून येईल. मंत्र व ब्राह्मण या दोहोंनीं सांगितलेल्या व गार्हपत्य, आहवनीय व दक्षिणाग्नि ह्यांनीं साध्य होणाऱ्या कर्मसमुदायांचा अनुष्ठानक्रम दर्शविणारीं कल्पसूत्रें श्रौतसूत्रें म्हणून प्रसिद्ध आहेत. जातकर्मादि षोडश संस्कार व आवसथ्याधान, पाकसंस्था वगैरे एकाग्निसाध्य कर्मांच्या अनुष्ठानांचा क्रम दर्शविणारीं कल्पसूत्रें गृह्यसूत्रें म्हणून प्रसिद्ध आहेत. साधारण वर्णाश्रमधर्मबोधक कल्पसूत्रें धर्मसूत्रें म्हणून

प्रसिद्ध आहेत. हीं तिन्हीं प्रकारचीं सूत्रें कांहीं शाखांत एकाच ऋषीनें केलीं तर कांहीं शाखांत भिन्न भिन्न ऋषींनींहि केलीं आहेत. जसें आपस्तंब, बौधायन, वराह मानव या ऋषींनीं श्रौतसूत्र, गृह्यसूत्र व धर्मसूत्र हीं तिन्हीं सूत्रें रचिलीं आहेत. आश्वलायन, शांखायन, हिरण्यकेशि वगैरेंनीं श्रौत व गृह्य दोन प्रकारचींच सूत्रें केलीं आहेत. वसिष्ठ व गौतम यांनीं फक्त धर्मसूत्रेंच केलीं आहेत. महर्षि कात्यायनानें श्रौत व गृह्य हीं दोनच सूत्रें मुख्यत्वेंकरून केलीं व यांचा शेष भाग सांगण्याकरितां म्हणून त्यानेंच जीं परिशिष्टसूत्रें केलीं, त्यांतच धर्मसूत्रांचा विषय प्रसंगाप्रसंगानें सांगितला आहे. म्हणून निराळें धर्मसूत्र केलेलें दिसत नाहीं.

## कात्यायन श्रौतसूत्र

हें सूत्र याज्ञवल्क्याचा पुत्र कात्यायन यानें केलें आहे. कारण, ' कात्यायनसुतं प्राप्य वेदसूत्रस्य कारकं । ' स्कं. पु. ना. खं. अ. २९. यांत वेदसूत्रकर्ता अशा कात्यायन नांवाच्या पुत्राला प्राप्त करून याज्ञवल्क्य स्वधामास गेले असें स्पष्ट वर्णन आलें आहे. हें सूत्र प्रत्यक्ष शतपथ श्रुतीला अनुसरून आहे, म्हणून यांस श्रौतसूत्र असें म्हणतात. कात्यायनानें मंत्रभ्रांतिहरसूत्रांत ' प्रत्यक्षश्रुतिमूलत्वाच्छ्रौतकल्प इति स्मृतः । ' असा स्पष्ट निर्देशही केला आहे. कात्यायनश्रौतसूत्राचे एकदर २६ अध्याय असून त्यांच्यांत पुनः कंडिकात्मक पोटविभाग आहेत. ते खालील कोष्टकावरून लक्षांत येतील.

| अध्याय | कंडिका | सूत्रें |
|---|---|---|
| १ | १० | २५७ |
| २ | ८ | २३९ |
| ३ | ८ | १८४ |
| ४ | १५ | ३९४ |
| ५ | १३ | ३१४ |
| ६ | १० | २५१ |
| ७ | ९ | २५४ |
| ८ | ९ | २७६ |
| ९ | १४ | ३१४ |

| अध्याय | कंडिका | सूत्रें |
|---|---|---|
| १० | ९ | २१८ |
| ११ | १ | २८ |
| १२ | ६ | १५९ |
| १३ | ४ | ९७ |
| १४ | ५ | १३६ |
| १५ | १० | ३०८ |
| १६ | ८ | २५५ |
| १७ | १२ | २६३ |
| १८ | ६ | १२१ |
| १९ | ७ | १८१ |
| २० | ८ | २१६ |
| २१ | ४ | ९४४ |
| २२ | ११ | ३४३ |
| २३ | ५ | १०८ |
| २४ | ७ | २६७ |
| २५ | १४ | ४१० |
| २६ | ७ | १९८ |
| २६ | २२० | ६११७ |

या सूत्रांत एकंदर विषयानुक्रम अध्यायक्रमानुसार पुढील-प्रमाणें आहे.

१ पहिल्या अध्यायांत पुढील सर्व अध्यायांत सांगितलेल्या पदार्थांचा सुगमपणें बोध होण्याकरितां विविध परिभाषा सांगितल्या आहेत.

२-३ दर्शपूर्णमासयाग सांगोपांग.

४ पिंडपितृयज्ञ, दर्शशेष, वत्सापाकरणादिपदार्थ, विकृतींचे ठिकाणीं दर्शपूर्ण-मास धर्मांचे अतिदेश, दाक्षायणयज्ञ, आग्रयणेष्टि, अन्वारंभणीयेष्टि, अग्न्याधान, पुनराधान, अग्निहोत्र.

५ चातुर्मास्ययाग ( पर्वचतुष्टयात्मक ), मित्रविंदेष्टि.
६ प्रतिवार्षिक निरूढ पशुबंधयाग.
७–११ सांगोपांग सोमयाग.
१२ द्वादशसुत्यात्मक द्वादशाह नांवाचें सत्र.
१३ गवामयन नांवाचें सत्र.
१४ वाजपेय याग.
१५ राजसूय याग.
१६ – १८ महाग्निचयनयाग.
१९ सौत्रामणीयाग.
२० अश्वमेध.
२१ पुरुषमेध, सर्वमेध व पितृमेध.
२२ एकाह नांवाचे याग
२३ द्विरात्रप्रभृति एकादशरात्रपर्यंत अहीनसंज्ञक याग.
२४ निरनिराळीं सत्रें.
२५ निरनिराळीं प्रायश्चित्तें, मृताग्निहोत्रादि कर्म.
२६ प्रवर्ग्य ( घर्म )

कात्यायनानें सर्व सूत्रें शुक्लयजुर्वेदीय १५ ही शाखांना सर्व साधारण अशींच केलीं आहेत. तथापि त्यांतल्या त्यांत मुख्यतः कण्व व माध्यंदिन या दोन शाखांना प्राधान्य दिलें आहे. त्याबद्दल कर्कोपाध्याय आपल्या भाष्यांत म्हणतात. ' स्मरंति हि पंचदशशाखोपनिबंधनं कृतमाचार्येणेति । तस्मान्नास्ति प्रत्यक्षकृतो विशेषः । उच्यते । शाखाद्वयमधिकृत्य तात्पर्येणानुप्रवृत्त आचार्यः ' का. श्रौ. सू. २ । १ । ३ कर्कभाष्य. दुसरें, सूत्रग्रंथांतून आलेले मंत्र हे शाखांतरांतून कात्यायनानें घेतले आहेत. मात्र या दुसऱ्या शाखा म्हणजे शुक्लयजुर्वेदीय १५ शाखांपैकींच समजाव्या. याबद्दल कर्काचा लेख पहाण्याजोगा आहे. कर्क म्हणतात ' तत्र नित्यनैमित्तिककाम्यवैकल्पिकानि कार्त्स्न्येनोपनिबद्धानि शाखाद्वयव्यतिरेकेण नैय्यमिकमात्रमेव । तेन शाखाद्वयविहितस्येतरेणास्ति विशेषः ननु कतिपयशाखोपसंहारे सति असर्वशाखाप्रत्ययत्वादनादरणीयमेतत् सूत्रकारवचनमिति । नैतदेवं एवं हि स्मरंति— या एव काश्चन

पंचदश शाखा उपनिबध्यंते । तत्रैव नैयामिकांगप्रधानकर्मोपसंहारः संभाव्यते । किमुत पंचदशशाखोपनिबंधनं ' इति । का. श्रौ. सू. २ १ । ३ कर्कभाष्य. यावरून सूत्र करतांना कर्मांचा किंवा मंत्रांचा जो कात्यायनानें उपसहार केला तो शुक्लयजुर्वेदीय १५ शाखांतूनच केला हें स्पष्ट होत आहे. म्हणूनच कात्यायनानें स्वतःच मंत्रप्रातिहरसूत्रांत ' आम्नातः सर्वशाखासु यो मंत्रः कर्मकारकः । प्रतीकमुक्तं तस्यैवानाम्नाते सर्व ईरितः । ' इति- जो मंत्र सर्व शाखांत ( शुक्लयजुःपंचदशशाखांत ) पठित केला गेला आहे, तो प्रतीकमात्रानें सांगितला आहे; जो एखाद्या शाखेंत सांगितला असून बाकीच्या शाखांत नाहीं तो मात्र संपूर्ण पठित केला आहे. हा या सूत्राचा विशेष होय. सूत्रकालापासून आजपर्यंत श्रौतकर्में सूत्राला अनुसरूनच होत आलीं आहेत व होतात ही विशेष महत्त्वाची व आनंदाची गोष्ट आहे.

हें कात्यायन श्रौतसूत्र व जैमिनाचें पूर्वमीमांसासूत्र यांचें बरेंच साम्य आहे. तें काशीवासी पं. विद्याधरमिश्र वेदाचार्य यांनीं आपल्या श्रौतसूत्र भाष्याच्या भूमिकेंत दाखविलें आहे. कात्यायनाचा काल पं. विद्याधरमिश्रांनीं विक्रमशकपूर्व १२०० वर्षें हा ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु तो त्यांचा प्रयत्न व्यर्थ होय. कारण जो याज्ञवल्क्याचा काल तोच याज्ञवल्क्यसुत कात्यायनाचा काल होय. म्हणजे आजपासून सुमारें ६००० वर्षांपूर्वीचा काल ठरतो, हें पूर्वार्धांत जन्मकालप्रकरणीं दाखविलें आहेच. तसेंच कात्यायनाचें विशेष चरित्र पूर्वार्धांत ' उत्तरवंश ' प्रकरणीं दिलें आहेच.



प्रकरण १० वें

# श्रौतसूत्रभाष्यकार

## भर्तृयज्ञ

हा कात्यायन श्रौतसूत्रावरील सर्वांत जुना भाष्याकार आहे. याचा उल्लेख कर्कानें जरी केला नाहीं तथापि तो अत्यंत प्राचीन आहे. कारण स्कं. पु. ना. ख. अ. ११३ ते ११७ पर्यंत भर्तृयज्ञाचें वर्णन दिलें आहे. त्यांत तो सांकृत्य गोत्रोत्पन्न निमि नांवाच्या ब्राह्मणाचा पुत्र असल्याचें म्हटलें असून पूर्वीचें नांव 'प्रभावदत्त' असें असल्याबद्दलचाहि उल्लेख केला आहे. तो उल्लेख असा– 'भर्तृयज्ञ इति ख्यातो यज्ञकर्मविचक्षणः । यदेव वक्ति युष्माकं क्रियाकांडमशंकितैः' इति स्कं. पु. ना. खं. अ. ११५ श्लो. ३६. भर्तृयज्ञ हा नागर ब्राह्मण होता. कारण, स्कं. पु. ना. खं. अ. २०३ मध्यें श्लो. १३–१९ पावेतों यानें नागर ब्राह्मणांची संघटना करून अथर्ववेदीयांस महत्त्व दिलें असें वर्णन केलें आहे. कात्यायन श्रौतसूत्रावर भर्तृयज्ञाचें भाष्य असल्याबद्दलचा उल्लेख 'क्वी च भर्तृयज्ञभाष्यमल्पव्याख्यानयुतं न हदन्यायनिरूप्य वैकृतकर्मविवृतिसमर्थं' या प्रमाणें आपल्या भाष्यांत अनंतदेवानें केला आहे. त्यावरून हें भाष्य वृत्तिरूप असावें व पदार्थप्रदर्शनमात्रव्याख्यानयुक्त असें असावें असें वाटतें. शंकराचार्यानें उल्लिखित बृहदारण्यकावरील भाष्यकार भर्तृप्रपंच व हा भर्तृयज्ञ हे एकच असावेत

## वृद्धयाज्ञिक यशोगोपी

याचेंही भाष्य कात्यायन श्रौतसूत्रावर आहे व हा कर्काचार्यापेक्षां प्राचीन आहे. कारण 'कर्मभेदः स्यात्तत्र यशोगोपिप्रभृतिकृतव्याख्योपरोधः स्यात्' (का. श्रौ. सू. २।१।८ कर्कभाष्ये) 'अत्र वृद्धयाज्ञिको यशोगोप्याचष्टे' (का. श्रौ. सू. २४।१०३ कर्कभाष्ये) असा कर्कानें ठिकठिकाणीं यशोगोपीच्या भाष्याचा उल्लेख केला आहे.

## आचार्य पितृभूति

यानेंही कात्यायन श्रौतसूत्रावर भाष्य केलें आहे. हा सुद्धां कर्कापेक्षां प्राचीन आहे. कारण याच्या भाष्याचा सुद्धां 'यत्न पितृभूत्याचार्येण

ब्राह्मणलक्षणकर्मं प्रकृत्य ' [ का. श्रौ. सू. १।२४ कर्कभाष्ये]—कर्काचार्यानें याप्रमाणें उल्लेख केला आहे. हा गुजराथी ब्राह्मण असावा, कारण तो ' इत्यानर्तीय पितृभूतिकृते कात्यायनसूत्रभाष्ये नवमोऽध्यायः ' या आपल्या भाष्यांतील अध्यायाचे शेवटील लेखांत स्वतःस आनर्तीय म्हणवितो. आनर्त हें हल्लींच्या उत्तर गुजराथ प्रदेशाचें नांव आहे.

### संप्रदाय

यानेंही कात्यायनश्रौतसूत्रावर भाष्य केलें आहे. हा देखील कर्कापेक्षां प्राचीनच आहे. याचा उल्लेख कर्कानें 'प्रयोजनमंते नैमित्तिकं भवतीति संप्रदायः ' [ का. श्रौ. सू. २ । ७ कर्कभाष्ये ] असा केला आहे.

### उपाध्यायपाद

अत्र च केचिन्मंत्रांतरोपदेशान्माभेरिस्याप्रवृत्तिमिच्छंति । नेत्युपाध्यायपादः ' असा कर्काचार्यानें एका अज्ञातनामक भाष्याचा उल्लेख केला आहे. कदाचित् हा भाष्यकार त्याचा विद्यागुरु असण्याचा संभव आहे.

### कर्कोपाध्याय

याचें कात्यायन श्रौतसूत्रभाष्य अत्यंत सुप्रसिद्ध असून सर्वमान्य आहे. हा आपल्या भाष्याच्या प्रत्येक अध्यायाचा समाप्तिलेख देतांना आपल्यास उपाध्याय * असें म्हणवितो. कर्क हा संवत् ३८० [ इ. स. ३२४ ] च्या सुमारास किंवा त्यापूर्वी होऊन गेला असावा, असें वाटतें. कारण, श्री दत्तकुशली [ प्रशांतराग ] याच्या ताम्रपटांत धूम्रायणसगोत्रक कर्काध्यापक असें लिहिल्याचें आढळून येतें; व ह्याचा काल संवत् ३८० असल्याचें कळतें. यानें बहुतेक कातीय सूत्रग्रंथावर भाष्य केलें आहे. हेमाद्रि कर्काचा उल्लेख वारंवार करीत असल्याचें हेमाद्रिग्रंथांतून आढळून येतें. याचें भाष्य मीमांसापरिप्लुत असून मार्मिक आहे. प्रायः सर्व श्रौतकर्मपरिनिष्णात विद्वानांचा भर कर्कभाष्यावर अधिक प्रमाणांत दिसून येतो.

### हरिस्वामी

कात्यायन श्रौतसूत्रावर हरिस्वामीचेंही भाष्य असल्याचें दिसतें.

---

* " उपाध्यायकर्ककृतौ ... "

कारण, सर्वयाज्ञिकमतविचार या ग्रंथांत त्याच्या श्रौतसूत्रविषयक मतांचा उल्लेख आला आहे.

### गर्ग व शंकर

सर्वयाज्ञिकमतविचार ग्रंथांत यांच्याही मतांचा उल्लेख वारंवार आला असल्यानें यांचींही भाष्यें कात्यायन श्रौतसूत्रावर असावींत असें वाटतें. हा गर्ग बहुतकरून पद्धतिकार स्थपति गर्गच असला पाहिजे.

### अनंतदेव

यांचें कातीय श्रौतसूत्रावर भाष्य आहे. हा आपल्या भाष्याचे शेवटीं ' इति श्रीयज्ञविद्याकौमुदीकलानाथपंचाग्निचित् चतुर्दशक्रतु-सम्राट्स्थपतिमहायाज्ञिकश्रीअनंतकृते कात्यायनसूत्रभाष्ये पंचविंशोऽध्याय: ' असें लिहितो. यावरून यानें अनेक यज्ञ केल्याचें दिसून येतें. याच्या गुरूंचीं नांवें केशवामृतयोगी व वासुदेवसरस्वती अशीं होतीं. हें यांचे भाष्योपक्रमांतील मंगल श्लोकावरून दिसतें. हा उपक्रम भाष्यांत यांच्या उल्लेख करीत असल्यानें त्या नंतरचा आहे, हेंही स्पष्टच आहे. ते श्लोक असे ' भवाब्धिशोषणेऽगस्त्यान्केशवामृतयोगिनः । प्राहयांचक्रिरे पूर्वविद्यायाः सारतां मया ॥ दुर्दांताश्चेतसो दोषान्वेदांतैर्ये व्यर्जागमन् । तथा पूर्वगुरून्नौमि वासुदेवसरस्वतीन् ॥ सरस्वत्यब्रमीमांसा यैर्दत्ता परमार्थतः ॥ रविसंख्यैरभिषिक्तो वाजपेयैः पंचाग्निचित् । एकोनाशीतिसोमान्य इजे सौत्रामणित्रयं ॥ साम्राजां वंशजः सम्राट् स्थपतिर्याज्ञिकः सुधीः । सम्राट् वाचस्पतिर्यस्य जनको ज्ञानसंश्रितः ॥ " या श्लोकावरून १२ वाजपेय ५ अग्निचयन ७९ सोमयज्ञ व ३ सौत्रामणि ज्यानें केले असा सम्राट्कुलोत्पन्न सम्राट्स्थपति वाचस्पति हा याचा जनक होय.

### देवयाज्ञिक

यानेंही कात्यायन श्रौतसूत्रावर भाष्य केलें आहे. ' कात्यायनं नमस्कृत्य गुरून् श्रीश्रीपतींस्तथा । पितरौ भाष्यकर्तॄंश्च पितृभूत्यादिसंज्ञकान् ॥ कात्यायनप्रणीतेऽस्मिन्सूत्रे यज्ञप्रकाशके । प्रजापतेस्तनूजोऽहं कुर्वे व्याख्यामिमां कृत्स्नम् ॥ ' इति श्रीसम्राट्स्थपतिमहायाज्ञिकत्रिरग्निचित्प्रजापतिसुतयाज्ञिकदेवकृते कातीयसूत्रभाष्ये प्रथमोध्यायः ' यावरून देवयाज्ञिकाच्या पित्याचें नांव

प्रजापति व गुरूच नांव श्रीपति असें होतें याचे बापानेंही ३ चयन याग केले आहेत. अनंतदेव व देवयाज्ञिक हे दोघेही एकच वंशाचे होत. देव याज्ञिक हा नागर ब्राह्मण असून इ. स. १५ वें शतकांत होऊन गेला आहे.

## द्विवेदी महादेव

यानें का. श्रौसूत्रावर भाष्य केलें आहे. हा औदिचसहस्र गुजराथी ब्राह्मण होता. हाही इ. स. १५ वे शतकांतच झाला आहे.

## काशीदीक्षित

यानेंही का. श्रौ. सूत्रावर भाष्य केलें आहे

## पं. विद्याधरशर्मा

काशीवासी कै. म. म. प्रभुदत्त आग्निहोत्रीसुत वेदाचार्य विद्याधरशर्मा यांनी नुकतीच सर्व भाष्यांचें सार काढून कात्यायन श्रौतसूत्रावर सरला नांवाची एक व्याख्या लिहून प्रसिद्ध केली आहे.

## पद्धतिकार

याशिवाय कात्यायन श्रौतसूत्रावर संप्रदाय, देवयाज्ञिक, दीक्षित वासुदेव इत्यादि प्राचीन पद्धतिकार होऊन गेले आहेत. आचार्य पद्मनाभ, वैद्यनाथ मिश्र, याज्ञिक वल्लभाकार महादेव दीक्षित, राम वाजपेयी, पदार्थादर्शकार गोवर्धन दीक्षित, कारिकाबद्ध पद्धतिकार रेणु दीक्षित, पदार्थदीपिकाकार गंगाधर पाठक, प्रयोगसारकार देवभद्र पाठक, अघयष्टिपद्धतिकार स्थपतिगर्ग, श्रौतमार्तंडकार चिदंबर दीक्षित, श्रौतकर्मकांडप्रदीपकार श्री तातचरण अण्णाशास्त्री वारे प्रभृति अनेक अर्वाचीन पद्धतिकार झाले आहेत. यांत कांहीं कांहीं पद्धति भाष्याइतक्या योग्यतेच्या व महत्वाच्या आहेत. त्या सर्वांचें वृत्त विस्तारभयास्तव देतां येणें शक्य नाहीं.

प्रकरण ११ वें

# गृह्यसूत्रें

## पारस्करगृह्यसूत्र

हेंही सूत्र कात्यायनानेंच केलें आहे. पारस्कर हें कात्यायनाचेंच दुसरें नांव आहे. ' पारं करोतीति पारस्करः । पारस्करो देशो नगरं च ' असें वाक्य शब्देंदुशेखरांत ' पारस्करप्रभृतीनि च ' या सूत्राची व्याख्या करतांना नागोजीभट्टानें लिहिलें आहे. त्यामुळें श्रौतस्मार्तकर्माच्या अनुष्ठानानें परतीराला नेणारा, पारस्कर देशांत अगर पारस्कर नगरांत राहणारा कात्यायन सूत्रकार असा त्याचा अर्थ होतो, असें म. म. पाठकशास्त्री यांनीं आपल्या गृह्यसूत्र भाषांतराचे भूमिकेंत म्हटलें आहे. ऋग्वेद सर्वानुक्रमावरील भाष्यकार षड्गुरुनें तर ' पारक्यं करोतीति पारस्करः ' अशी व्युत्पत्ति करून पारस्कर हें कात्यायनाचें गुणबोधक नांव आहे असें ठरविलें आहे. पारक्य करतो याचा अभिप्राय असा कीं स्वकीय शाखेंच सूत्र ग्रंथ तर केलेच परंतु ऋग्वेदावर सर्वानुक्रम, सामवेदावर कर्मप्रदीपिका, उपग्रंथ, प्रतिहारी सूत्र वगैरे परकीय शाखांचेही सूत्रग्रंथ केले आहेत. तसेंच गृह्यसूत्रांत ' प्रोक्षणीश्च पूर्ववत् ' गृ. सू. १।१।४ ' प्रोष्येत्य गृहानुपतिष्ठते पूर्ववत् ' गृ. सू. १।१८।१ याप्रमाणें श्रौतसूत्राचा पूर्ववत् असा अतिदेश वारंवार घेतला आहे. त्यावरूनही श्रौतसूत्र व गृह्यसूत्राचा कर्ता एकच असला पाहिजे हें स्पष्टच होतें. गृह्यसूत्राची प्रसिद्धि मात्र पारस्कर या नांवावर झाली इतकेंच. याबद्दल स्वतः कात्यायनानेंच मंत्रप्रातिहर सूत्रांत म्हटलें आहे कीं, ' श्रौतः कात्यायनप्रोक्तः कल्पः सर्वोपकारकः । पारस्करनाम्ना प्रोक्तः स्मार्तो वाजसनेयिनां ' इति २७. " पारस्करनाम्ना प्रोक्तः " या प्रयोगावरून स्मार्तसूत्र हें कात्यायनानेंच केलें आहे. कात्यायन व पारस्कर हीं दोन्हीं नांवें एकाच व्यक्तीचीं असून त्या पैकीं पारस्कर या नांवानें स्मार्तसूत्रास प्रसिद्धि मिळाली आहे. या गृह्यसूत्रांत ३ कांडें असून त्यांत कंडिकात्मक पोट विभाग आहे. खालील कोष्टकावरून तो लक्षांत येईल.

या सूत्रांत एकंदर विषयानुक्रम कांडक्रमानुसार पुढील प्रमाणें आहे.

| कांड | कंडिका | सूत्र. |
|---|---|---|
| १ | १९ | १९५ |
| २ | १७ | २९४ |
| ३ | १६ | २१८ |
| ३ | ५२ | ७०७ |

कांड १ लें

१ होमसाधारणकर्म
२ आवसथ्याधानविधि
३ मधुपर्कविधि
४ विवाहविधि
५ औपासनहोम
६ यानभेदप्रायश्चित्त
७ चतुर्थीकर्म
८ पक्षादिकर्म
९ गर्भधारणोपाय
१० पुंसवन
११ सीमंतोन्नयन
१२ सुखप्रसवोपाय
१३ जातकर्म
१४ रक्षाविधि
१५ नामकरण
१६ निष्क्रमण
१७ प्रवासादागतकृत्य
१८ अन्नप्राशन

कांड २ रें

१९ चूडाकरण व केशांत
२० उपनयन
२१ समावर्तन
२२ स्नातकव्रतें
२३ पंचमहायज्ञविधि
२४ उपाकर्म
२५ उत्सर्जन
२६ लांगलयोजन
२७ श्रवणाकर्म
२८ इंद्रयज्ञ
२९ पृषातककर्म
३० सीतायज्ञ

कांड ३ रें

३१ नवान्नप्राशन
३२ आग्रहायणीकर्म
३३ अष्टका
३४ शालाकर्म ( वास्तुशांति )
३५ मणिकावधान
३६ शीर्षरोगाचें औषध
३७ नोकरांचें वशीकरण
३८ शूलगवकर्म

३९ वृषोत्सर्ग
४० उदककर्म
४१ पशुविधि
४२ अवकीर्णिप्रायश्चित्त
४३ सभाप्रवेशादि
४४ रथारोहण
४५ हस्त्यारोहणादिकर्म
४६ स्वाध्यायशांतिकरण

ह्या सूत्राला स्मार्तसूत्र असेंही म्हणतात. स्मार्त म्ह. स्मृति-स्मरण—अनुमान, अर्थात् अनुमित श्रुतिमूलक होय. 'आनुमानिकमलत्वात्स्मार्तं इत्यभिधीयते' असें कात्यायनानें सूत्रमंत्रप्रकाशिका सूत्रांत म्हटलें आहे. गृह्यसूत्र म्हणण्याचें कारण असें कीं, गृह्य म्हणजे आवसथ्याग्नि व तत्संबंधि कर्म ज्यांत सांगितलें आहे, तें गृह्यसूत्र होय. ह्या गृह्यसूत्रांतील स्मार्ताग्नि-संबद्ध कर्में सूत्रकालापासून आजपर्यंत बरोबर सूत्राला अनुसरूनच होत आलीं आहेत, परंतु जातकर्मादि संस्कार कर्में मात्र गुणोपसंहार या प्ररोचना खालीं कांहीं शाखांतरीय कांहीं पुराणपठित व कांहीं स्मृतिप्रतिपादित अंग-कलाप समाविष्ट करून केलें जातात. तें करणें बरोबर नव्हे. यद्यपि 'यन्नाम्नातं स्वशाखायां पारक्यमविरोधि यत् । विद्वद्भिस्तदनुष्ठेयं अग्निहोत्रादिकर्मवत्' 'कर्मप्रदीपिका ३।३ किंवा समंत्रं वाऽप्यमंत्रं वा अन्यशाखाप्रचोदितं' 'स्वानुक्तमपि कल्पोक्तं तत्कुर्यादविरोधि चेत् । [ मंत्रभ्रांतिहर ७९ ] म्हणजे कर्म स्वशाखीय सूत्रांत सांगितलें नसेल परंतु परशाखीय सूत्रांत सांगितलें असून तें जर स्वशाखेला अविरोधि असेल तर अग्निहोत्रादि काम्य कर्में जशीं परशाखीय करतात त्या प्रमाणें विद्वानांनीं करावीं; समंत्रक किंवा अमंत्रक असें जें कर्म तें अन्यशाखीय सूत्रांत सांगितलें आहे व स्वशाखेला अविरोधि आहे तर तें स्वशाखीय सूत्रांत सांगितलें नाहीं तरी करावें, असें कात्यायनानें सांगितलें, तथापि तें सांगणें कर्म गुणोपसंहारानें घोटाळा माजविण्या करतां नव्हे. स्वशाखोक्त कर्मांत अन्य शाखोक्त अंगकलापांचा समावेश करण्यासाठीं नव्हे तर जीं कर्में मुळांतच स्वशाखेंत सांगितलीं नाहींत, उदाहरणार्थः— श्रौतकर्मांत नक्षत्रसत्र कामेष्ट्या वगैरे, स्मार्त कर्मांत चत्वारिंवेदव्रत, कर्णवेध वगैरे हीं कर्में कर्तव्य असतां करण्यासाठीं ही अभ्यनुज्ञा मात्र दिली आहे. तेव्हां स्मार्तसूत्रोक्त सर्व कर्में अगदीं सूत्रानुसार करावयास पाहिजे आहेत याकडे विद्वानांनीं लक्ष पुरविणें जरूर आहे इतकेंच आम्हीं सुचवितों.

## बैजवापगृह्यसूत्र

एक बैजवापि आचार्यांचें शुक्लयजुर्वेदावर गृह्यसूत्र असलें पाहिजे असें निबंध ग्रंथांतून ठिकठिकाणीं त्याचे जे उल्लेख येतात त्यांवरून वाटतें.

## पारस्करगृह्यसूत्रावरील भाष्यकार

### भर्तृयज्ञ

याचें पारस्करगृह्यसत्रावर भाष्य आहे. याचें सर्व वृत्त पूर्वी दिलें आहेच.

### कर्क

याचेंही पारस्कर गृह्यसूत्रावर भाष्य आहे. याचेंही वृत्त पूर्वी दिलें आहेच.

### हरिहर

यानें पा. गृ. सूत्रावर भाष्य केलें आहे. यानें भाष्याबरोबर पद्धतिही केली आहे. हा अग्निहोत्री होता असें भाष्याच्या शेवटील 'इत्यग्निहोत्रिहरिहर-विरचितायां पारस्करगृह्यसूत्रव्याख्यानपूर्विकायां प्रयोगपद्धतौ तृतीयं कांडम्' या लेखावरून दिसून येतें. हा कर्क व पद्धतिकार दीक्षित वासुदेव यांचे नंतर होऊन गेला आहे.

### आचार्य जयराम

यानेंही पा. गृ. सूत्रावर भाष्य केलें आहे. जयरामश्च मेवाडो भारद्वाजसगोत्रकः ॥ श्रीमन्मांत्रिकमाधवः श्रुतिसुधासिंधोर्विगाहाप्ति-तद्वेद्यस्तत्कृपयाऽभवद् द्विजवरः श्रीकेशवस्तादृशः । तत्पादद्वयकस्पृ-शाकृतमिदं कातियगृह्यस्य सद्भाष्यं सज्जनवल्लभं सुविदुषां प्रेष्ठं शिवप्रीतये ॥ आचार्यापरमनामधेय इति यो दामोदरोऽभूद् द्विजो भारद्वाजसगोत्र आत्मरतिरस्याप्यात्मजस्तादृशः । नाम्ना श्रीबलभद्र आत्तसुयशास्तत्सूनुनैतत्कृतं भाष्यं सज्जनवल्लभं जययुजा रामेण मत्याप्तये' या त्याच्या भाष्यारंभीच्या श्लोकांवरून याच्या भाष्याचें नांव सज्जनवल्लभ असें होतें. हा भारद्वाज गोत्रोत्पन्न आचार्य दामोदराचा पौत्र व बलभद्राचा पुत्र होय. हा मेवाडा ब्राह्मण होता. याला मांत्रिकमाधव व

श्रीकेशव असे दोन गुरु होते, असें दिसतें. हाही कर्कांचे नंतरच होऊन गेला आहे.

## दीक्षित गदाधर

यानेंही पा. गृ. सूत्रावर भाष्य केलें आहे. हा आपले भाष्याचे शेवटीं ' इति श्रीत्रिरग्निचित्सम्राट्स्थपतिश्रीमद्वायाज्ञिकवामनात्मजदीक्षितगदाधरकृते गृह्यसूत्रभाष्ये तृतीयं कांडम् ' असें लिहितो. त्यावरून हा ३ चयनयाग ज्यानें केले अशा सम्राट्कुलोत्पन्न स्थपतिवामनाचा पुत्र होय. हाही नागर ब्राह्मण असावा असें वाटतें.

## विश्वनाथ

यानेंही पा. गृ. सूत्रावर भाष्य केलें आहे. ' गर्गसिद्धांतपद्मानां प्रकाशोदयहेतवे । मार्तंडाय नृसिंहाय पित्रे श्रीगुरवे नमः ॥ १ ॥ गंगादेवीमहं वंदे ज्ञानदां मातृरूपिणीं । जातं यस्याः पयःपानात्सरस्वत्यवगाहनं ॥ २ ॥ अधीत्य सकलं शास्त्रं श्रीनृसिंहाज्जगद्गुरोः । तन्यते विश्वनाथेन गृह्यसूत्रप्रकाशिका ॥ ३ ॥ ' त्याच्या या भाष्यारंभींच्या श्लोकावरून गर्गसिद्धांतप्रकाशक नृसिंह हा याचा पिता, गंगादेवी ही माता व पिता हाच गुरूही होय असें दिसतें. ' अभून्नंदपुरे मुंजो नागरो गोत्रकाश्यपे । लक्ष्मीधरोऽभवत्तस्मात्सूर्यदत्तस्तु तत्सुतः ॥ तस्मादाशाधरो जातो नारसिंहाभिधस्ततः । तत्सुतेन कृतं भाष्यं विश्वनाथेन धीमता ॥ पारस्करस्य गृह्यस्य पंचखंडावशिष्टकं । गरिष्ठं सर्वभाष्येषु बह्वर्थं निर्णयान्वितं ॥ महादेवजगन्नाथपुत्रपौत्रप्रपौत्रकैः । गोपनीयं निरीक्ष्यं च पठितव्यं समाहितैः ॥ नारसिंहाग्रजोऽनंतस्तस्य यो वै प्रपौत्रकः । लक्ष्मीधराभिधस्तंभतीर्थात्काश्यां समागतः॥ उपहासं पुरस्कृत्य ह्रियं कृत्वा तु पृष्ठतः । भाष्याण्यन्यानि चालोक्य पंच खंडान्यलीलिखत् । तेनैव चास्य भाष्यस्य पूर्तिर्जाता यथा तथा । संवन्नेत्रग्रहकला १६९२ मितेब्दे चोत्तरायणे ॥ समाप्तिमगमद्भाष्यं माघे भूते[१४] सिते कुजे॥ ' या समाप्तिच्या श्लोकांवरून विश्वनाथ हा नंदपुरवासी काश्यपगोत्रोत्पन्न मुंज नामक नागर ब्राह्मणाचा पुत्र लक्ष्मीधर याचे कुलांत उत्पन्न झाला आहे. लक्ष्मीधराचा पुत्र सूर्यदत्त, त्याचा पुत्र आशाधर व त्याचा पुत्र नारसिंह व त्याचा पुत्र हा भाष्यकार विश्वनाथ होय. यानें पांच खंड खेरीज सर्व सूत्रावर भाष्य

केलें. अवशिष्ट पांच खंडाचें भाष्य या विश्वनाथाचा ज्येष्ठ पितृव्य जो अनंत त्याचा प्रपौत्र लक्ष्मीधर यानें स्तंभ तीर्थाचें वास्तव्य सोडून काशींत राहावयास आल्यानंतर इतर भाष्याच्या साहाय्यानें केलें आहे. त्यामुळेंच या भाष्याची पूर्ति झाली. हें भाष्य संवत् १६९२ माघ शुक्ल १४ मंगळवारीं पूर्ण झालें.

## मुरारिमित्र.

यानें या गृ. सूत्रावर मंत्र व्याख्यानमात्र भाष्य केलें आहे. हा आपल्या भाष्याचे आरंभीं लिहितो कीं हें मंत्रभाष्य मी माझ्या पित्याचे मंत्र-भाष्यांतून सार काढून लिहित आहे.

## रामकृष्ण

याचें ही पा. गृ. सूत्रावर भाष्य आहे. हा कण्व होता. याचें भाष्य संस्कारगणपति ह्या नांवानें प्रसिद्ध आहे.

## वैद्यनाथमिश्र

यानें पा. गृ. सूत्रावर फक्त गृह्याग्निसंबद्ध भागावर संस्थावैद्यनाथ या नांवाचें भाष्य सप्रयोग लिहिलें आहे. त्याचे शेवटीं तो लिहितो कीं, ' **श्रीयजुराम्नायचरणमिश्रश्रीकेशवसूनुश्रौतस्मार्तप्रचंडरश्मिमिश्रश्रीरत्नेश्वरजातयाज्ञिकरभूवृंदाकवंदनीयमिश्रश्रीवैद्यनाथप्रकाशिश्रीसंस्थावैद्यनाथे पाकयज्ञसंस्थाप्रकरणं समाप्तं** ' ।। यावरून हा केशवमिश्राचा पौत्र व रत्नमिश्राचा पुत्र होय. यानें आणखी संप्रदाय दर्शपौर्णमासटीका श्रौतमतभेद, एकाध्वर्यव प्रयोग, संप्रदाय ज्योतिष्टोमटीका वगैरे बरेच ग्रंथ केले आहेत. याच्या दर्शपूर्णमासपद्धतीच्या शेवटीं ' कुरुदेशप्रसूतेन वैद्यनाथेन धीमता ' असा पूर्वार्ध असलेला श्लोक आला आहे त्या वरून हा कुरुदेशचा राहणारा होता असें दिसतें.

## पद्धतिकार

या शिवाय पारस्कर गृह्यसूत्रावर भर्तृयज्ञभाष्यानुसारी पद्धतिकार स्थपतिगर्ग, कर्कभाष्यानुसारी पद्धतिकार दीक्षितवासुदेव, रामाग्निहोत्रिसुत गंगाधर, कारिकाबद्ध पद्धतिकार रेणुदीक्षित, स्मार्ताग्निसंबद्ध कर्ममात्र स्मार्तोल्हासनामक पद्धतिकार शिवप्रसादसुत गंगाधर, गृह्याग्निकर्मकांडप्रदीपकार श्रीतातचरण अण्णाशास्त्री वारेप्रभृति प्राचीन अर्वाचीन अनेक पद्धतिकार

झाले आहेत. त्यापैकीं कांहीं कांहीं पद्धति भाष्याइतक्या योग्यतेच्या व महत्वाच्या आहेत. त्या सर्वांचें वृत्त येथें देणें शक्य नाहीं.

तसेंच पा. गृ. सूत्राच्या संस्कार भागावर संस्कारनृसिंह, संस्कार-प्रयोगदर्पण, संस्कारभास्कर, प्रयोगाब्धि, संस्कारदीपक, संस्कारमार्तंड, स्मार्तप्रभु, शुक्लयजुःशाखीय कर्मकांडप्रदीप वगैरे अनेक ग्रंथ झाले आहेत. या सर्वांचेंही इतिवृत्त विस्तारभयास्तव येथें देतां येणें शक्य नाहीं.



प्रकरण १२ वें

# मुख्य परिशिष्टें व त्यावरील व्याख्याकार

तयोः पूर्वोत्तरांगानां साधनार्थं ह्यनेकशः ।
॥ श्रौतानि परिशिष्टानि स्मार्तान्यपि तथैव च ॥ २८ ॥

श्रौतसूत्र व स्मार्तसूत्र यांच्या पूर्वोत्तर अंगोपांगांच्या साधनार्थ अनेक प्रकारचीं श्रौत स्मार्त व परिशिष्ट सूत्रें केलीं आहेत, असें कात्यायनानें मंत्रभ्रांतिहर सूत्रांत म्हटलें आहे. चरणव्यूह व प्रतिज्ञापरिशिष्ट या ग्रंथांत श्रौत व स्मार्त मिळून मुख्य मुख्य १८ परिशिष्ट सूत्रें केलीं आहेत असेंही उल्लेखिलें आहे. हीं सर्व परिशिष्टें कात्यायनानेंच केलीं आहेत. प्रथम त्या १८ परिशिष्ट सूत्रांचा परिचय देऊन नंतर इतर परिशिष्टांचा परिचय करून देण्याचें ठरविलें आहे. त्या पूर्वीं परिशिष्ट म्हणजे काय हें पाहूं.

'परितः आसमंतात् विद्यमानानां कर्मणां शिष्टमुपदेशः' म्हणजे गृह्य सूत्रांत सांगितलेलीं आवश्यक स्नानसंध्योपासनश्राद्धादि कर्में यांचें विधान ज्यांत केलें आहे, त्यांना परिशिष्ट सूत्र असें म्हणतात, असें म. म. पाठकशास्त्री यांनीं पा. गृ. सू. भाषांतराच्य भूमिकेंत म्हटलें आहे. परंतु तें बरोबर नाहीं. कारण इष्टकापूरण परिशिष्ट सूत्राचा प्रारंभ करतांना स्वतः कात्यायनानेंच परिशिष्ट शद्बाचा अर्थ 'अवशिष्ट' असाच केला आहे. तें सूत्र असें कीं 'अथातः सुपर्णचित्यस्याग्नेः' कातीयसूत्रशेषमृजुपक्षस्यानुव्याख्यास्यामः' यांतील 'कातीयसूत्रशेषं' या पदावरून हा अर्थ स्पष्ट दिसून येत आहे. तेव्हां परिशिष्ट शब्दाचा अर्थ 'अवशिष्ट' असा करतात तोच बरोबर आहे.

### १ यूपलक्षण

यांत श्रौत यज्ञांतील यूप नांवाच्या यज्ञिय स्तंभाला प्रकृतिभूत असलेल्या वृक्षांचे चातुर्वर्ण्य, वर्ज्यावर्ज्य प्रकार, यूप व त्यांचे अश्रि यांच्या देवता वगैरे विषय सांगितले आहेत. यावर कोणाचीही व्याख्या नाहीं. हें परिशिष्ट कात्यायन श्रौतसूत्राचें शेषभूत आहे.

### २ छागलक्षण

यांत श्रौत यज्ञांतील पशु जें छाग त्याचे वर्ण व वर्ज्यावर्ज्य प्रकार

यांचा विचार केला आहे. यावरही कोणाची व्याख्या नाहीं. हें परिशिष्ट का. श्रौ. सूत्राचें शेषरूप आहे.

### ३ प्रतिज्ञा

यांत शुक्ल यजुर्वेदाची फारच उत्कृष्ट माहिती दिली आहे. ब्राह्मणांचा देश, गोत्र, शाखा, तीर्थ, पंचदश शाखांचीं नांवें संहिता व ब्राह्मण यांतील प्रतिपाद्य विषय, एकंदर यज्ञ व सत्रें, आध्वर्यव षडंगें, उपांगें, अष्टादश परिशिष्टें, उपवेद, शिक्षा, वगैरेचें कोठें नांवानें कोठें विभागांनीं कोठें अर्थानें तर कोठें प्रश्नोत्तर रूपानें विवेचन केलें आहे. त्या दृष्टीनें हें परिशिष्ट फार महत्वाचें आहे. यावर तातचरण श्री अण्णाशास्त्री वारे यांनीं प्रतिज्ञाप्रदीप नांवाची नुकतीच एक व्याख्या लिहिली आहे. यावर या व्याख्येशिवाय दुसरी व्याख्या नाहीं. हें परिशिष्ट श्रौत स्मार्त उभयसूत्रांचें शेषभूत आहे.

### ४ अनुवाकसंख्या

यांत संहितेचे अनुवाक सांगितले आहेत. एकंदर अनुवाक ४० अध्याय मिळून ३०३ आहेत. यावरही कोणाचीच व्याख्या नाहीं. हें परिशिष्ट का. श्रौ. सूत्राचें शेषभूत असें आहे.

### ५ चरणव्यूह.

यांत चारही वेदांचें अध्ययन व शाखाभेद, चारही वेदांचें स्वरूप, प्रचाराचे देश वगैरे माहिती सांगितली आहे. यावर बालकृष्ण शिष्य महीदास पंडिताची व्याख्या आहे.

महीदासानें ही व्याख्या संवत् १६१३ त काशीस लिहिली आहे. याचे शौनककृत, कात्यायनकृत, व्यासकृत असें थोड्या थोड्या पाठभेदानें तीन प्रकार आढळतात. हें परिशिष्ट श्रौत व स्मार्त दोन्हीसूत्रांचें शेषरूप होय. तसेंच या चरणव्यूहावर अनंतदेवाचेंही भाष्य असलें पाहिजे. कारण अनंतदेवानें लिकंडिक प्रतिज्ञासूत्रभाष्यांत ‘ याजुषाम्नाये ’ यावर भाष्य करतांना म्हटलें आहे कीं, ‘ प्रपंचितं चास्य मुख्यत्वं मंत्रब्राह्मणयोर्वेदस्त्रिगुणं यत्र पठ्यते इत्यस्यव्याख्यावसरे ’ इति । येथें उल्लेखिलेला ‘ मंत्रब्राह्मणयोर्वेद ’ हा श्लोक चरणव्यूहांतील आहे.

## ६ श्राद्धकल्प

यांत आपरपक्षिकश्राद्ध, एकोद्दिष्ट, सपिंडीकरण, आभ्युदयिक, (नांदीश्राद्ध) द्रव्यविशेषानें तृप्तिविशिष्टता, अक्षय्यतृप्तीचे उपाय, काम्यश्राद्ध वगैरे विषय सांगोपांग प्रतिपादिले आहेत. याच्या एकंदर ९ कंडिका असून एकंदर सूत्रसंख्या ८१ आहे. हें परिशिष्ट स्मार्तसूत्राचें शेषरूप आहे. यावर आचार्य पितृभूति, कर्कोपाध्याय, दीक्षित गदाधर, श्राद्धकाशिका भाष्यकार, आवसथिक अतिसुखपौत्रविष्णुमिश्रपुत्रकृष्णमिश्र, रामाग्निहोत्री, हलायुध वगैरेंचीं भाष्यें आहेत. तसेंच दीक्षित वासुदेव, दीक्षित गदाधर, कारिकाबद्ध पद्धतिकार रेणुदीक्षित वगैरेंच्या पद्धतीहि आहेत.

## ७ शुल्बसूत्र

या परिशिष्टसूत्राच्या ७ कंडिका असून त्यांपैकीं, ६ कंडिका मिळून सूत्रसंख्या २९१ आहेत ७ व्या कंडिकेंत सर्व श्लोक असून ते ३९ आहेत. दिक्साधन, रज्जुकरण, दर्शपूर्णमास, सोम, चातुर्मास्य वगैरेंचे विहार ( कुंड मंडप व वेद्या ) क्षेत्रज्ञान, क्षेत्रवृद्धि, क्षेत्रांचे लघुमहत्मंडलकरण वगैरे, वृत्तांचें चतुरस्रीकरण वगैरे चयनयागांतील चितिनिर्माणप्रकार, वेदिवृद्धीचे प्रकार, अंगुलादिमान हे विषय व या सर्वांचें श्लोकरूपानें संक्षेपतः संकलीकरण वगैरे अनेक विषयांचें यांत स्पष्टीकरण केलें आहे. हें परिशिष्ट श्रौतसूत्राचेंच शेषभूत आहे. यावर कर्क, विशालक्षेत्रवासि सोमसुत, सम्राट्स्थपति अग्निचित् रामचंद्र, काशीवासी नागरज्ञातीय रामचंद्रसुत गंगाधरपाठक, काशीस्थ मोढज्ञातीय महीधर, सरलाव्याख्याकार वेदाचार्य विद्याधरशर्मा प्रभृति प्राचीन अर्वाचीन पंडितांच्या अनेक व्याख्या आहेत. पैकीं रामचंद्र [ राम वाजपेयी ] याचें वार्तिक व भाष्य अशीं दोन्हीहि आहेत.

## ८ प्रातिशाख्य

याचे ८ अध्याय आहेत. आठी अध्याय मिळून सूत्रसंख्या ७१६ आहे. यांत शुक्ल यजुर्वेद संबंधी स्वरवर्णसंस्कार, तद्विषयक विविध संज्ञा व परिभाषा, पदसंस्कार, क्रमलक्षण प्रयोजनादि, तत्संबंधी विविध संधि, वेद-पठणविधि, स्वरवर्णदेवता वगैरे महत्वाचे विषय निरूपण केले आहेत. यावर उवटाची मातृमोद नांवाची व्याख्या आहे. दुसरी पदार्थप्रकाश नांवाची प्रथमशाखी नागदेवात्मज अनंतभट्ट याची व्याख्या आहे. तिसरी

दीपिका नांवाची वैद्यनाथशिष्य सदाशिवअग्निहोत्रिसुत रामाग्निहोत्री याची टीका आहे. चौथी काशीस्थ बालकृष्ण पाठक गोडसे यांनीं संवत् १८०२ मध्यें लिहिलेली **प्रातिशाख्य-प्रदीप-शिक्षा** नांवाची व्याख्या आहे. पांचवी अनंतयाज्ञिककृत **राद्धांतमजरी** किंवा **प्रातिशाख्यप्रकाशिका** नांवाची टीका आहे. सहावी **ज्योत्स्ना** नांवाची टीका १७३९ शालिवाहन शकांत श्रीसिद्धेश्वर योगिवरसुत रामचंद्र पंडितानें केली आहे. या प्रमाणें प्रातिशाख्यावर लहान मोठ्या अनेक टीका आहेत.

## ९ सर्वानुक्रम

याचे पांच अध्याय आहेत. त्या अध्यायांत पुनः कंडिकात्मक विभाग आहे. तो खालील प्रमाणें होय.

| अध्याय | कंडिका | सूत्र |
|---|---|---|
| १ | ४० | ६६१ |
| २ | ४० | ४५५ |
| ३ | २३ | २६० |
| ४ | १३ | २२२ |
| ५ | ८ | ७४ |
| ५ | १२४ | १६७२ |

यांत संहितेंतील ऋचा व यजुर्मंत्र यांचे ऋषि, छंद, देवता, विनियोग वगैरे सांगितले आहेत. हें परिशिष्ट श्रौत व स्मार्त या दोन्हीं सूत्रांचें शेषरूप आहे. यावर देवयाज्ञिकाचें व होलीराचें अशीं भाष्यें आहेत. तातचरण श्री अण्णाशास्त्री वारे यांनीं एक व्याख्या नुकतीच लिहिली आहे.

## १० इष्टकापूरण

याच्या ९ कंडिका असून एकंदर सूत्रसंख्या १३० आहे, व शेवटीं शुल्बसूत्राप्रमाणें १७ संग्राहक श्लोक आहेत. चयन यागांतील पांची चितींच्या इष्टकोपधानांचा क्रम, इष्टकांची संख्या, संज्ञा वगैरे विषयांचें विवेचन यांत आलें आहे. हें परिशिष्ट का. श्रौ. सूत्राचेंच शेषभूत आहे. यावर कर्क, देवयाज्ञिक, राम वाजपेयी, कारिकाकार भट्टपुंजसुत विश्वनाथ व तत्सुत अनंत वगैरेंचीं भाष्यें आहेत. पैकीं विश्वनाथाचें भाष्य कारिकारूप असून त्याचेंच विवरण अनंतानें केलें आहे.

११ प्रवराध्याय

याला च प्रावरिकासूत्र व वंशाध्याय अशाही संज्ञा आहेत. कांड व तदंतर्गत कंडिका असें यांचे विभाग आहेत.

| कांड. | कंडिका. | कांड. | कंडिका. | कांड | कंडिका. |
|---|---|---|---|---|---|
| १ | १२ | ४ | ५ | ७ | ६ |
| २ | १७ | ५ | ६ | ८ | १ |
| ३ | १५ | ६ | ३ | ९--५५ | ६५ |
| | | | | ९ | |

नवव्या कांडांत ५५ श्लोक आहेत. यांत भृगु, अंगिरा, विश्वामित्र वसिष्ठ, कश्यप, अत्रि, अगस्ति, द्यामुष्यायण, अशा या आठी गणांतील गोत्र प्रवरें, त्यांचे परस्पर विवाह्याविवाह्य प्रकार प्रवरोच्चारण वगैरें विषयांचें स्पष्टीकरण केलें आहे. हें परिशिष्ट श्रौत व स्मार्त दोन्हीं सूत्रांचें शेषरूप आहे. यावर स्वतंत्र व्याख्या कोणाचीही नाहीं. परंतु प्रवरमंजरीकार पुरुषोत्तम पंडितानें मात्र इतर प्रवराध्यायांचें व्याख्यान करतांना आपल्या प्रवरमंजरींत यांचेंही व्याख्यान केलें आहे.

१२ मौल्याध्याय

याचें सारे सहाच श्लोक आहेत. यांत सुवर्ण, रजत, ताम्र, व वराटिका, यांचें मान, गो, वृष, वर, धेनु, छाग, मेष, दासी, गज, रथ, गृह, निष्क वगैरेंचें प्रतिनिधि मूल्य, पणलक्षण, वगैरें विषय थोडक्यांत सुंदर निरूपण केलें आहेत. हेंही परिशिष्ट श्रौतस्मार्तोभय सूत्रांचें शेषरूप आहे. यावर गोपाल, अग्निचित् विश्वामित्रसुत कामदेव दीक्षित, मूल्यसंग्रहकार, श्री बापू भट्ट, यांच्या व्याख्या आहेत.

१३ उंछशास्त्र

याच्या ३ कंडिका आहेत. यांत ब्रह्मचारी व ऊंछ वृत्तीनें राहणारे वानप्रस्थ व श्रौत स्मार्ताग्निमान् गृहस्थ यांना आमान्न भिक्षा मागण्याचा विधी सांगितला आहे. यावर कोणाचीच व्याख्या नाहीं. हें श्रौत व स्मार्त दोन्ही सूत्रांचें शेषरूप आहे.

१४ निगम

याच्या ३१ कंडिका असून सूत्र संख्या सुमारें ३०० असावी. यांत यज्ञीय पद पदार्थांचें लक्षण व त्यांचा सुबोध अर्थ वगैरेंचें विवरण केलें आहे. हें

परिशिष्ट म्हणजे कठीण शब्दांचा कोष असून कातीयांना असाधारण निघंटु निरूक्तासारखा आहे. यावर कोणाचीच व्याख्या नाहीं. हें श्रौत सूत्रांचें शेषरूप आहे.

### १५ यज्ञपार्श्व

याचें पूर्वयज्ञपार्श्व व उत्तर यज्ञपार्श्व असें दोन भाग आहेत. पहिल्या भागांत ७९ श्लोक असून दुसऱ्यांत १२८ श्लोक आहेत. या परिशिष्टांत संस्कार, शांतिक, पौष्टिक, स्मार्त, श्रौत, साग्निक, निरग्निक वगैरें कर्मकालीन अनेक भिन्न भिन्न विषयांचें विवेचन आलें आहे. हें परिशिष्ट श्रौत स्मार्त उभय सूत्रांचें शेषभूत आहे. यांवर तातचरण श्री. अण्णाशास्त्री वारे यांनीं यज्ञपार्श्व–प्रदीप नांवाची व्याख्या लिहिली आहे.

### १६ हौत्रसूत्र

याचे ५ अध्याय आहेत व त्यांत कंडिकात्मक पोट विभाग आहे.

| अध्याय | कंडिका | सूत्र | अध्याय | कंडिका | सूत्र |
|---|---|---|---|---|---|
| १ | १३ | | ४ | ११ | |
| २ | १२ | | ५ | ५ | |
| ३ | १३ | | ५ | ५४ | |

यांत दर्शपूर्णमास, आधान, पुनराधान, प्रायश्चित्तेष्ट्या, आग्रयण, अन्वारंभणी इष्टि, काम्येष्ट्या, चातुर्मास्ययाग, पशुबंध, [ नीरूढपशु ] वगैरेंचे क्रमानें याजुषहौत्र व त्याची सर्वसाधारण संज्ञा, व परिभाषा हे विषय सांगितलें आहेत. हें श्रौतसूत्रांचें शेषभूत आहे. यावर कर्कांचें भाष्य असून सदाशिव कण्व व नानाजी मेहेकरकर काशीस्थ यांच्या पद्धति आहेत. पैकीं मेहेकरकराची पद्धति भाष्याइतकी महत्त्वाची व योग्यतेची आहे.

### १७ प्रसवोत्थान

याच्या फक्त २ च कंडिका आहेत. यांत संन्यासग्रहणाचा प्रकार सांगितला आहे. हें श्रौत व स्मार्त दोन्ही सूत्राचें शेषरूप आहे. यावर कोणाचीही व्याख्या नाहीं.

### १८ कूर्मलक्षण

याचे १० श्लोक आहेत. यांत चयन यागाला आवश्यक असणाऱ्या कूर्मांचें लक्षण व वर्ज्यावर्ज्य प्रकार सांगितला आहे. हें श्रौतसूत्रांचें शेषरूप आहे. यावर कोणाचीही व्याख्या नाहीं.

प्रकरण ११ वें

# इतर परिशिष्टें व त्यावरील व्याख्याकार

## १ भाषिकसूत्र

हें प्रातिशाख्याचें शेष आहे. याच्या ३ कंडिका असून सूत्रसंख्या ७३ आहे. यांत शतपथ ब्राह्मणाच्या स्वरसंस्कारांचें निरूपण केलें आहे. यावर नागदेवसुत अनंतभट्ट, महास्वामी वगैरेंच्या व्याख्या आहे.

## २ पार्षद्

हेंही प्रातिशाख्याचें शेष आहे. याच्या १२ कंडिका आहेत. त्यांत शतपथब्राह्मणांतील संशय, निपात व प्लुत वगैरेसंबंधीं विवेचन केलें आहे. यावर कोणाचीही व्याख्या नाहीं.

## ३ प्रतिज्ञासूत्र

हेंही प्रातिशाख्याचें शेष आहे. यांत माध्यंदिन संहितेचे स्वर, संज्ञा व परिभाषा यांचें विवरण केलें आहे. याच्या ३ कंडिका असून सूत्र संख्या २७ आहे. यावर अनंत-देव व म. म. नित्यानंद पंडित यांच्या व्याख्या आहेत.

## ४ यजुर्विधान

यांत संहितेंतील मंत्रांचीं विधानें निरनिराळ्या फलोद्देशानें दिलीं आहेत. याचे ६ अध्याय आहेत. यावर वाघरकुलभूषण राजा कालनाथ याची यजुर्मंजरी नांवाची व्याख्या आहे.

## ५ सूत्र मंजरी प्रकाशिका

याला मंत्र प्रातिहार असेंही म्हणतात. याचे एकंदर ११३ श्लोक आहेत. त्यांतून सूत्र ग्रंथासंबंधीं अत्यंत महत्वाचें विवेचन केलें आहे. यावर व्याख्या नाहीं.

## ६ ऋग्यजुष

यांत संहितेंतील ऋङ्मंत्र व यजुर्मंत्र यांचे पृथक्करण केलें आहे.

## शिक्षा पंचक

शुक्लयजुर्वेदावर पांच शिक्षा आहेत. त्यांही फार महत्वाच्या आहेत.

त्यांपैकीं कांहीं कात्यायनानें केलेल्या व कांहीं भिन्न भिन्न ऋषींनीं केल्या आहेत.

### १ याज्ञवल्क्य शिक्षा

ही याज्ञवल्क्यानें केली आहे. तिच्यांत संहिता पद क्रम यांचे संबंधीं स्वर, वर्ण, उच्चार वगैरेंचें विवरण फारच सुंदर केलें आहे. इच्यावर हरिद्वारस्थ वेदविद्याभूषण पं. विश्वनाथ यांनीं शिक्षालोक नांवांची व्याख्या लिहून प्रसिद्ध केली आहे.

### २ कात्यायनी शिक्षा

इच्यांत स्वरांचें विवरण केलें आहे. इच्यावर जयंत स्वामीची टीका आहे.

### ३ स्वर भक्तिलक्षण शिक्षा

इच्यांतही स्वरांचेंच विवरण केलें आहे. हिजवर व्याख्या नाहीं.

### ४ मन स्वारशिक्षा

ही याज्ञवल्क्यानें केली आहे. इच्यांतही स्वरांचेंच विवरण केलें आहे. हिजवर व्याख्या नाहीं.

### ५ माध्यंदिनीशिक्षा

इचें बृहत् व लघू असें दोन प्रकार असून ती मध्यंदिन ऋषीनें केल्याबद्दल प्रसिद्धी आहे. इच्यांतही स्वरसंस्कारांचेंच विवरण केलें आहे. हिजवर व्याख्या नाहीं.

या शिवाय या विषयांवर वसिष्ठकृत वासिष्ठीशिक्षा १ पराशरकृत पाराशरीशिक्षा २ मांडव्यकृत मांडव्याशिक्षा ३ अमोघनंदनकृत अमोघनंदिनी शिक्षा [ बृहत् व लघु दोन्ही प्रकारची ] ४ अमरेशकृत अमरेशीशिक्षा ५ केशवकृत सकारिका केशवीशिक्षा ६ मल्लशर्मकृत मल्लशर्मशिक्षा ७ रामकृष्णकृत षोडशश्लोकीशिक्षा ८ जयंतस्वामीकृत स्वरांकुश ९ अनंतदेवकृत अवसानशिक्षा १० क्रमसंधानशिक्षा ११ गलदृक्शिक्षा १२ सिद्धेश्वरसुत रामचंद्रकृत सकारिका वेदपरिभाषाशिक्षा १३ स्वराष्टक १४ क्रमकारिका १५ अनंतभट्टकृत जटापटल १६ जटाद्यष्टविकृतिलक्षण १७ बलभद्रसुत देवभद्रकृत मौनमंत्रसूत्र किंवा मौन मंत्रावबोध १८ पदसंख्या १९ पदज्योति २० पदमुष्टि २१ बैठी परिभाषा २२ शंकराचार्यकृत पदकारिकारत्नमाला २३ वगैरे अनेक ग्रंथ झाले आहेत. हे सर्व

ग्रंथ वैदिक विद्याभिलाषी लोकांस अत्यंत उपयुक्त आहेत.

बाकी सर्व भाग शुक्लयजुर्वेदी व सामवेदी या उभयतांना सारखा आहे.

## कात्यायनाचीं इतर सूत्रें

### १ कर्मप्रदीपिका

याला छंदोगपरिशिष्ट असेंही म्हणतात. याची प्रपाठक, खंड व श्लोक, अशी रचना आहे.

| प्रपाठक | खंड | श्लोक |
|---|---|---|
| १ | १० | १५४ |
| २ | ९ | १६१ |
| ३ | १० | १६९ |
| ३ | २९ | ४८४ |

यांत श्रौत, स्मार्त व आचारधर्म या तिन्ही स्कंधांचे विषय आले आहेत. हें गोभिलसूत्राचा शेष म्हणून सांगितले आहे. हें सूत्र स्वशाखीय सूत्रभाष्याला विरोधी जेथें येईल तेवढा भाग छंदोगपर समजावा. यांवर आशार्क, नारायण व शिवराम यांच्या टीका आहेत.

शिवाय परिसंख्या किंवा गृह्यासंग्रह, प्रतिहारसूत्र, उपग्रंथसूत्र, प्रतिपदसूत्र, अनुपदसूत्र, अशीं पांच सूत्रें कात्यायनानें केलीं आहेत. यांच्यांत बहुतकरून यज्ञसंबद्ध औद्गात्रसंबंधींचें विवरण केलेलें आहे. हीं सूत्रें कात्यायनानें छंदोगाचीं म्हणून केलीं असलीं तरी यजुर्वेदीयांस हीं फार उपयुक्त आहेत, कारण यजुर्वेदीयांस औद्गात्र करते वेळीं छंदोगांचाच उपयोग करावा लागतो. यापैकीं प्रतिहारसूत्रावर वरदराजाची **दशतयी** नांवाची टीका आहे. या उपग्रंथ सूत्रकर्तृत्वामुळेंच ऋक्सर्वानुक्रमभाष्यांत षड्गुरुनें कात्यायनास उपग्रंथस्थकारक असें म्हटलें आहे.

तसेंच ऋग्वेदावर सर्वानुक्रम नांवाचें सूत्र केलें आहे. यावर षड्गुरूचें भाष्य आहे.

## अनार्ष परिशिष्टें

" मूलाश्लेषा च यमलं गर्भाधानर्तुसंगमं । उद्यापनं च वाप्यादेः पृष्ठो दिव्यार्थे पूजनं ॥ कांडाष्टकमिदं प्रोक्तं परिशिष्टेन सूत्रतः " इति । मूलशांतिसूत्र १ आश्लेषाशांतिसूत्र २ यमलशांतिसूत्र ३ गर्भाधानसूत्र ४

ऋतुसंगमसूत्र ५ वापीकूपतडागादिसूत्र ६ पृष्ठोदिविविधानसूत्र ७ चत्वारिवेद-व्रतसूत्र ८ शिवाय कर्णवेधसूत्र ९ यमलचरुमारुतसूत्र १० शौचसूत्र ११ आचमनसूत्र १२ भोजनसूत्र १३ रुद्रसूत्र १४ स्नानसूत्र १५ पुण्याह वाचनसूत्र १६ हीं सूत्रें याज्ञिक लोकांनीं तयार करून स्मार्तसूत्रपरिशिष्ट म्हणून ग्रथित केलीं आहेत, असें गदाधर दीक्षितानें आपल्या भाष्यांत व पद्धतींत ठिकठिकाणीं ' याज्ञिकाःपरिपठंति ' असें म्हटलें आहे. त्यावरून दिसतें. यांच्यांतील विषय त्या त्या सूत्राच्या नांवावरूनच स्पष्ट होत आहेत. यापैकीं मूलशांतिसूत्र, आश्लेषाशांतिसूत्र, यमलजननसूत्र, यमलचरुमारुत, वापीकूपतडागादिप्रतिष्ठासूत्र, पृष्ठोदिविविधान, यांच्यावर अग्निचित् विश्वनाथसुत कामदेव दीक्षितांच्या व्याख्या आहेत. भोजनसूत्र अनंतदेवानें केलें असून त्यावर गदाधर दीक्षिताची व्याख्या आहे. रुद्रसूत्र हें उद्धवात्मज द्विवेदी अनंतानें केलें आहे. यावर त्यानेंच रुद्रकल्पद्रुम नांवाचा पांच परिच्छेदात्मक मोठा निबंध लिहिला आहे. स्नानसूत्रावर अग्निहोत्री हरिहर, त्रिमल्ल व स्नानदीपिकाकार गोपीनाथ अग्निहोत्री यांच्या व्याख्या आहेत.

याशिवाय चरणव्यूहांत स्वरव्यंजन, क्रतुशेष, सावित्र, मंत्रज्योति, मंत्रदीपिका वगैरे ग्रंथांचा उल्लेख केला आहे. परंतु ते ग्रंथ उपलब्ध नाहींत.

## उपवेद

' अश्वादीनां संस्कारप्रोक्षणाभ्युक्षणछेदनभेदनपचनपरिकल्पनास्तथाऽन्नपान क्रियार्थाः शौचाचारादिदिगायतिदिग्विभागाश्च ये च यावंतः सर्वे ते यजुर्वेदस्य उपवेदाः ' असा प्रतिज्ञापरिशिष्टांत एक उल्लेख आला आहे. त्यावरून अश्वादिकांचे संस्कार, प्रोक्षण, अभ्युक्षण, छेदन, भेदन पचन, परिकल्पन, ज्यांत सांगितलें आहेत असा धनुर्वेद, अन्नपानादि क्रिया अर्थात् पाकशास्त्र, शौचाचार दिगायति व दिग्विभाग अर्थात् भूगोल व खगोल वगैरे हें सर्व यजुर्वेदाचे उपवेद म्हणन गणले गेले आहेत.

येथपर्यंत एकंदर शुक्ल यजुर्वेदांतील मुख्य मुख्य ग्रंथाचा व त्यांना उपोद्वलक व पोषक अशा वैदिक वाङ्मयाचा स्थूल रूपानें परिचय करून दिला आहे.



प्रकरण १४ वें

# स्मृति

या प्रकरणांत याज्ञवल्क्यस्मृतीचा परिचय करून द्यावयाचा आहे. स्मृति म्हणजे उच्छिन्न श्रुतींचा अर्थ, स्मरणपूर्वक ज्या ग्रंथांत सांगितला त्यांना स्मृति असें म्हणतात. सूत्रमंत्रप्रकाशिकेंत कात्यायनानें हाच अभिप्राय व्यक्त केला आहे. ' श्रुतयः स्मृतिमूलाहि स्मृत्वा ता ऋषिभिः कृ ाः ॥ उच्छिन्नशाखायाः क्वचित्सर्ववेदेषु संमताः ॥ इति सूत्रमंत्रप्रकाशिका ' अर्थात् श्रुति या स्मृतींच्या मूलस्थानीं होत. त्यापैकीं ज्या श्रुति उच्छिन्न झाल्या त्यांचे स्मरण करून क्वचित् विद्यमान श्रुतींचें स्मरण करून त्या त्या ऋषींनीं स्मृति केल्या आहेत. जैमिनीनें स्मृतींचें प्रामाण्य सांगतांना पूर्वमीमांसेच्या तिसऱ्या पादांत स्मृतींचे बाबतींत पुढीलप्रमाणें व्यवस्था केली आहे. १ स्मृती ही आपल्या ला मूलभूत जी श्रुति असेल तिला सापेक्ष राहून प्रमाण होते. २ जेथें प्रत्यक्ष श्रुति नसेल तेथें श्रुतीची कल्पना करून त्या कल्पित श्रुतीला सापेक्ष राहून प्रमाण होते. ३ श्रुति व स्मृति ह्यांचा परस्पर विरोध आला असतां श्रुति प्रबल ठरून ती प्रमाण व स्मृति दुर्बल ठरून ती अप्रमाण ठरते. ४ लोभ, मोह, मत्सर एतन्मूलक स्मृति केव्हांही अप्रमाणच होय. ५ प्रमाणाश्रित किंवा लौकिक अर्थाचा अनुवाद करणाऱ्या श्रुति व प्रमेयाश्रित किंवा अदृष्ट वैदिक अर्थाचा अनुवाद करणाऱ्या स्मृति यांचा परस्पर विरोध आला तर अशा वेळीं स्मृति श्रुतींपेक्षां प्रबल ठरून प्रमाण ठरते. जैमिनीनें ठरविलेल्या नियमाशिवाय इतर शास्त्रकारांनीं ह्यासंबंधीं कांहीं नियम ठरविले आहेत ते असे. कल्पसूत्रें, मन्वादि स्मृत्या, वेदांगसूत्रें, पुराण व इतिहास या सर्वांचा स्मृतींतच अंतर्भाव असून अंतरंग बहिरंग भावाच्या दृष्टीनें पूर्वपूर्वांना प्राबल्य व उत्तरोत्तरांना दौर्बल्य आहे. ७ मनुस्मृति विरुद्ध असलेली स्मृति ही दुर्बल समजावी. ८ कात्यायनानें सूत्रमंत्रप्रकाशिकेंत स्मृत्या कल्पसूत्राप्रमाणें शाखापरत्वानें लावाव्या असें म्हटलें आहे. ' श्रुतिभेदो यथा दृष्टः स्मृतिभेदोऽपि दृश्यते । प्रत्यक्षश्रुत्यभावेऽपि स्वस्य कल्पानुसारतः ॥ या स्मृतिः सा स्वकीया स्यात् स्वस्य कल्पानुसारिणी । परकीया स्मृतिः सा तु स्वस्य

कल्पविरोधिनी ॥ कल्पकर्तुः स्मृतिर्या च या च कल्पानुसारिणी। स्वीयेति सा स्मृतिर्ज्ञेया स्वशाखोक्ताश्रुतिर्यथा ॥ ” अर्थात् ज्याप्रमाणें श्रुतिभेद दिसतो त्याप्रमाणें स्मृतिभेदही आहे. व प्रत्यक्ष श्रुति जरी नसली तरी तो स्मृतिभेद स्वस्वकल्पसूत्राला अनुसरून ओळखावा म्हणजे जी स्मृति स्वकल्पसूत्राला अनुसरून असेल ती स्वशाखीय स्मृति समजावी. व जी स्वकल्पसूत्राला विरोधी असेल ती परशाखीय समजावी. सारांशः– स्वतःच्या कल्पसूत्रकारानें केलेली स्मृति व जी स्वकल्पसूत्राला अनुसरणारी [ मग ती दुसरी कोणाचीही असली तरी हरकत नाहीं.] असेल ती स्मृति स्वशाखीय समजावी. यावरून शाखापरत्वें स्मृत्या लावाव्या. असा कात्यायनाचा स्पष्ट अभिप्राय दिसतो. म्हणूनच शास्त्रदीपिकेच्या तिसऱ्या पादाच्या सामान्यश्रुतिकल्पनाधिकरणांतील ‘ कैश्चित् या पदाचें व्याख्यान करते वेळीं सोमनाथभट्टानें म्हटलें कीं :— ‘ गौतमगोभिलिये छंदोगैरेव पठ्येत । वासिष्ठं बव्हृचैः । शंखलिखितोक्तं । वाजसनेयिभिः । आपस्तंबीयबौधायनीये । तैत्तिरीयैरित्यर्थः ’ । इति । गौतम व गोभिल स्मृति सामवेदी स्वीकारतात, वसिष्ठस्मृति ऋग्वेदी स्वीकारतात. शंख व लिखित यांच्या स्मृत्या वाजसनेयी मानतात. आणि आपस्तंब व बौधायन स्मृति तैत्तिरीय मानतात. आतां शाखापरत्वानें स्मृत्या लावण्याचे बाबतींत एकादें उदाहरण देऊं. विवाह उपनयनादि मंगलोत्तर पिंडदान निषेध सांगणारी स्मृति वाजसनेयींना लागू नाहीं. कारण त्यांना श्राद्धांत पिंडदानच प्रधान आहे व प्रधानावांचून अंगांची प्रवृत्ति नाहीं. मग पिंडदानाचा निषेध केल्यास श्राद्धच करूं नये असें प्राप्त झालें बरें श्राद्धाचा लोप करावा म्हणाल तर तो करणें हें ही बरें नव्हे, कारण तें नित्य असल्यानें न केल्यास पापोत्पादक होईल. तेव्हां वरील नियमाप्रमाणें ज्या शाखेंत ब्राह्मणभोजन श्राद्धांत प्रधान आहे त्या शाखेला [ बव्हृच्यानां ] ही स्मृति लावावी, कारण त्यांचें तें श्राद्ध फक्त प्रधानाच्या अनुष्ठानानें सिद्ध असल्यानें अंगांचा संकोच झाला तरी हरकत नाहीं. अशा रीतीनें कोठेंच अडचण येत नाहीं. याचा अधिक विस्तार स्थलाभावामुळें येथें करणें शक्य नाहीं. शाखापरत्वानें विरोध परिहार करूनही स्मृति स्मृतींत विरोध आल्यास विकल्प मानावा. हे सर्व सामान्य नियम तेवढेच येथें सांगितले आहेत.

वर म्हटल्या प्रमाणें वाजसनेयींना याज्ञवल्क्यस्मृति १ कात्यायनस्मृति

३ शंखस्मृति ३ लिखितस्मृति ४ अशा चार स्मृत्या आहेत. त्यांचा आतां क्रमानें परिचय करून देऊं.

## १ याज्ञवल्क्यस्मृति

ही स्मृति भगवान् योगीश्वर याज्ञवल्क्यानें केली आहे. कांहीं लोकांच्या मतानें याज्ञवल्क्यशिष्यांपैकीं कोणीतरी केली असावी. त्यांच्या म्हणण्यास ते पुरावा असा देतात कीं, विज्ञानेश्वरानें आपल्या मिताक्षराव्याख्येच्या प्रारंभीं असें म्हटलें आहे कीं, " याज्ञवल्क्यशिष्यः कश्चित्प्रश्नोत्तररूपं याज्ञवल्क्यमुनिप्रणीतं धर्मशास्त्रं संक्षिप्य कथयामास यथा मनुप्रणीतं भृगुः " इति । कोणी एक याज्ञवल्क्याचा शिष्य प्रश्नोत्तररूपानें याज्ञवल्क्यानें सांगितलेलें धर्मशास्त्र संक्षेप करून सांगता झाला. कदाचित् त्यांच्या ह्या म्हणण्याप्रमाणें श्लोकात्मक याज्ञवल्क्यस्मृतीची रचना प्रत्यक्ष याज्ञवल्क्यानें केली नसली तरी तिच्यांतील प्रतिपाद्य अर्थ मात्र याज्ञवल्क्यप्रोक्त आहे हें " ज्ञेयं चारण्यकमहं यदादित्यादवाप्तवान् " या. स्मृ. यतिधर्मप्र. श्लो. ११०, जें आरण्यक मी सूर्यापासून मिळविलें तें जाणावें, ह्या त्यांच्या उद्गारावरूनच स्पष्ट समजून येईल व हा अर्थ विज्ञानेश्वरासही संमत आहेच. श्लोकात्मक रचना जरी त्यांच्या एकाद्या शिष्यानें केली असली तरी तीस याज्ञवल्क्यकृत स्मृति म्हणून म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं व तशी प्रसिद्धीही आहे.

याज्ञवल्क्यस्मृति वाजसनेयींना लागू पडत नाहीं, कारण ती त्यांच्या सूत्राविरुद्ध दिसून येते असें कांहीं पंडितांचें म्हणणें आहे. उदाहरणार्थ :— कात्यायनश्राद्धसूत्रांत सर्व दैवतंत्र तिलानेंच सांगितलें तर याज्ञवल्क्यस्मृतींत तें यवानें सांगितलें. सूत्रकारानें सर्व श्राद्ध दैवपूर्वक सांगितलें तर याज्ञवल्क्य-स्मृतींत त्यापैकीं विसर्जन पितृपूर्वक सांगितलें. सूत्रकारानें श्राद्धांतील अनुष्ठान पदार्थानुसमयानें सांगितलें तर याज्ञवल्क्यस्मृतींत तें कांडानुसमयानें व कांहीं पदार्थानुसमयानें सांगितलें. याप्रमाणें अनेक उदाहरणें मिळतील. प्रायः मैत्रायणीयांच्या मानव सूत्राला ही स्मृति जुळती आहे. परंतु हें त्यांचें म्हणणें आम्हांस सयुक्तिक दिसत नाहीं. कात्यायन-श्राद्धसूत्रांत जरी दैवतंत्र यवानें करावें असें स्पष्ट सांगितलेलें नसलें तरी आभ्युदयिकांत मात्र तिलानें कर्तव्य कार्य यवानें करावें असें सांगितलें आहे. आपरपक्षिकांत जसें यवानें करावें असें सांगितलेलें नाहीं तसें तिलानेंच करावें असेंही सांगितलें नाहीं. तिलानें करावें हा

अभिप्राय सूत्रकाराचा असावा असें भाष्यकार कर्कानें अनुमान केलें आहे, तर पितृभूतीनें याज्ञवल्क्यस्मृतीशीं समन्वय करून दैवतंत्र यवानें करावें असें म्हटलें आहे. तसेंच सर्व श्राद्ध दैवपूर्वक करावें ही सूत्रकाराची सामान्यतः प्रतिज्ञा आहे. याज्ञवल्क्यस्मृतींत पितृपूर्वक विसर्जन स्पष्ट निर्दिष्ट केलें आहे. तेव्हां सामान्यविशेषभावानें विचार केला तर हा विरोध येईल असें वाटत नाहीं. कांडानुसमय, पदार्थानुसमय हे व्याख्याकारांच्या दृष्टीनें भेद आहेत, मुळांत उभयत्र त्यांचा निर्देश कोठेंच नाहीं. मैत्रायणीय शाखा व तिचें मानवसूत्र किती झालें तरी यजुर्वेदीयच आहेत व त्या शाखेचा प्रवर्तक श्रुतर्षि चारायण हा याज्ञवल्क्याचा पिता आहे. [ हें पूर्वार्धांत जन्मकथा प्रकरणांत सांगितलें आहे. ] त्या दृष्टीनें विचार करतां याज्ञवल्क्यस्मृति कांहीं बाबतींत त्यांच्याशीं जुळती येणें शक्य आहे. तेव्हां हीं कारणें अत्यंत अपुरीं आहेत. दुसरें सूत्रकार व स्मृतिकार यांच्यांत व्यक्तिभेदानें थोडासा मतभेद असणेंही संभवनीय आहे. तेवढ्यावरून ती वाजसनेयी लोकांना लागू पडत नाहीं असें म्हणतां येत नाहीं. उलट याज्ञवल्क्यस्मृतींत ठिकठिकाणीं आलेल्या मंत्रांच्या प्रतीकावरून व यतिधर्मांतील बृहदारण्यकाचा परामर्ष करणाऱ्या " ज्ञेयं चारण्यकमहं यदादित्यादवाप्तवान् " इत्यादि उल्लेखावरून ती वाजसनेयींनाच लागू आहे हेंच म्हणणें योग्य होईल, अशी आमची खात्री आहे.

याज्ञवल्क्यस्मृतीचे ३ अध्याय असून त्यांना क्रमानें आचाराध्याय, व्यवहाराध्याय व प्रायश्चित्ताध्याय असें म्हणतात. तिन्ही अध्याय मिळून १ वर्णधर्म २ आश्रमधर्म ३ वर्णाश्रमधर्म ४ गुणधर्म ५ निमित्तधर्म ६ साधारण-धर्म, अशा षड्विध स्मार्तधर्मांचें अत्यंत सूक्ष्मपणानें मार्मिक विवेचन केलें आहे. प्रत्येक अध्यायांत प्रकरणात्मक पोटविभाग असून त्यांतील विषयांचा अनुक्रम खालीं दिल्याप्रमाणें आहे.

| अध्याय | प्रकरण | श्लोक |
|---|---|---|
| १ आचाराध्याय | १३ | ३६८ |
| २ व्यवहाराध्याय | २५ | ३०७ |
| ३ प्रायश्चित्ताध्याय | १४ | ३३४ |
| | ५२ | १००९ |

| प्रकरणांक | विषय | प्रकरणांक | विषय |
|---|---|---|---|
| १ | उपोद्घात | २७ | अभ्युपेत्यशुश्रूषा |
| २ | ब्रह्मचर्य | २८ | संविद्व्यतिक्रम |
| ३ | विवाह | २९ | वेतनादान |
| ४ | जातिविवेक | ३० | द्यूतसमाह्वय |
| ५ | गृहस्थधर्म | ३१ | वाक्पारुष्य |
| ६ | स्नातक | ३२ | दण्डपारुष्य |
| ७ | भक्ष्याभक्ष्य | ३३ | साहस |
| ८ | द्रव्यशुद्धि | ३४ | विक्रीयासंप्रदान |
| ९ | दानधर्म | ३५ | संभूयसमुत्थान |
| १० | श्राद्ध | ३६ | स्तेय |
| ११ | गणपतिकल्प | ३७ | स्त्रीसंग्रह |
| १२ | ग्रहशांति | ३८ | प्रकीर्णक |
| १३ | राजधर्म | ३९ | सूतक |
| १४ | साधारणव्यवहार | ४० | आपद्धर्म |
| १५ | असाधारणव्यवहार | ४१ | वानप्रस्थ |
| १६ | ऋणादान | ४२ | अध्यात्म |
| १७ | उपनिधि | ४३ | प्रायश्चित्त |
| १८ | साक्षि | ४४ | कर्मविपाक |
| १९ | लेख्य | ४५ | महापातकादिनिमित्त |
| २० | दिव्य | ४६ | महापातकप्रायश्चित्त |
| २१ | दाय | ४७ | उपपातकप्रायश्चित्त |
| २२ | सीमाविवाद | ४८ | प्रकीर्णकप्रायश्चित्त |
| २३ | स्वामिपालविवाद | ४९ | पतितत्यागविधि |
| २४ | अस्वामिविक्रय | ५० | व्रतग्रहणविधि |
| २५ | दत्तप्रदानिक | ५१ | रहस्यप्रायश्चित्त |
| २६ | क्रीतानुशय | ५२ | कृच्छ्रादिलक्षण |

या विविध विषयांच्या यादीवरून याज्ञवल्क्यस्मृतीची योग्यता व महत्त्व सहजच सिद्ध होत आहे. म्हणूनच सर्व स्मृतींत श्रेष्ठ गणलेल्या

मनुपराशरप्रभृतिस्मृतींत याज्ञवल्क्यस्मृतीची गणना झाली आहे. आजकाल न्यायालयांतून व्यवहाराचे बाबतींत मन्वादि स्मृतींपेक्षां याज्ञवल्क्यस्मृति व तीवरील मिताक्षरा टीका हींच हिंदुधर्मशास्त्र म्हणून गृहीत केलीं गेलीं आहेत, हें सर्वांना माहीत आहेच.

## २ कात्यायन स्मृति

ज्याप्रमाणें याज्ञवल्क्यानें स्मृति केली त्याप्रमाणेंच कात्यायनानेंही स्मृति केली आहे हें निर्विवाद आहे. कारण, हेमाद्रि, मयूख, मिताक्षरा, पराशरमाधव, विवादतांडव, जीमूतवाहनकृत दायभाग, वीरमित्रोदय वगैरे प्रमाणभूत आकरग्रंथांतून कात्यायनस्मृतीचीं वचनें वारंवार उद्धृत केलेलीं दिसतात. आज ही कात्यायनस्मृति ग्रंथरूपानें उपलब्ध नसल्यानें तिच्यांतील विषयासंबंधानें कांहींच लिहितां येणें शक्य नाहीं. सांप्रत, वर दिग्दर्शित ग्रंथांतून कात्यायनाचें नांवावर आढळून येणारे श्लोक, सूत्रें वगैरे एकत्र संगृहीत करून विषयवार ग्रथित करून व्यवस्थितपणें कात्यायनस्मृतीचें संकलन होणें जरूर आहे. कात्यायनाचे म्हणून व्यवहारावरील ६०० श्लोक एकट्या स्मृतिचंद्रिकेंत आले आहेत. लक्ष्मीवेंकटेश प्रेस मुंबई येथें छापलेल्या अष्टादश स्मृतींत छापलेली कात्यायनस्मृति ही खरी कात्यायनस्मृति नसून ती सामवेदीयांच्या सूत्रावर कात्यायनानें केलेली कर्मप्रदीपिका आहे. तीस हें नांव अज्ञानामुळेंच दिलें गेलें आहे.

## ३ शंखस्मृति.

ही शंख नांवाच्या महर्षीनें लिहिली असून तिचे १८ अध्याय आहेत. अध्याय, त्यांची श्लोकसंख्या व त्यांतील विषय खालील प्रमाणें आहेत.

| अध्याय | श्लोक | विषय |
|---|---|---|
| १ | ८ | चारही वर्णांचे धर्म. |
| २ | १३ | संस्कारांचे काल. |
| ३ | १५ | उपनीत द्विजांचें वेदव्रत वगैरे. |
| ४ | १६ | अष्टविध विवाह व चातुर्वर्णिक स्त्रीकरण. |
| ५ | १९ | पंचमहायज्ञ, आतिथ्य, अग्निहोत्रादि गृहस्थधर्म |
| ६ | ७ | वानप्रस्थ धर्म. |
| ७ | ३५ | संन्यासधर्म व अष्टांगयोग. |

| अध्याय | श्लोक | विषय. |
|---|---|---|
| ८ | १६ | नित्यनैमित्तिकादिषड्विधस्नानें. |
| ९ | १५ | विधिपूर्वक क्रियास्नान. |
| १० | २१ | आचमनविधि. |
| ११ | ५ | शतरुद्रियादिजपफळ. |
| १२ | १७ | गायत्रीमंत्र जपफळ. |
| १३ | ५ | तर्पणविधि. |
| १४ | ३३ | दैवपित्र्य ब्राम्हणपरीक्षा वगैरे श्राद्धप्रकरण. |
| १५ | २५ | जननमरणाद्यशौच. |
| १६ | १७ | पात्रशौचादिशुद्धिविचार. |
| १७ | ६६ | महापातकादिप्रायश्चित्त विधि. |
| १८ | १६ | अघमर्षण प्रजापत्यादि विवरण. |
| १८ | ३४९ | |

## ४ लिखितस्मृति.

ही स्मृति लिखित नांवाच्या महर्षीनें केली आहे. हिचे एकंदर ९२ श्लोक आहेत. हिच्यांत त्रैवर्णिकांचे सामान्यधर्म, इष्टापूर्तधर्म, श्राद्धकालदेशविचार, सामान्यतः द्विजांचे आचार, प्रायश्चित्त विधि, वगैरे विषय निरूपण केले आहेत.

शंख व लिखित हे दोघे सहोदर बंधु असून विभक्तपणें भिन्नभिन्न आश्रमांत रहात असत. यांचें बंधुप्रेम जगांत फार नांवाजलेलें होतें. यांचे सारखें बंधुप्रेम व सत्यवादित्व आजपर्यंत कोणी केलें नाहीं व पुढेंही कोणी करणार नाहीं. त्यांच्या संबंधीं बऱ्याच गोष्टी लिहितां येतील परंतु स्थलाभावास्तव तसें करतां येत नाहीं. असो. या प्रकरणाचे आरंभीं स्मृतिप्रामाण्यव्यवस्थेच्या आठव्या कारणांत सांगितलेल्या 'शंखलिखितोक्तं वाजसनेयिभिः' या कारणामुळें या दोन्ही स्मृत्यांचा संक्षेपानें परिचय करून दिला आहे.



# याज्ञवल्क्यस्मृतीवरील टीकाकार

## १ विश्वरूपाचार्य

यांची याज्ञवल्क्यस्मृतीवर अत्यंत विस्तृत अशी **बालक्रीडा** नांवाची टीका आहे. आद्यशंकराचार्यांच्या हस्तामलकाचार्य, तोटकाचार्य, पद्मपादाचार्य व विश्वरूपपादाचार्य या शिष्यांपैकीं विश्वरूपपादाचार्य व याज्ञवल्क्यस्मृति टीकाकार विश्वरूपाचार्य ही एकच व्यक्ति होय. यालाच सुरेश्वराचार्य म्हणत असत. ह्यानें संन्यास घेतला होता. याचे पूर्वाश्रमींचें नांव मंडनमिश्र असून हा माहिष्मती [ हल्लींचें नर्मदातटाकींचें महेश्वर ] चा राहाणारा माध्यंदिन शाखेचा होता. ' **इति याज्ञवल्कीये परमभट्टारकप्रणीते धर्मशास्त्रे विश्वरूपकृतविवरणबालक्रीडायां द्वितीयोऽध्यायः** ' अर्थात् विश्वरूपाचार्य हा श्रीशंकराचार्यसमकालीन होय. ' याज्ञवल्क्यमुनिभाषितं मुहुर्विश्वरूपविकटोक्तिविस्तृतं ' याप्रमाणें विज्ञानेश्वरानें आपल्या मिताक्षराटीकेच्या मंगलांत विश्वरूपाच्या टीकेचा उल्लेख केला आहे.

## २ अपरादित्यदेव

यांची याज्ञवल्क्यस्मृतीवर **अपरार्क** नांवाची टीका आहे. अपरादित्यदेव हा विद्याधर वंशांत उत्पन्न झालेल्या शिलहार कुलभूषण राजा जीमूतवाहनाच्या शाखेंत उत्पन्न झालेला आहे. हाही महान् सम्राट् होऊन गेला हें पुढील श्लोकावरून लक्षांत येईल. '**राष्ट्रं यस्य निरंकुशा वसुमती कोशः समृद्धः सुहृच्छक्तो दुर्गमनागमंक्षत परा सेना हिता मंत्रिणः । शास्त्रार्थामृतचर्वणार्पितमतिर्विश्वैकनाथोऽप्यसौ शौर्योदार्ययशोधनोऽमुमपरादित्यो निबंधं व्यधात् ।। इति श्रीविद्याधरवंशप्रभवश्रीशिलाहारनरेंद्रजीमूतवाहनान्वयप्रसूतश्रीमदपरादित्यदेवविरचिते याज्ञवल्कीयधर्मशास्त्रनिबंधेऽपरार्के प्रायश्चित्ताध्यायः**' । इति. दाक्षिण इतिहास कोशांत शिलाहार वंशीय राजे कोकण प्रांतांत राहून राज्य करीत असें लिहिलें आहे.

### ३ विज्ञानेश्वर

याची याज्ञवल्क्यस्मृतीवर अर्थानें विपुल पण अक्षरानें परिमित म्हणून मिताक्षरा नांव असलेली टीका आहे. 'नासीदस्ति भविष्यति क्षितितले कल्याणकल्पं पुरं नो दृष्टः श्रुत एव वा क्षितिपतिः श्री विक्रमार्कोपमः। विज्ञानेश्वरपंडितो न भजते किंचान्यदन्योपमश्चा-कल्पं स्थिरमस्तु कल्पलतिकाकल्पं तदेतत्त्रयं ॥ स्रष्टा वाचां मधुरवपुषां विद्वदाश्चर्यसीम्नां दाताऽर्थानामतिशयजुषामर्थिसार्थार्थे नामा। आ च प्राचः समुद्रान्नतनृपतिशिरोरत्नभाभासुरांघ्रिः पायादा-चंद्रतारं जगदिदमखिलं विक्रमादित्यदेवः।' इति. या श्लोकावरून विज्ञानेश्वर हा राजा विक्रमादित्यदेवाच्या समकालीन असून त्याच्याच आश्रयास होता, असें दिसतें. हा कल्याणपुर म्हणजे सांप्रत हैदराबाद स्टेटमध्यें कल्याण-कीर्ति या नांवानें प्रसिद्ध असलेल्या गांवीं रहात असे. कारण चालुक्य वंशांतील राजांची तें गांव राजधानी होतें विक्रमादित्यदेव याच वंशांत उत्पन्न झाला होता. याचा राज्यकाल शालिवाहन शक ९९८ ते १०४८ पर्यंतचा मानिला जात आहे. 'उत्तमोपपदस्येयं शिष्यस्य कृतिरात्मनः। धर्मशास्त्रस्य विवृतिर्विज्ञानेश्वरयोगिनः। इति श्री भारद्वाजपद्मनाभभट्टोपाध्याया-त्मजस्य श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यविज्ञानेश्वरभट्टारकस्य कृतौ ऋजुमिताक्षरायां याज्ञवल्क्यधर्मशास्त्रविवृतौ प्रायश्चित्ताध्यायस्तृतीयः समाप्तः।' इति. या लेखावरून विज्ञानेश्वर हा भारद्वाजगोत्रोत्पन्न पद्मनाभ भट्टोपाध्यायांचा पुत्र होय. यानें संन्यास घेतलेला असून हा उत्तमोपपद यांचा शिष्य होता. तसेंच हा महायोगी असून यानें संन्यास घेतल्यानंतरच ही टीका लिहिली असावी असें दिसतें. ही मिताक्षरा टीका याज्ञवल्क्य स्मृतीचे सर्व टीकांपेक्षां फार महत्वाची असून हल्लींच्या न्यायालयांतून हिला फार मोठा मान आहे.

### ४ मित्रमिश्र

यानेंही याज्ञवल्क्य स्मृतीवर वीरमित्रोदया नांवाची टीका लिहिली आहे. मित्रमिश्र हा बुंदेलखंडांत ओरछा येथील राजकुलोत्पन्न राजा वीरसिंह देव याच्या आश्रयास राहात असे. हा राजा अकबर बादशहाच्या समकालीन होऊन गेला असल्यानें मित्रमिश्रही तत्समकालीनच होऊन गेला असला पाहिजे. मित्र-

मिश्र हा मूळ रहिवाशी गोपालाचल म्ह. हल्लींचें ग्वालियर येथील असून हंस पंडिताचा पौत्र व परशुरामामिश्राचा पुत्र होय. यानें एक आनंदचंपू नांवाचा ग्रंथ केला असून त्याचे शेवटीं पुढील प्रमाणें एक श्लोक दिला आहे. 'सनाढ्यः स गुणाढ्य एव विदधे श्रीमित्रमिश्रः कृती। शाके खांकगततुपरिमिते ह्यानंदकंदाभिधां चंपूं पूरितवान्सितस्मरतिथौ श्रीमित्र-मिश्रः कृती॥" इति. यावरून हा पंचगौडांतर्गत सनाढ्य ब्राह्मण असून संवत् १६९० च्या २५ - ३० वर्षे अगोदर होऊन गेला असावा, असें दिसतें. यानें वीरमित्रोदय नांवाचा २२ प्रकाशात्मक विभागानें युक्त असा धर्मशास्त्रा-वर महानिबंध रचला आहे. त्याची ग्रंथसंख्या सुमारें २ लक्ष आहे. सर्वच ग्रंथ यानें स्वतःच केले असावे असें वाटत नाहीं. कारण 'वित्तं मत्वाऽप्यसारं वितरदविरतं याज्ञवल्क्योक्तिमुक्ताहारं स्मृत्यर्थसारं रचयितुमथ स प्रादिशन्मित्रमिश्रम्' इति.

'उत्तंसस्तीरभुक्तेरखिलबुधगुरुः श्रीसदानंदधीमान् श्रीभाजो मित्र-मिश्राज्जगदुपकृतये बिभ्रदादेशदीपं । ज्ञानानां दैन्यदोषापहमकलिभयं याज्ञवल्क्योक्तिकोषात् दृष्ट्वा स्मृत्यर्थसारं समचिनुत यशोधर्म-लक्ष्मीविहारम्' ॥ या श्लोकांवरून कांहीं ग्रंथ आपल्या शिष्य किंवा मित्र अस-लेल्या पंडितांकडून ही करविले असावे असें वाटतें. त्यापैकीं ही टीका मैथिल पंडित सदानंद याकडून करविली असून ती आपले नांवावर प्रसिद्ध केली असली पाहिजे असा एक लोकप्रवाद सुरू असल्याचें दिसतें.

### ५ लक्ष्मी व तत्सुत बालंभट

याज्ञवल्क्यस्मृतीच्या व्यवहाराध्यायावरील मिताक्षरेवर बालंभट्ट यानें लक्ष्मी नांवाची टीका लिहिली आहे. ह्या टीकेचें नांव जरी लक्ष्मी असें आहे तरी ती बालंभट्टी या नांवानेंच प्रसिद्ध आहे. 'इति श्रीमन्मिताक्षराव्याख्याने महादेवभट्टात्मजवैद्यनाथांगभूत पायगुंडे इत्युपाख्यबालकृष्णविरचिते लक्ष्म्यभिधे व्यवहारप्रकरणे ।'इति. बालंभट अथवा बालकृष्ण हा पायगुंडे कुलोत्पन्न महादेव-भट्टाचा पौत्र व वैद्यनाथाचा पुत्र होय. यानें आपल्या मातेचें स्मारक म्हणून या टीकेचें नांव लक्ष्मी असें ठेविलें, असें या लेखावरून दिसतें. पायगुंडे घराणें काशीस राहात असल्याची प्रसिद्धी आहे. हा नागेशभट्टाचा शिष्य असून महापंडित म्हणून प्रसिद्ध होता. याचा जीवनकाल सं. १६२२ ते १६८५

चा मानितात. याची माता लक्ष्मी अर्थात् वैद्यनाथाची पत्नी हिनें आचाराध्याया-वर आपल्या नांवाची टीका लिहिली असावी असें दिसतें. कारण मुंबई वैभव प्रेस मध्यें श्री. घारपुरे यांनीं छापलेल्या प्रतींत आचाराध्यायाचे शेवटीं पुढील प्रमाणें लेख आहे. "इति श्रीमन्मिताक्षराव्याख्याने महादेव-भट्टात्मजोमांगवैद्यनाथार्धांगभूतबालकजननिपायगुंडइत्युपाख्यश्रीलक्ष्मीदेवीविराचिते लक्ष्म्याभिधे आचारप्रकरणम् ।" वरील दोन निरनिराळया समाप्ति-लेखावरून लक्ष्मीनें सुरू केलेली टीका बालंभट्टानें पुरी केली असें दिसतें.

## ६ सुबोधिनीकार

सुबोधिनीटीका ही सुद्धां याज्ञवल्क्यस्मृतीवरील मिताक्षराटीकेच्या फक्त व्यवहाराध्यायाचीच टीका आहे. या टीकेचा कर्ता कौशिकवंशभूषण पेदिभट्टाचा पुत्र विश्वेश्वरभट्ट हा होय. याच्या गुरूचें नांव प्रवरमुनि व्यासारण्य असें होतें व आईचें नांव अंबिका असें होतें, हें त्याच्या टीकेच्या आदि अंतीं असलेल्या श्लोकांच्या खालीं दिलेल्या कांहीं उताऱ्यांवरून स्पष्ट दिसतें, योऽल्पभट्टात्मजः श्रीमान् भट्टविश्वेश्वरः सुधीः । व्याख्यां मिताक्षराख्यायाः कुरुतेऽयं सुबोधिनीम् ॥ इयं व्यासारण्यप्रवरमुनिशिष्यस्य भणितिः माता पुण्यचरित्रकीर्तिविभवा यस्यांबिका नामतः । शाकल्यापरमूर्तिरा-र्यचरितः श्रीपेदिभट्टः पिता ॥ सोऽयं कौशिकवंशभूषणमणिः श्रीभट्टविश्वेश्वरः ॥ इति श्रीमहापंडितसूरिश्रीपेदिभट्टात्मजभट्टविश्वेश्वर-विरचितायां मिताक्षराव्याख्यायां सुबोधिन्याख्यायां व्यवहारालोको नाम द्वितीयोऽध्यायः समाप्तः ।"

## ७ मिहिरचंद्र

यानेंही याज्ञवल्क्यस्मृतीवर पदयोजना नांवाची टीका केली आहे. याचें अधिक वृत्त उपलब्ध झालें नाहीं, तथापि हा बराच अर्वाचीन असावा असें वाटतें.

## ८ उज्ज्वलदत्त

यानेंही याज्ञवल्क्यस्मृतीवर टीका केल्याचा उल्लेख सांपडतो.



प्रकरण १६ वें

# इतर वाङ्मय

## १ आत्मपुराण

हा ग्रंथ केवळ शुक्ल यजुर्वेदीय नसला तरी तो शुक्लयजुर्वेदीयांच्या दृष्टीनें महत्वाचा आहे. कारण हा ग्रंथ ईशादि बृहदारण्यकांत दशोपनिषदें व आणखी कांहीं महत्वाचीं उपनिषदें यांवर आहे. यांत ईशोपनिषद् व बृहदारण्यक यांचें विवरण करतांना ५-६-७ व १० या अध्यायांतून याज्ञवल्क्याचें फार विस्तृत चरित्र दिलें आहे. हें आत्मपुराण सुप्रसिद्ध विद्यारण्याचे गुरु शंकरानंद यांनीं गुरुशिष्यसंवादात्मक असें केलें असून यावर प्रख्यात काकारामपंडित यांची टीका आहे.

## २ याज्ञवल्क्य गीता

ही गीता याज्ञवल्क्यानें आपली ज्येष्ठ भार्या मैत्रेयी व इतर अनेक ऋषि यांचे समक्ष ब्रह्मवादिनी स्त्री वचक्नुकन्या गार्गी इजला सांगितली आहे. या गीतेंत अष्टांग योगाचें अतिशय सुंदर निरूपण केलेलें आहे. ह्या गीतेचे १२ अध्याय असून एकंदर श्लोकसंख्या ४९० आहे. हिच्यावर कोणाचीहि टीका नाहीं.

## ३ याज्ञवल्क्य विश्वावसु संवाद

याज्ञवल्क्याचा व विश्वावसु गंधर्वाचा असाच संवाद योगशास्त्र व वेदांतशास्त्र यावर झालेला आहे, तोही अत्यंत अभ्यसनीय आहे. हा संवाद महाभारत शांतिपर्व अ. ३२३ मध्यें आला आहे.

## ४ वेदांग याजुष ज्योतिष

लगधानें सर्ववेदसाधारण ज्योतिष केलें आहे. परंतु यजुर्वेदासंबंधा त्यानें स्वतंत्र ज्योतिष केलें आहे. याचे एकंदर श्लोक ४३ आहेत. सर्व साधारण असलेलें लगध ज्योतिष व याजुष ज्योतिष बहुतांशीं सारखेंच आहे. यावर भाष्यही आहे.



प्रकरण १७ वें

# सामाजिक प्रश्न

या प्रकरणांत शुक्लयजुर्वेदीय लोक किंवा त्यांचें वैदिक वाङ्मय यांच्यावर इतर समाजाकडून जे आक्षेप केले जातात त्यांचा थोडासा परामर्श घेण्याचें ठरविलें आहे.

१ ब्रह्मपुराणांत कलियुगाचे धर्म सांगतांना पुढील श्लोक आला आहे. 'सर्वे ब्रह्म वदिष्यंति द्विजा वाजसनेयकाः। शूद्रा भोवादिनश्चैव ब्राह्मणाश्चांत्यवासिनः ॥' इति. हाच श्लोक हरिवंशांत थोड्याशा पाठभेदानें आढळतो, तो असा– 'सर्वे ब्रह्म वदिष्यंति सर्वे वाजसनेयिनः । शूद्रा भोवादिनश्चैव भविष्यंति युगक्षये ।' इति. याच्याच पुढें दोन श्लोक टाकून आणखी एक श्लोक आला आहे, तो असा " अंत्या मध्ये निवत्स्यंति मध्याश्चांत्यावसायिनः । यथानिम्नं प्रजाः सर्वा गमिष्यंति युगक्षये।'' इति [हरिवंशे अ. १८४ - १३ - १६]. या श्लोकांचा अर्थ विपरीत करून वाजसनेयी लोकांचा हीनपणा दाखविण्याचा कांहीं लोक प्रयत्न करतात. ह्या श्लोकांचा अर्थ अधिक्षेपक लोक असा करितात कीं, कलियुगांत सर्व वाजसनेयि ब्राह्मण, ब्रह्मवाद करणारे [वृथा वेदांतवादी] होतील. उदरंभरणाकरितां शूद्रांना सुद्धां उच्च पदानें संबोधितील आणि म्लेंच्छ देशांत राहातील. अशा रीतीनें अर्थ करणें म्हणजे स्वतःच्या अल्पमतीचें प्रदर्शन करणें होय. ह्या श्लोकांचा वास्तविक अर्थ असा आहे कीं, कलियुगांत सर्वच ब्राह्मण, मग ते अधिकारी असोत वा नसोत, ब्रह्मवाद करणारे होतील. म्हणजे ब्रह्मवादाचें मिष करून कर्मभ्रष्ट होतील. पुनः 'सर्वे' हें पद मंडुकप्लुतिन्यायानें पुढें सर्वत्र अन्वित करावयाचें म्हणजे पुढील श्लोकाचा अभिप्राय लक्षांत येईल. तो असा. कलिदोषप्रभावानें विद्या, कुल, धन, मद, यांच्या आधीन होऊन स्वस्ववेद व तच्छाखा ह्यांचा ते त्याग करतील व नंतर पश्चात्ताप पावून वेदाच्या आश्रयार्थ वाजसनेयी* होतील, म्हणजे शुक्लयजुर्वेदाचें अध्ययन करतील. सारांश कलियुगांत सर्वत्र बाहुल्यानें वाजसनेयी

* कलौ माध्यंदिनी शाखा कलौ चंडीविनायकौ । इतिस्मृतेः ।

माध्यंदिनी शाखाच आस्तित्वांत राहील. तसेंच बहुतेक ब्राह्मण शूद्रांना उच्च पदानें संबोधितील व मध्यदेश पुण्यभूमीचें वास्तव्य सोडून म्लेच्छ देशांत राहूं लागतील. ह्याच अर्थ वास्तविक आहे हें वर उद्‌धृत केलेल्या हरिवंशांतील श्लोकावरून स्पष्ट प्रतीत होतें व ह्या श्लोकांची व्याख्या नीलकंठ चतुर्धरानें अशीच केली आहे. तात्पर्य, कलियुगांत वाजसनेयी लोक अवशिष्ट राहाणार असल्यानें त्यांचें अस्तित्व कलिधर्म प्रसंगानें सांगितलें. तेवढ्यावरून ते निंद्य कसे ठरणार? बाकीच्या वेदांच्या उच्छेदानें वेदत्रय, वेदचतुष्टय साध्य यज्ञयागादि अनुष्ठानांचा नाश होईल हेंच व्यासास सांगावयाचें होतें. ( २ ) दुसरा आक्षेप 'शूद्रा वाजसनेयिनः' या वचनाला अनुसरून केला जातो. तो असा कीं, वाजसनेयी लोक काय जाणून बुजून शूद्रच होत. जवळ जवळ अशासारखा वरील वचनाचा उपयोग आहिताग्नि शंकर रामचंद्र राजवाडे यांनीं सनातन वैदिक धर्म मंडळ पुणें, या संस्थेच्या शके १८४६ च्या तिसऱ्या अहवालांत केला आहे. शके १८४६ च्या सालींच आहिताग्नि राजवाडे नाशकास प्रवचनाकरितां आले होते ते वेळीं या बाबतींत त्यांचेकडे खुलासा मागितला असतां त्यांनीं खुलासा केला कीं "निबंध ग्रंथ साभिमान पौरुष ग्रंथ असल्यामुळें त्यांत निर्मूल अव्यवहार्य व विसंगत असे प्रकार आढळतात- उदाहरणार्थ - 'शूद्रा वाजसनेयिनः।' व 'तैलंगकर्नाटकलिंगसंबंधिनो माथुरियाश्च विप्राः। श्राद्धे विवाहे खलु यज्ञपाके न पूजनीया अपि शंभुतुल्याः।' अर्थात् असलीं अव्यवहार्य वाक्यें ज्या निबंध ग्रंथांत असतील किंवा ज्यांच्या तोंडीं येतील, ते निबंधग्रंथ किंवा ते वादी आम्ही अप्रमाण समजतों. आतां हीं वाक्यें मूळ कोठें उत्पन्न झालीं व कोणत्या अर्थानें उत्पन्न झालीं, तें आम्हांस माहीत नाहीं. तीं चांगल्या अर्थानें झालीं असतील तर आमचें कांहींच म्हणणें नाहीं. पण जर वाईट अर्थानें कोणी म्हणत असतील तर वाईट अर्थानें बोलणाऱ्या ग्रंथांचें प्रमाण आम्हांस मान्य नाहीं." श्री. राजवाडे यांनीं हा खुलासा करून आपल्या मनाची समतोल वृत्ति व सरळपणा व्यक्त केला तो त्यांना भूषणावह आहे.

आतां 'शूद्रा वाजसनेयिनः' हें वाक्य मूळ कोठें उत्पन्न झालें व त्याचा वास्तविक अर्थ काय हें पाहूं. हें वाक्य गौडनिबंधांत दक्षाचें म्हणून उद्‌धृत केलें असें कमलाकरभट्टानें शूद्रकमलाकरांत म्हटलें आहे व त्याचा अर्थही पुढील प्रमाणें दिला आहे. "शूद्राणां पंचमहायज्ञाश्च भवंति

भार्यारतः शुचिर्भृत्यभर्ता श्राद्धक्रियारतः । नमस्कारेण मंत्रेण पंचमहायज्ञान्न हापयेदिति याज्ञवल्क्योक्तेः । एतच्च मिताक्षरायां स्पष्टं । भारते राजधर्मेषु 'तस्माच्छूद्रः पाकयज्ञैर्यजेताव्रतवान्स्वयं । दक्षिणा पाकयज्ञानां हिरण्यं तु विधीयते ॥ ते च वाजसनेयिशाखया कार्याः । शूद्रावाजसनेयिन इति गौडनिबंधे दक्षोक्तेः । हरिहरभाष्ये विवाहप्रकरणेऽप्येवमुक्तं।" इति . अर्थात् शूद्रांना पंचमहायज्ञाधिकार आहे. कारण याज्ञवल्क्यानें सांगितलें आहे कीं, नमस्कार मंत्रांनीं पंचमहायज्ञ करावेत. पण त्यांचें अननुष्ठान होऊं देऊं नये. भारतांत राजधर्मांतही शूद्रांना पाकयज्ञांचा अधिकार आहे, असें सांगितलें आहे. शूद्रांनीं जें कांहीं कर्मानुष्ठान करावयाचें तें वाजसनेयि शाखेनें करावें, असें गौडनिबंधांत दक्षानें म्हटलें आहे. हरिहरभाष्यांत विवाहप्रकरणींही असेंच म्हटलें आहे. 'शूद्रा वाजसनेयिनः'* या वाक्यांत 'शूद्राः' हें पद उद्देश्य असून 'वाजसनेयिनः' हें पद विधेय आहे. शूद्र हे वाजसनेयी होत. वाजसनेयी ही संज्ञा मंत्रनिमित्तक अर्थात् एतत्संज्ञक वेदनिमित्तक होय. शूद्रांना तर वेदाध्ययनादिकाचा अभाव असल्यानें ही संज्ञा मुख्यार्थानें लागूं शकत नाहीं. यासाठीं लक्ष्यार्थानें शूद्र वाजसनेयी होत म्हणजे वाजसनेयी (शाखेच्या) वेदाच्या तंत्राप्रमाणें [ अमंत्रकच पण क्रियाकलापाची सरणी मात्र वाजसनेयी लोकांप्रमाणें ] कर्मानुष्ठान करणारे होत. हाच अर्थ वास्तविक आहे. येथें हा विषय मुद्दाम आम्ही दिला आहे; कारण वरील प्रमाणें पुनः स्वकीय अगर परकीय कोणीही असो, त्याचा या वचनाचे बाबतींत गैरसमज होऊं नये व वस्तुस्थिती लक्षांत यावी.

३ कांहीं आक्षेप ज्ञानकोशकार डॉ. श्री. व्यं. केतकर यांनीं केले आहेत, त्यांचा विचार करूं. डॉक्टर साहेब म्हणतात - "वाजसनेयी संहितेचे शेवटचे १५ अध्याय मागाहून झालेले आहेत, यांत शंका नाहीं. ३० वा अध्याय मागाहून जोडलेला आहे, हें त्या अध्यायावरूनच स्पष्ट होतें. कारण त्यांत

---

* आर्षक्रमेण सर्वत्र शूद्रा वाजसनेयिनः ।
तस्माच्छूद्रः स्वकं कर्म यजुर्वेदीव कारयेत् ॥
इति शूद्राह्निकाचाररत्ने ।

आध्वर्यव मंत्र मुळींच नसून पुरुषमेध यज्ञामध्यें निरनिराळया अनेक देवतांना किंवा शक्तिवाचक देवतांना जे लोक बळी द्यावयाचे त्यांचीं नांवें फक्त दिलेलीं आहेत. शेवटच्या अध्यायांतील विषयावरूनच ते अध्याय मागाहूनचे असावेत असें ठरतें. शिवाय या मताला बळकटी आणणारी एक अशी गोष्ट आहे कीं कृष्णयजुर्वेद संहितेंतील मंत्रासारखे मंत्र वाजसनेयीसंहितेंतील पूर्वार्धांत मात्र आहेत.'' [ ज्ञानकोष प्रस्ता० खंड, वेदप्रवेश- यजुर्वेदप्रकरण विभाग २ रा. ]

डॉक्टर साहेबांचें हें म्हणणें आमच्या समजुतीप्रमाणें अत्यंत चुकीचें आहे. कारण त्यांचे मतें वाजसनेयी संहितेचे शेवटचे १५ अध्याय मागाहून झालेले आहेत यास आधार काय तो त्यांतील विषयांचा व कृष्णयजुर्वेदांतील मंत्राप्रमाणें मंत्र त्या अध्यायांत नाहींत ह्याचा होय, परंतु हीं दोन्हीं कारणें बरोबर नाहींत. शेवटच्या १५ अध्यायांना खिल म्हणतात. खिल म्हणजे शेष (उरलेले). यावरून डॉक्टर साहेबांनीं ही कल्पना केली असल्यास त्यांचें या बाबतींत अज्ञान आहे, असेंच म्हणणें भाग आहे. प्रथमच्या २५ अध्यायांत जो कर्मभाग सांगितला त्याच कर्माला पूरक असा कांहीं कर्मभाग, जो पूर्वी सांगावयाचा राहिला तो, व कांहीं स्वतंत्र पुरुषमेध सर्वमेधासारखीं कर्मे व ज्ञानभाग या १५ अध्यायांतून सांगितला असल्यामुळें त्यांना खिल म्हणजे शेष असें म्हटलें आहे. मागाहून जोडले म्हणून शेष असें म्हटलें नाहीं. हीच गोष्ट त्यांतील विषयांची होय. पहिल्या २५ अध्यायांतील विषय व शेवटच्या १५ अध्यायांतील विषय यांची परस्पर सापेक्ष असलेली वृत्ति आहे. दोन्ही भाग एककालीन असल्याशिवाय पूर्वीच्या २५ व शेवटच्या १५ अध्यायांतील कर्में संपूर्ण होणेंच शक्य नाहींत. उदाहरणार्थ :– पूर्वार्धांत सांगितलेला सोमयाग उत्तरार्धांतील धर्माशिवाय पूर्ण होणें शक्य नाहीं व पूर्वार्धांतील अश्वमेध वगैरे याग उत्तरार्धांतील २८ - २९ व ३९ या अध्यायांतील मंत्रांशिवाय पूर्ण होणें शक्य नाहींत. तसेंच उत्तरार्धांतील पुरुषमेध सर्वमेध वगैरे याग पूर्वार्धांतील सोमयागाच्या सर्वसामान्य इतिकर्तव्यतेशिवाय पूर्ण होणार नाहींत. दुसरें, कृष्णयजुर्वेदाप्रमाणें सर्व मंत्र असावेत किंवा असणें हें कांहीं अगोदर झाल्याचें निदर्शक नाहीं. तसेंच कृष्णयजुर्वेदाप्रमाणें मंत्र नसणें हेंही मागाहून झाल्याचें निदर्शक नाहीं. कारण याज्ञवल्क्यानें कृष्णयजुर्वेद टाकल्यानंतरच सूर्याजवळ शुक्लयजुर्वेद मिळविला. तो थोडा अगोदर मिळविला थोडा मागाहून मिळविला

बाब कांहींच पुरावा नाहीं. तसेंच ३० व्या अध्यायांत आध्वर्यव मंत्र मुळींच नाहींत असें नाहीं. "देव सवितरिति प्रत्यृचं तिस्र आहुतीराहवनीये जुहोति.।" असा कात्यायनानें ३० व्या अध्यायांतील पहिल्या ३ मंत्रांचा स्पष्टपणें विनियोग अध्वर्युकर्मांत केला आहे. बाकीच्या मंत्रांतून त्या यज्ञांतील पशु सांगितले आहेत, त्यांचा उत्सर्ग असून बलिदान कोठेंच सांगितलें नाहीं. तेव्हां बलिदानावरून तो अध्याय मागाहूनचा ठरत नाहीं. डॉ. साहेबांच्या प्रमाणें मानल्यास कृष्णयजुर्वेदाचा भाग पदोपदीं ब्राह्मणमिश्र असल्यानें त्याची फारच शोचनीय स्थिति होईल. डॉक्टर साहेबांची ही विधानें म्हणजे स्वतःच्या वेदाचें यातयामत्व मलिनत्वादि दोष झांकण्याकरतां दुसऱ्यावर बळेंच कांहीं दोषांचा बोजा लादून आपणासारखें करून ठेवण्याचा प्रयत्न होय.

डॉक्टर साहेबांचें आणखी असें म्हणणें आहे कीं, "यजुर्वेदांत आढळणाऱ्या प्रार्थनांच्या आणखी एका प्रकारासंबंधानें कांहीं सांगितलें पाहिजे. हा प्रकार म्हणजे ज्यांना कांहीं अर्थ नाहीं किंवा ज्यांचा अर्थ लागत नाहीं, परंतु यज्ञामध्यें कित्येक ठिकाणीं ज्यांचा मोठ्या गंभीरपणें उच्चार करतात आणि ज्यांना फार पवित्र मानतात असलीं एकटीं अक्षरें किंवा शब्द. उदा. स्वाहा ही यज्ञगर्जना. स्वधा म्हणून देवांना आहुति देतात आणि स्वधा असें म्हणून पितरांना आहुति देतात. अशाच प्रकारचे दुसरे वषट्, वेट्, वाट् इत्यादि अर्थविहीन उद्गार काढतात." या बाबतींतही डॉक्टरसाहेब सपशेल घसरले आहेत. अगोदर यजुर्वेदांत प्रार्थनात्मक मंत्र विरळच आहेत. ज्यांना कांहीं अर्थ नाहीं किंवा ज्यांचा अर्थ लागत नाहीं अशा प्रकारचीं अक्षरें किंवा शब्द शुक्लयजुर्वेदांत मुळींच नाहींत. उदाहरणार्थ म्हणून जीं डॉ. साहेबांनीं स्वाहा, स्वधा, वौषट्, वषट्, वाट्, वेट्, फट्, इत्यादि शब्द दिले आहेत, त्या सर्वांना अर्थ आहे व तो खालील प्रमाणें आहे. 'स्वाहा सुहुतमस्तु अथवा स्वस्याहानमस्तु। हानं हाः नहाः अहाः स्वस्य अहाः अपरित्यागः। आत्मनो द्रव्यस्येतिवेति। [माध्यं. सं. ३ ९ उवटः]. म्हणजे चांगलें निर्मळ चित्तानें हवन केलेलें असो, किंवा स्वतःचा परित्याग नसो. हान म्हणजे त्याग या अर्थाचा वाचक हाः हा निपात. जें हाः नव्हे तें अहाः. जो स्वतःचा किंवा द्रव्याचा अपरित्याग तो स्वाहा. अर्थात् माझा व मी दिलेल्या द्रव्याचा तुजकडून अपरित्याग असावा. असे दोन अर्थ उवटानें केले आहेत. स्वधा शब्दाचा अर्थ शतपथ ब्राह्मणांत पितरांचें

अन्न असा केला आहे. 'स्वधा वै पितॄणामन्नं' इति. किंवा 'स्वद्यते अनेन अन्नं पितृभिः । ष्वद् आस्वादने भ्वा. प. से. आप्रत्ययः । पृषोदरादित्वात् ( ३ - ६ १०९) दस्य धः।' ज्याच्या योगानें पितर अन्न ग्रहण करतात तो शब्द स्वधा होय, असा अर्थ भानुजी दीक्षितानें केला आहे. याच प्रमाणें भानु दीक्षितानें अमर-कोषांत 'स्वाहा देवहविर्दाने श्रौषट् वौषट् वषट् स्वधा' या श्लोकावर व्याख्या करतांना वौषट् व वषट् यांचे अर्थ दिले आहेत. 'श्रूयते अनेन वा' श्रु श्रवणे ( भ्वा. प. से. ) बाहुलकाड्वौषट् । उह्यते अनेन । वह् प्रापणे ( भ्वा. प. से. ) डौषट् डषट् च । म्हणजे हविर्दान दिल्याचें ज्याच्या योगानें श्रवण केलें जातें तो शब्द श्रौषट्; दिलेलें हविर्दान ज्याच्या योगानें प्राप्त केलें जातें तो शब्द वौषट् अगर वषट् होय. 'स्वाहा वाट् इति शब्दद्वयमपि प्रदानार्थे' । ( शत. ब्रा. ९ - ४ - १ -६ सायणाचार्यः ) । वाट् हा शब्द स्वाहा शब्दाप्रमाणें हविर्दानार्थकच आहे. अर्थात् हा रूढ अर्थ आहे. वेट् शब्दही हविर्दानार्थच रूढ आहे.

'वेडिति संप्रदानार्थीयो निपातः'( शत. ब्रा. ९ - २ - १ - ७सायणः). वेट् हा निपात संप्रदानार्थकच आहे. फट् हा निपात नाश पावो या अर्थाचा वाचक आहे. 'फट् ञिफला विशरणे । क्विबंतस्यैतद्रूपं डलयोरेकत्वात् । विशीर्यतु । फडिति अभिचारे स्वाहाकारस्य स्थाने प्रयुज्यते।' माध्यं.[सं. अ. ७- ३ उवटः] फट् हें ञिफला विशरणे या धातुचें क्विबंत रूप असून त्याचा अर्थ नाश पावो असा आहे. फट् हें अव्यय आभिचारिक कर्मांत स्वाहाकाराचे स्थानीं प्रयुक्त करतात. 'स्वाहा देवहविर्दाने वौषड् वश्ये वषडुच्चाटे फट् द्वेष्ये पैतृके स्वधा इत्युक्तेः ।' [शत. ४ - १ - १ - १ - २६ सायणाचार्यः ]. स्वाहा शब्द देवांच्या हविर्दानांत, वौषट् वशीकरणांत, वषट् उच्चाटनांत, फट् द्वेषांत व स्वधा पितृ-गणांच्या हविर्दानांत उपयोगांत आणावा, असें म्हटलें आहे, असा अभिप्राय सायणाचार्यानें स्पष्ट व्यक्त केला आहे. डॉ. साहेबांनीं यजुर्वेदाच्या शुक्लकृष्ण भे-दाचें कारण सांगतांना "एका नाटक कंपनींतून भांडणें होऊन जशी दुसरी नाटक कंपनी निघावयाची"असा दृष्टांत देऊन"शुक्ल व कृष्ण यजुर्वेद्यांचें मूळ भांडण झालें व त्यामुळेंच यजुर्वेदांत एकाच मजकुराची पण भिन्न मांडणीची विविधता झाली" असेंही विधान केलें आहे. डॉ. साहेबांना वेदांच्या बाबतींत नाटक कंपनीचाच दृष्टांत सांपडला हें त्यांचें वैशिष्ट्य होय. शुक्लकृष्ण भेदाचें

हें कारण काय घडलें तें आम्हीं पूर्वार्धांत वेदसंप्रदाय प्रकरणांत स्पष्ट करून सांगितलें असल्यानें येथें पुनरुक्ति करीत नाहीं.

याशिवाय डॉ. महाशयांच्या शुक्लयजुर्वेदीय वाङ्मयावरील इतर आक्षेपांचा, आक्षेप व त्यावरील उत्तर अशा स्वरूपानें विचार करूं.

आक्षेप :-- याज्ञवल्क्यानें ज्या शाखा नवीन तयार केल्या त्यांत बहुतांशीं नवीनच लोक घेतले असावेत.

उत्तर :-- याज्ञवल्क्यानें ज्या शाखा नवीन तयार केल्या त्यांत बहुतांशीं नवीनच लोक घेतले होते असें नाहीं, तर कण्व, जाबाल, गालव, माध्यंदिन, सामश्रवा, शौनक, शांखायन प्रभृति अनेक प्राचीन लोक घेतले होते हें उघड आहे. तसेंच याज्ञवल्क्य सूर्यापासून वेद मिळाविल्यानंतर शाकल्याला गुरुदक्षणा देण्याकारितां आले असतां शाकल्यानें त्यांज जवळ गुरुदक्षणा म्हणून सूर्यप्राप्त नवीन तत्त्वज्ञान शिकव म्हणून दक्षणा मागितली व याज्ञवल्क्यांनीं त्याप्रमाणें सहस्र शिष्यांसह त्यास तत्त्वज्ञान सांगितलें. ते शिष्य व शाकल्य हे सर्व प्राचीनच होत. यावरून पाहातां डॉ. साहेबांचें म्हणणें निराधार आहे.

आक्षेप :-- शतपथ ब्राह्मणांत जे शुक्लयजुर्वेद्यांचे आचार्य दिले आहेत, त्यांचें ते अमक्या आईचे मुलगे असें वर्णन केलें आहे.

उत्तरः - या बाबतींत इतकाच खुलासा करणें जरूर आहे कीं, सदरची आचार्यपरंपरा जन्यवंशपरंपरा नसून विद्यावंश परंपरा आहे व ती स्त्रीप्रधान सांगण्याचें कारण पुत्र हा स्त्रीप्राधान्यानेंच गुणवान् होतो हें दर्शविणें हें होय.

आक्षेप :-- शुक्लयजुर्वेदीय ब्राह्मणांचा विवाहदृष्ट्या प्रवेश जुन्या ब्राह्मणांत झाला नाहीं. आपस्तंब हिरण्यकेशीयांची ऋग्वेद्यांबरोबर लग्नें होतात तशीं शुक्लयजुर्वेदांच्या शाखांतील ब्राह्मणांचीं होत नाहींत. एवढेंच नव्हे तर. शुक्लयजुर्वेदांतल्या पोटशाखांचीं आपआपसांतही लग्नें होत नाहींत.

उत्तर :-- अगोदर ब्राह्मणांतील जुने ब्राह्मण व नवे ब्राह्मण हा भेद डॉ. महाशयांनीं कोठून केला, ह्यास आधार काय, याचा खुलासा कांहींच

---

* अत्र शांकरभाष्यम्। "अथेदानीं समस्तप्रवचनवंशः। स्त्रीप्राधान्याद्गुणवान्पुत्रो भवतीति प्रस्तुतं अतस्त्रीविशेषणेनैव पुत्रविशेषणादाचार्यपरंपरा कीर्त्यंते। बृह.उ.भा

केलेला नाहीं. असा भेद कोठेंच प्राचीन अर्वाचीन वाङ्मयांत केलेला नाहीं. डॉ. साहेबांनीं केवळ आपण सर्वांपेक्षां जुने ब्राह्मण आहोंत व अर्थात् सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहोंत, अशी काल्पनिक क्लृप्ति योजून त्या अभिमानानें तो उल्लेख केला आहे. त्यांची वरील भावनेची अस्पष्ट छायाच या भेदाच्या मुळाशीं असल्याचा स्पष्ट भास होतो. डॉ. साहेबांची ही भावनाच मुळांत मिथ्या आहे. तथापि डॉ. साहेबांच्या म्हणण्याप्रमाणें आपस्तंब हिरण्यकेशीया-प्रमाणें आम्हीं वाजसनेयी लोकांनीं ऋग्वेदी इत्यादि लोकांमध्यें प्रवेश कां केला नाहीं याचें कारण असें कीं, त्यांचें व आमचें आर्त्विज्य सारखें नाहीं. कारण ते ब्रह्मसंप्रदायांतील आहेत. शिवाय ते सर्व मातुल गोत्रांतील कन्येशीं, नव्हे केव्हां केव्हां प्रत्यक्ष मातुल कन्येशीं, विवाह करणारे असून त्यांचा तो आचार हिंदु धर्मशास्त्राविरुद्ध असल्यानें आम्हीं तो मुद्दाम टाकला आहे व आजही आम्ही विवाहदृष्ट्या प्रवेश करूं इच्छित नाहीं. आर्त्विज्य व संप्रदाय एक असूनही मातुल गोत्रोद्वाहाच्या आचारभेदामुळें आमच्यांतील कण्वादि कांहीं पोटशाखां-संबंधीं हाच प्रकार आहे. आमचे मातुल गोत्रोद्वाह न करणारे आदित्य परंपरेंतील ऋग्वेदादि शाखांचे जे लोक आहेत त्यांच्याशीं आमचे विवाह संबंध पुरातन कालापासून आज पावेतों होत आले आहेत, हें डॉ. साहेबांस माहीत नसल्यास त्यांनीं महाराष्ट्राच्या बाहेर गुजराथ, मारवाड, बंगाल, सिंध, पंजाब, वगैरे भागांतील ब्राह्मणांत शिरून बारकाईनें तपास करावा म्हणजे आपली चूक कळून येईल. या बाबतींत येथें आम्हीं अधिक चर्वितचर्वण न करतां चरित्रपरीक्षणांतील या बाबतीचे परिच्छेद पाहण्याची वाचकांना विनंति करितों कारण तेथें या बाबीचा सविस्तर विचार आम्हीं दिलेला आहे.

आक्षेप :— 'ष'- चा - 'ख' आणि ' य '- चा - 'ज' असा उच्चार आणि अतिशयोक्तीनें स्पष्ट उच्चार करावयास शिकवणारें शुक्लयजुर्वेद्यांचें प्रातिशाख्य यावरून अशी एक कल्पना निघते कीं, या नवीन ब्राह्मणांस वैदिक मंत्रांचा उच्चार करणें फार कठिण झालें असावें.

उत्तर :— येथेंही जुने ब्राह्मण व नवीन ब्राह्मण असा स्वकपोल-कल्पित भेद डॉ. साहेबांनीं गृहीत धरिला आहे. जो ब्राह्मण ' यज्ञेन यज्ञमय-जन्त' या मंत्रांतील 'अयजन्त' येथील 'य' चा उच्चार 'य' -च करूं शकतो, त्याला 'यज्ञेन' येथील किंवा 'यज्ञ' येथील 'य' चा उच्चार करणें कठिण गेलें

म्हणून त्याचा 'ज' असा उच्चार त्याच मंत्रांत त्याच क्षणाला केला; अथवा जो ब्राह्मण ज्या क्षणाला 'ज्येष्ठाय कनिष्ठाय शिपिविष्टाय पारयिष्णवः' इत्यादि ठिकाणांतील जोड अक्षरांतील स्वरविहीन 'ष' चा उच्चार - 'ष'- असाच करूं शकतो त्याला 'ओषधयः, षडस्यविष्ठाः, षोडशीस्तोम, सुषारथि, यत्पुरुषं' इत्यादि ठिकाणांतील 'ष 'चा 'ष' उच्चार करणें कठिण गेलें म्हणून त्याचा 'ख' असा उच्चार केला हें म्हणणें किती साहसाचें व असमंजसपणाचें आहे हें सूज्ञ वाचकांस निराळें सांगण्याची जरूरी नाहीं. 'ष चा ख' किंवा 'य चा ज' असा उच्चार व अशाच तऱ्हेचे आणखीही प्रकार, हा सर्व अध्ययनाचा धर्म होय. ज्याप्रमाणें ऋग्वेदांत मंत्राचा शेवटचा स्वर ऱ्हस्व असून सुद्धां दीर्घ म्हणतात. उदाहरणार्थ :- 'पद्भ्यां शूद्रो अजायत' येथील 'त ' चा उच्चार 'ता' असा केला जातो तो जसा अध्ययनधर्म तसाच हाही अध्ययनधर्म आहे. आतां हा अध्ययनधर्म असाच कां ठरविला म्हणाल तर शुक्लयजुर्वेद व कृष्णयजुर्वेद या दोहोंत पुष्कळ साम्य असल्यानें कृष्णयजुर्वेदापासून शुक्लयजुर्वेदाचा पृथक्पणा दाखवावा या हेतूनेंच ठरविला असला पाहिजे. तसेंच शुक्लयजुर्वेद्यांच्या प्रातिशाख्यानें जो अधिक अतिशयोक्तीनें स्पष्ट उच्चार करावयास शिकविलें तोही शुक्लयजुर्वेद हा कृष्णयजुर्वेदाप्रमाणें यातयाम [गतसार] नसून तो अयातयाम [अगतसार] आहे, हें दर्शविण्यासाठींच शिकविला असला पाहिजे. त्याबद्दल डॉ. साहेबांनीं भलतींच विधानें करण्याचें कांहींच कारण नव्हतें.

असो. डॉक्टर साहेबांचे हे सर्व आक्षेप वस्तुतः पाहिलें असतां विचारार्ह नाहींत. त्यांचे संबंधानें इतका कालापव्यय करण्याचें प्रयोजन मुळींच नव्हतें. परंतु कांहीं लोकांच्या आग्रहावरून आम्हीं या कृत्यास प्रवृत्त झालों.

तसेंच स्वस्वशाखेच्या प्रशंसाविधायक निर्मूल वचनांचा संग्रह करून त्यांचे आधारें स्वशाखेची महती वर्णन करण्याचेंही आम्हांस इष्ट वाटत नसल्यानें त्या सर्व गोष्टींकडे दुर्लक्ष करून हें प्रकरण येथेंच संपवितों.

उत्तरार्ध समाप्त.



परिशिष्ट १

# गालवशाखा [ माळवी ]

भिन्नभिन्न देशांत गालवशाखेचे लोक ज्या भिन्नभिन्न नांवांनीं ओळखले जातात तीं नांवें-

गालवाः [ माळवी ]

१ काणाः कानकुब्जाः गौडदेशे
२ कुब्जाः सारस्वत सरस्वतीतीरे
३ सारस्वताः ,, ,,
४ भृंगजाः भृंगाः भृंगदेशे
५ यावनाः यवन संगरदेशे
६ शैवजाः मारुतदेशे
७ नैलवाः कूर्मदेशे
८ पालिभद्राः सिंहलदेशे
९ वैतानलाः नेपालदेशे
१० जनिश्रवाः जनिश्रव मत्स्यदेशे
११ भद्रकाः भद्रकार बौध्यपर्वतदेशे
१२ सौभराः बौध्यपर्वतदेशे
१३ कुथुश्रवाः कुथिवश्रव हिमवद्देशे
१४ बौध्यकाः बोधक बौध्यपर्वतदेशे
१५ पांजालजाः पांचालदेशे
१६ उर्ध्वांगजाः काश्मीरदेशे
१७ कुरोद्रवाः कूर्मदेशे
१८ पुष्करणी मारवाडदेशे
१९ जयत्रवार जयंतव मरुद्देशे
२० ऊर्ध्वरेतसाः ,, ,,
२१ कायसाः कायस गोदादक्षिणदेशे
२२ पालाशनीयाः ,,

---

वरील यादी संबंधीं विश्वसनीय माहिती आम्हांस उपलब्ध झाली नाहीं. जोंपर्यंत ती तशी उपलब्ध झाली नाहीं तोंपर्यंत ही यादी प्रमाण मानतां येणार नाहीं. संग्रहांत असलेली ही यादी केवळ शोधकांस संशोधन करण्यास उपयुक्त होईल म्हणून दिली आहे.

परिशिष्ट २

# जाबालशाखा [ नार्मद ]

भिन्नभिन्न देशांत जाबालशाखेचे लोक ज्या भिन्नभिन्न नांवांनीं ओळखले जातात तीं नांवें.

जाबालाः [ नार्मदाः ]

१ उत्कलाः गौडदेशे
२ मैथिलाः विदेहदेशे [ विहार ]
३ शार्वर्याः ब्रह्मावर्तदेशे
४ कौशीलाः बाह्लिकदेशे
५ तंतीलाः सोरटदेशे
६ बर्हिशीलाः [बाईक] काश्मीरदेशे
७ खेटवाः खैबटद्वीपवासी
८ डांभील डोभील हिमालय दक्षिणदेशे
९ गौरवाः ग्रामणीः मद्रदेशे
१० गोभीलाः उभील गंडकीतीरदेशे
११ सोभराः कौशिकदेशे
१२ जृंभकाः जृंभक आर्यावर्तदेशे
१३ पौंड्काः कंसलदेशे
१४ रोहिणाः रोहिणामिश्र गुर्जरदेशे
१५ माभराः माभीर काश्मीरदेशे
१६ लैंगवाः कलिंगदेशे
१७ मांडवाः मांडवी गौडदेशे
१८ मारवाः मारव मरुदेशे
१९ चौभगाः चोभे मथुरादेशे
२० टौनकाः नेपालदेशे
२१ हिरण्यश्रृंगा हिरण्यश्रृंगी मगधदेशे
२२ कारुणवेयाः कारुणिक ,,
२३ धूम्रजाः धूम्राक्ष हिमवद्देशे
२४ कापिलाः आर्यावर्तदेशे

---

वरील यादी संबंधीं विश्वसनीय माहिती आम्हांस उपलब्ध झाली नाहीं. जोंपर्यंत ती तशी उपलब्ध होत नाहीं, तोंपर्यंत ही यादी प्रमाण मानतां येणार नाहीं. संग्रहांत असलेली ही यादी केवळ शोधकांना संशोधन करण्यास उपयुक्त होईल म्हणून दिली आहे.

परिशिष्ट ३

# माध्यंदिनगुरुशिष्यपरंपरावंश

## १

### अथ मधुकांडस्थः प्रथमः पुंवंशः

१ स्वयंभुब्रह्म
२ परमेष्ठी
३ सनगः
४ सनातनः
५ सनारुः
६ व्यष्टिः
७ विप्राजित्तिः
८ एकार्षिः
९ प्रध्वंसनः
१० मृत्युः प्राध्वंसनः
११ अथर्वादैवः
१२ दध्यङ्ङाथर्वणः
१३ अश्विनौ
१४ विश्वरूपस्त्वाष्ट्रः
१५ आभूतिस्त्वाष्ट्रः
१६ आयास्यआंगिरसः
१७ पंथाः सौभराः
१८ वत्सनपात्बाभ्रवः
१९ विदर्भीकौंडिन्यः
२० गालवः
२१ कुमारहारितः
२२ कैशोर्यःकाप्यः
२३ शांडिल्यः
२४ वात्स्यः
२५ गौतमः
२६ गौतमः
२७ मांटिः
२८ आत्रेयः
२९ भारद्वाजः
३० आसुरिः
३१ औपजंघनिः
३२ त्रैवणिः=भालुकीपुत्रः आसुरायणः
३३ भारद्वाजःआसुरायणःयास्कः
३४ भारद्वाजः
३५ जातूकर्ण्यः—स्त्रीवंशे २५ शांडिली पुत्रः।२ पुंवंशे ३५ जातूकर्ण्यः
३६ पाराशर्यः—स्त्रीवंशे २६ मांडूकी-पुत्रः ।२ पुंवंशे ३६ पाराशर्यः ।
३७ पाराशर्यायणः=स्त्रीवंशे२७ मांडूकायनीपुत्रः । २ पुंवंशे ३७ पाराशर्यायणः
३८ घृतकौशिकः—स्त्रीवंशे२८ जायंती-पुत्रः । २ पुंवंशे ३८ घृतकौशिकः
३९ कौशिकायनिः स्त्रीवंशे३० आलंबी-पुत्रः।२ पुंवंशे ३९कौशिकायनिः।
४० बैजवापायनः— द्वितीयपुंवंशे ३९ सायकायनः । स्त्रीवंशे ४० आलंबायनीपुत्रः ।

